009709
२८

॥ श्री ॥

# सार्थ उपनिषत्संग्रह.

## भाग पहिला.

संपादक

रा. रा. हरि रघुनाथ भागवत.



आवृत्ति पहिली.

शके १८३६. सन १९१४.

रा. रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं ७७६ सदाशिव पेठ, पुणें येथें अष्टेकर आणि मंडळीकरितां प्रसिद्ध केलें.

किंमत दीड रुपया.

# अनुक्रमणिका.



# प्रस्तावनेदाखल दोन शब्द.

श्रुत्यन्तर्गत उपनिषदें हा वेदान्तशास्त्राचा आरंभ होय. या उपनिषदांसारखा सर्वमान्य व तत्त्वज्ञानानें परिपूर्ण असा ग्रंथ जगावर कोणताहि नाहीं असें आधुनिक विद्वानांनीं देखील कबूल केलें आहे. तें हें आमच्या पूर्वजांचें धन आह्मां आर्य लोकांस अपरिचित असणें यासारखा मूर्खपणा दुसरा नाहीं. पण आश्चर्य हें कीं, आजपर्यंत मराठी भाषेमध्यें हीं उपनिषदें स्वल्प किंमतींत मिळण्याची सोय कोणाहि प्रकाशकानें केली नव्हती. हें पवित्र काम अंगावर घेण्याची बुद्धि परमेश्वरानें आह्मांस दिली व अखेरीस आमच्या हातून तें कसेंबसें पार पडलें याबद्दल त्या जगन्नियंत्याचे आह्मी धन्यवाद गातों. आमच्या संस्थेला निमित्तमात्र करून आमच्या हातून आणखीहि उपयुक्त ग्रंथ महाराष्ट्रसमाजास मिळावेत अशी त्याचीच आह्मी प्रार्थना करतों आणि महाराष्ट्रसमाज या कार्यास मदत करो अशी आशा प्रदर्शित करतों.

प्रकाशक.

[५]

# परमार्थसाधन. २८



या पुस्तकामध्यें भगवद्गीता (सार्थ), विष्णुसहस्रनाम, भीष्मस्तवराज, अनुस्मृति, गजेंद्रमोक्ष, गीतामाहात्म्य, सप्तश्लोकी गीता, रामगीता, राममंत्राचे श्लोक, समर्थांचे मनाचे श्लोक, मुकुंदराजांचें परमामृत, शंकराचार्यांचे तत्त्वबोध व आत्मबोध, प्रातःस्मरण, भूपाळ्या, निरनिराळ्या देवदेवतांचीं नित्यपाठांतील सर्व स्तोत्रें व आरत्या, वेदान्तपर स्तोत्रें, बावन्नश्लोकी गुरुचरित्र, शनिमाहात्म्य, वेंकटेशस्तोत्र, अष्टकें, पाळणे. स्त्रियांकरितां परमार्थपर गाणीं, निवडक परमार्थपर पदें, ज्ञानदेव–नामदेव-एकनाथ व तुकाराम यांचे हरिपाठ इत्यादि विषयांचा समावेश केला आहे. पुस्तकास कागद गुळगुळीत (ग्लेज) वापरला असून टाइप मोठा व ठळक आहे. शिवाय निरनिराळ्या देवदेवतांचीं सुमारें तीस पस्तीस चित्रें आहेत. सारांश, प्रत्येक हिंदु कुटुंबामध्यें संग्रह करण्यालायक असें हें पुस्तक आहे. पृष्ठसंख्या ६३२ कापडी बांधणी. किंमत दीड रुपया.

**अष्टेकर आणि मंडळी. पुणें.**

# सार्थ उपनिषत्संग्रह भाग दुसरा.

या पुस्तकामध्यें श्वेताश्वतरोपनिषत्, नारायणोपनिषत्, नृसिंहपूर्वोत्तरतापनीयोपनिषत्, सर्वसारोपनिषत् आणि निरालंबोपनिषत् अशा पांच उपनिषदांचें मूळासह मराठी भाषांतर येणार आहे. पुस्तक छापण्याचें काम यंदांचे दिवाळीपासून सुरू होईल. आमचेकडून ज्यांनीं उपनिषत्संग्रहाचा पहिला भाग विकत घेतला आहे ते येत्या कार्तिक शु० १ ह्मणजे तारीख २० आक्टोबर १९१४ चे आंत आमचेकडून परमार्थसाधन पुस्तक विकत घेतील अथवा ज्यांनीं परमार्थसाधन घेतलें आहे ते उपनिषत्संग्रहाचा पहिला भाग विकत घेतील तर त्यांना सार्थ उपनिषत्संग्रहाचा दुसरा भाग फुकट मिळेल. सोनेरी नांवाची कापडी बांधणीची प्रत पाहिजे असेल तर मात्र चार आणे पडतील. इतरांस ही सवलत नाहीं.

अष्टेकर आणि मंडळी. पुणें.

# सार्थ गीतासप्तक.



संपादक—रा. रा. **हरि रघुनाथ भागवत.** बी. ए.

श्रीमद्भगवद्गीता, रामगीता, गणेशगीता, शिवगीता, देवीगीता, कपिलगीता आणि अष्टावक्रगीता अशा सात गीता सरळ व सुबोध मराठी भाषांतरासह या पुस्तकामध्यें दिल्या आहेत. यांपैकीं प्रत्येक गीता अत्यंत महत्त्वाची असून वेदान्तशास्त्राचा अभ्यास करणारांस किती उपयोगाची आहे हें कोणाला सांगण्याची जरूरी आहे असें आह्मांला वाटत नाहीं. डाव्या बाजूच्या पानांत मोठ्या टाइपामध्यें मूळ संस्कृत श्लोक आणि उजव्या बाजूच्या पानांत त्या श्लोकांचा मराठी अर्थ अशी या ग्रंथाची योजना केली आहे. पृष्ठसंख्या ५५०, बांधणी रेशमी. किंमत दोन रुपये.

**अष्टेकर आणि मंडळी.**

**सदाशिव पेठ पुणें.**

## गीतासप्तकासंबंधानें कांहीं विद्वानांचे अभिप्राय.

**कै० विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर**—"सार्थ गीतासप्तक या पुस्तकाचा बराचसा भाग मीं सूक्ष्मदृष्ट्या वाचून पाहिला. त्यावरून त्यांतील मूळ शुद्ध असून त्याचें भाषांतरहि तितकेंच शुद्ध व आचार्यांचें भाष्य आणि इतरांच्या टीका यांस अनुसरून आहे अशी माझी खात्री झाली आहे. भाषा फारच सरळ असून मूलार्थग्राहिणी आहे. सारांश, हा ग्रंथ परमार्थजिज्ञासूंस अत्यंत उपकारक होईल व तदितरांसहि ज्ञानदायक होईल असें मला वाटतें."

**वेदशास्त्रसंपन्न वासुदेवशास्त्री अभ्यंकर**—"रा. हरि रघुनाथ भागवत यांनीं लिहिलेलें गीतांचें भाषांतर मीं कांहीं ठिकाणीं वाचून पाहिलें. हें भाषांतर साधारण मनुष्याला समजण्यासारखें सुलभ झालें आहे. हें पुस्तक संग्रह करण्यास योग्य आहे असें मला वाटतें."

**प्रो. शिवराम महादेव परांजपे**, एम्. ए.—"सार्थ गीतासप्तक या पुस्तकांतील कांहीं भाग मीं वाचून पाहिलें. वेदान्तशास्त्रांतील पुष्कळ उपयुक्त भाग या गीतांमधून विशद

रीतीनें व्यक्त करण्यांत आलेला आहे. अशा गीतांचें मराठीमध्यें भाषांतर करून तें आपण लोकांपुढें मांडीत आहां, यापासून मराठी वाचकांना फार फायदा होणार आहे. आपण केलेलें भाषांतर संस्कृत न जाणणारांनाहि सहज समजण्यासारखें आहे."

**रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर,** बी. ए.—" माझे मित्र रा. हरिभाऊ भागवत यांनीं गीतासप्तक सार्थ छापून गीताभक्तांची चांगली सेवा केली आहे. यांतील सातहि गीता लोकप्रसिद्ध असून भाविकांच्या नित्यपाठांतल्या आहेत. एका पृष्ठावर मूळ व दुसऱ्या पृष्ठावर मराठी अर्थ दिल्यानें अर्थ समजून घेण्यास व नित्यपाठास ठेवण्यास त्यांचा फार उपयोग होणार आहे. भगवद्गीता आचार्यांच्या भाष्यास धरून आहे. अर्थ आस्थापूर्वक दिलेला आहे. अर्थांत संदिग्धता ठेविली नाहीं व पाल्हाळहि केला नाहीं. भाविकांनीं या पुस्तकाचा अवश्य लाभ जोडावा."

**हरिभक्तिपरायण विष्णुबोवा जोग**—"...भाषांतर बरेंच काळजीपूर्वक केलें असून त्यावरून मूळांतील अर्थ चांगला समजेल. हा ग्रंथ भाविकांनीं संग्रह करण्यास पात्र आहे."

# धर्मसिंधु.

## मराठी भाषांतरासह.

सांप्रत धर्मशास्त्रसंबंधाचे जेवढे ग्रंथ प्रसिद्ध आहेत त्या सर्वांत अत्यंत उपयुक्त व काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्व विद्वानांना मान्य असलेला असा हा ग्रंथ आहे. याचे कर्ते श्रीक्षेत्र पंढरपूर येथील रहिवासी विद्वद्वर्य काशीनाथोपाध्याय हे असून यांनीं धर्मशास्त्रांतील आचारविचारांसंबंधानें असलेल्या मतभेदांचा निर्णय निर्णयसिंधु, हेमाद्रि, कालमाधव, कौस्तुभ, पुरुषार्थचिंतामणि इत्यादि प्राचीन धर्मग्रंथांचे आधारें उत्तम प्रकारें लावून दिला आहे. धर्मशास्त्राची सांगोपांग माहिती पद्धतशीर व सुलभ रीतीनें धर्मसिंधुखेरीज दुसऱ्या ग्रंथांत दिलेली नाहीं. ज्याला ह्मणून आपल्या आर्यधर्माचा अभिमान आहे व आर्यधर्मानुसार ज्याला धर्मकृत्यें करावीं लागतात त्यानें या ग्रंथाची एक प्रत अवश्य संग्रहीं ठेवावी. ग्रंथाचा आकार सुपररायल अष्टपत्री असून पृष्ठसंख्या ७०० हून अधिक

झाली आहे. टाईप व छपाई सुबक आहे. हें भाषांतर चांगलें असल्याबद्दल कै० विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर, संस्कृत-चंद्रिका व सूनृतवादिनी ह्यांचे संपादक यांनीं अभिप्राय दिला आहे. किंमत **पांच रुपये** आहे, **तथापि आह्मी तूर्त हा ग्रंथ लोकांच्या सोयीकरितां अवघ्या अडीच रुपयांस देत आहों**. करितां ग्राहकांनीं त्वरा करावी.

---

## जातकबोध.

आपल्या जन्मकुंडलीमध्यें ग्रह कसे आहेत व त्यांचीं फळें आपणांस कशीं व केव्हां मिळणार हें जाणण्याची इच्छा प्रत्येकाला स्वभावतः असते. याकरितां सामान्य वाचकांना घरबसल्या जातक-शास्त्राची माहिती व्हावी ह्मणून हा ग्रंथ लिहिला आहे. १ सामान्य माहिती, २ ग्रह, ३ राशि, ४ कुंडली, ५ दशा, ६ जातक, ७ महादशांचीं फळें, ८ अंतर्दशांचीं फळें, ९ योग आणि १० स्त्रीजा-तक असे याचे दहा भाग केले असून विषयांची मांडणी पद्धतशीर केली आहे. बृहज्जातक, सारावली, जातकालंकार, जातक-पारिजात, प्रारब्धयोग, ज्योतिर्माला, ज्योतिर्बोध, व्यवहारज्योतिष,

जातकमकरंद, स्त्रीजातक इत्यादि प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांच्या आधारानें त्या त्या ग्रंथांतील सार निवडून जातकबोध लिहिला आहे. किंमत एक रुपया.

---

## जातकचंद्रिका.

वेंकटेशशर्मा नांवाच्या सुप्रसिद्ध ज्योतिर्विदानें पाराशरींचे आधारानें तयार केलेला हा विद्वमान्य जातकग्रंथ मराठी भाषांतर व विवरण यांसह छापला आहे. जातकशास्त्राचे अनेक ठोकताळे व नियम यांत फारच मार्मिकपणानें दिले आहेत. किंमत दोन आणे.

---

## मद्रास, सिलोन व ब्रह्मदेश येथील प्रवास.

सुमारें पंधरा वर्षांपूर्वी मद्रास, सिलोन आणि ब्रह्मदेश येथून प्रवास करून आल्यावर रा. रा. बाळ गंगाधर टिळक यांनीं पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत दिलेलें हें व्याख्यान पुस्तकरूपानें छापलें आहे. किंमत चार आणे.

सेक्रेटरी अष्टेकर आणि मंडळी
सदाशिव पेठ पुणें.

## सार्थ श्रीमद्भगवद्गीता.

संपादक—रा. रा. **हरि रघुनाथ भागवत.** बी. ए.

यामध्यें भगवद्गीतेचें मराठी सुबोध भाषांतर मूळासह दिलें आहे. आकार खिशांत मावण्याजोगा लहान आहे. किंमत अडीच आणे.

## सावित्रीचरित्र.

लेखक—रा. रा. **हरि रघुनाथ भागवत.** बी. ए.

या पुस्तकामध्यें महाभारताच्या आधारानें पतिव्रतामणी सावित्रीचें सविस्तर चरित्र सोप्या भाषेंत दिलें आहे. नंतर थोडक्यांत सावित्रीचरित्राचें रहस्य स्पष्ट सांगितलें आहे शिवाय श्रीधरकविकृत पांडवप्रतापांतील सावित्रीआख्यान, मोरोपंतकविकृत सावित्रीगीत आणि "पहिला प्रणिपात करूं उमादेवीतुला०" हें वटसावित्रीचें जुनें गाणें हीं संपूर्ण जोडिलीं असून अखेरीस वटपूर्णिमेचे दिवशीं पूजेचे प्रसंगीं ह्मणावयाची वटसावित्रीची आरती दिली आहे. किंमत सहा आणे.

**सूचना**—सर्व पुस्तकांस टपालखर्च वेगळा.

**सेक्रेटरी, अष्टेकर आणि मंडळी.**
**७७६ सदाशिव पेठ, पुणें.**

बडोदें सरकारच्या विद्यमान विद्याधिकारी यांच्या परीक्षक कमेटीनें पसंत करून दोनशें रुपये बक्षिस दिलेला निबंध.

# वेदान्तनिदर्शन.

लेखक---**रा. रा. सीताराम महादेव फडके**, बी. ए.

कर्म, ज्ञान, भक्तियोगांचीं तत्त्वें काय आहेत हीं न समजल्यामुळें पाश्चात्य ज्ञानाच्या व तदनुषंगिक चिकित्सक बुद्धीच्या जोरावर अधर्माकडे प्रवृत्त झालेल्या किंवा धर्म-राहित्याच्या मार्गाकडे वहावणाऱ्या मनाला ऐतिहासिक आणि विचाराच्या पाश्चिमात्य पद्धतीस रुचेल असें विवे-चन करणारा असा ग्रंथ आजपर्यंत दुसरा झाला नाहीं. बुद्ध, महंमदी, ख्रिस्ती वगैरे धर्मांतील तत्त्वें वेदान्तमतानें कशीं अपुरीं आहेत, त्या धर्मांचा हिंदु धर्मावर काय परिणाम झाला आणि हिंदुधर्माचें बीज व थोरवी कशांत आहे, याबद्दल सप्रमाण सिद्धान्त या निबंधांत दिले आहेत. इतर धर्मांना न सुटणारीं कूटें–तितिक्षा

दैववाद व पुरुषवाद ( Destination & freewill ) वगैरे--ह्यांत उत्तम प्रकारें सोडविलीं आहेत.

पुस्तकाचा टाईप जाहिरातीप्रमाणेंच. कागद जाड ग्लेझ. बाईंडिंग उत्कृष्ट असून वर सोनेरी नांव घातलें आहे. किं. अडीच रुपये. ट. ख. वेगळा.

**अष्टेकर आणि मंडळी. सदाशिव पेठ. पुणें.**

**छापत आहे.**

## सार्थ माधवनिदान.

आर्यवैद्यकांतील हा प्रसिद्ध ग्रंथ सध्यां छापण्यास घेतल आहे. ग्रंथाच्या उपयुक्ततेबद्दल व महत्त्वाबद्दल वर्णन करण्याची जरूरच नाहीं. कारण, " निदाने माधवः श्रेष्ठः " या वचनावरून ग्रंथाची योग्यता तज्ज्ञ जाणत आहेत. ग्रंथ सुमारें तीन महिन्यांनीं छापून तयार होईल. किंमत दोन रुपये. परंतु जे ग्राहक आमचेकडे आगाऊ नांव दाखल करतील त्यांना किंमत फक्त दीड रुपया. तयार झाल्याबरोबर दीड रुपया व ट. ख. अशा व्हीपीनें.आगाऊ ग्रहकांकडे रवाना होईल.

**अष्टेकर आणि मंडळी. पुणें.**

७११०१

**सूचना**---५ आणि ६ या पानांतील **परमार्थसाधन** आणि **उपनिषत्संग्रह भाग दुसरा** या जाहिरातींकडे वाचकांनीं अवश्य लक्ष द्यावें.



॥ श्री ॥

# सार्थ उपनिषत्संग्रह.

## ईशावास्योपनिषत् ॥ १ ॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ईशावास्यमिदꣳ सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ॥ तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम् ॥ १ ॥

### ईशावास्योपनिषत्.

तें ( ब्रह्म ) पूर्ण आहे, हें ( ब्रह्म ) पूर्ण आहे. पूर्णापासून जें उत्पन्न होतें तेंहि पूर्णच. पूर्णामधून पूर्ण वजा केलें असतां बाकीहि पूर्णच रहातें.

या पृथ्वीवर ज्याला ह्मणून जीव आहे तें हें सर्व परमात्म्यानें आच्छादिलेलें आहे. नामरूपकर्माख्य जें वस्तुमात्र त्याचा

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः ॥ एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥ असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः ॥ ताꣳस्ते प्रेत्याभिगच्छन्ति ये के चात्महनो जनाः ॥ ३ ॥ अनेजदेकं

याप्रमाणें त्याग करून पालन कर. स्वतःच्या अथवा दुसऱ्याच्या धनाची आकांक्षा धरूं नकोस. १. (याप्रमाणें वस्तुमात्र आत्मरूपानें पहाण्याला असमर्थ असेल तर) या लोकीं अग्निहोत्रादि कर्में करीत होत्सात्या मनुष्यानें शंभर वर्षें जगण्याची इच्छा करावी. या प्रकारानें तूं जगण्याची इच्छा करीत असलास म्हणजे दुसरा असा प्रकार नाहीं, कीं, ज्या प्रकारानें तूं अशुभ कर्मापासून अलिप्त रहाशील. २. (निवृत्तिरूप आणि प्रवृत्तिरूप असे दोन धर्म सांगून हे न जाणणाऱ्या मूढ नरांविषयीं सांगतात—) अविद्यारूपी दोषामुळे जे जन आत्म्याचा तिरस्कार करतात ते देहाचा त्याग केल्यानंतर अज्ञानरूपी अंधकारानं आच्छादलेले आसुर [=असुरांचे] जे लोक त्या लोकीं गमन करतात. ३. (आत्मतत्त्वाचा तिरस्कार करणारे अविद्वान्

मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत् ॥ तद्धावतोऽ-
न्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ॥ ४ ॥ तदे-
जति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ॥ तदन्तरस्य सर्वस्य तदु
सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ५ ॥ यस्तु सर्वाणि भूतान्यात्म-

असें सांगितलें. आत्मतत्त्वाचा तिरस्कार न करणारे ते विद्वान होत. हें आत्मतत्त्व कसें तें सांगतात —) याचें कधीं अवस्थान्तर होत नाहीं; हें सर्वदा एकरूप आहे; हें मनापेक्षां अधिक वेगवान् आहे; चक्षु आदिकरून इंद्रियांना हें कधीं प्राप्त होत नाहीं; कारण मनापेक्षां अधिक वेगवान् असल्यामुळें हें मनाच्या पलीकडे जातें. वेगानें गमन करणाऱ्या मन, वाक इत्यादि इंद्रियांच्या पलीकडे हें जातें. स्वतः अविकाररूप असलेल्या या आत्मतत्त्वामध्यें प्राणधारक वायु कर्में धारण करतो. ४. तें कंप पावतें, तें कंप पावत नाहीं; तें दूर आहे, तें समीप आहे; या सर्व विश्वाच्या तें आंत आहे, या सर्व विश्वाच्या तें बाहेर आहे. ५ जो मुमुक्षु सर्व भूतमात्र आत्मस्वरूपामध्यें लीन झालेलें पहातो आणि सर्व भूतांचे ठिकाणीं

न्येवानुपश्यति ॥ सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ ६ ॥ यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः ॥ ७ ॥ स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरꣳशुद्धमपापविद्धम् ॥ कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥ ८ ॥ अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपा-

आत्मस्वरूप पहातो, तो त्यामुळें कधीं मोह अथवा लज्जा पावत नाहीं. ६. जेव्हां विद्वानाला सर्व भूतमात्र आत्मस्वरूपच दिसूं लागेल तेव्हां सर्व एकरूप पहाणाऱ्या त्याला शोक आणि मोह कोठून होतील? ७. हा आत्मा सर्वव्यापी, दीप्तिमान्, सूक्ष्मशरीरानें वर्जित, स्थूलशरीरानें वर्जित [ ज्याला क्षतें नाहींत आणि ज्याला शिरा नाहींत ], अविद्यारूपी--मलरहित, पापरहित, सर्वद्रष्टा, सर्वज्ञ, सर्वव्यापी आणि स्वयंभू असा आहे. या आत्म्यानें ह्मणजे ईश्वरानें नित्य अशा संवत्सरनामक प्रजापतींना योग्यतेप्रमाणें कर्तव्यें विभागून दिलीं आहेत ८. जे केवळ कर्मांचें अनुष्ठान करतात ते अत्यंत गाढ अशा

सते ॥ ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाꣳ रताः ॥
॥ ९ ॥ अन्यदेवाहुर्विद्ययान्यदाहुरविद्यया ॥ इति शुश्रुम
धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १० ॥ विद्यां चाविद्यां च
यस्तद्वेदोभयꣳ स ह । अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्यया-
मृतमश्नुते ॥ ११ ॥ अन्धं तमः प्रविशन्ति येऽसंभूति-

अंधकारामध्यें प्रवेश करतात. जे कर्मांचा त्याग करून केव देवताज्ञानामध्यें रत असतात ते त्यापेक्षांहि घोर अशा अंध-कारामध्यें प्रवेश करतात. ९. विद्येच्या योगानें पृथक् फळ मिळतें असें ह्मणतात आणि अविद्येच्या ह्मणजे कर्मांच्या योगानें पृथक् फळ मिळतें असें ह्मणतात, हें आह्मीं बुद्धि-मान् जनांपासून श्रवण केलें आहे. या बुद्धिमान् आचार्यांनींच आह्मांला तें कर्म व तें ज्ञान यांची फोड करून सांगितली. १०. देवताज्ञान आणि कर्म या दोहोंचें एकत्र अनुष्ठान केलें पाहिजे असें जो जाणतो त्याला अग्निहोत्रादि कर्मांच्या योगानें मृत्यूचें ( ह्मणजे स्वाभाविक कर्म व स्वाभाविक ज्ञान यांचें ) अति-क्रमण करून देवताज्ञानानें अमृताची ह्मणजे देवतात्मभावाची

मुपासते ॥ ततो भूय इव ते तमो य उ संभूत्याꣳ रताः ॥ १२ ॥ अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ॥ इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ॥ १३ ॥ संभूतिं च

प्राप्ति होते. ११. ( व्याकृत आणि अव्याकृत अशा दोन्ही समुदित उपासना केल्या पाहिजेत असें सांगण्याकरितां पृथक् उपासनेची निंदा करतात—) जे कारणाची ह्मणजे अविद्येची उपासना करतात ते अत्यंत गाढ अशा अंधकारामध्यें प्रवेश करतात. जे कार्यब्रह्माच्या उपासनेमध्यें मग्न होतात ते त्यापेक्षांहि घोर अशा अंधकारामध्यें प्रवेश करतात. १२. ( आतां दोन्ही उपासनांचा समुच्चय केला पाहिजे असें सांगण्याला कारण जें दोन उपासनांचें भिन्न फल तें सांगतात —) कार्यब्रह्माची उपासना केल्यानें अणिमादि ऐश्वर्यरूपी निराळें फळ मिळतें असें सांगतात व कारणब्रह्माची ह्मणजे अविद्येची उपासना केल्यानें निराळें फळ मिळतें असें सांगतात. या दोन व्याकृत [ व्यक्त ] आणि अव्याकृत [ अव्यक्त ] उपासनांचें फळ ज्यांनीं आह्मांस स्पष्ट करून सांगितलें त्या

विनाशं च यस्तद्वेदोभयँ सह ॥ विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ॥ १४ ॥ हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ॥ तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये

बुद्धिमान जनांपासून आह्मीं असें ऐकलें. १३. ( याकरितां कारण ब्रह्म आणि कार्यब्रह्म यांची उपासना समुच्चयानें करणें योग्य आहे असें सांगतात—) जिला जन्म नाहीं अशी अव्यक्त प्रकृति ह्मणजे अविद्या [ (अ)संभूति ] आणि ज्याला विनाश आहे असें कार्यब्रह्म हीं दोन्ही जो एकत्र जाणतो तो कार्यब्रह्माच्या उपासनेनें मृत्यूच्या पलीकडे जाऊन प्रकृतीच्या ह्मणजे कारण-ब्रह्माच्या [ (अ)संभूत्या ] उपासनेनें ज्यामध्यें प्रकृतीचा लय होतो अशा अमरत्वाप्रत जातो. १४. ( कर्माच्या योगानें मृत्यूचें अतिक्रमण करून देवताज्ञानानें अमृताची प्राप्ति होते असें ११ व्या श्लोकामध्यें सांगितलें आहे. ती प्राप्ति कोणत्या मार्गानें होते तें सांगतात—) सुवर्णाप्रमाणें ज्योतिर्मय अशा पात्रानें आदित्यमंडलाच्या ठिकाणीं असलेल्या ब्रह्माचें मुख झांकलेलें आहे. ब्रह्माची उपासना हाच ज्याचा धर्म आहे असा जो

॥ १५ ॥ पूषन्नेकर्षे यम सूर्यप्राजापत्यव्यूह रश्मीन्समूह ॥ तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥ १६ ॥ वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् ॥ ॐ क्रतो स्मर कृतꣳ स्मर क्रतो स्मर

मी त्या मला ब्रह्माची उपलब्धि होण्याकरितां, हे सूर्या, तूं तें पात्र दूर सार. १५. जगाचें पोषण करणाऱ्या, एकटा गमन करणाऱ्या, सर्वांचें संयमन करणाऱ्या, प्राणांचा आणि उदकांचा स्वीकार करणाऱ्या, प्रजापतीच्या पुत्रा, तूं आपले किरण एकत्र कर. जें तुझें अत्यंत कल्याणकारक असें तेजस्वी रूप तें माझ्या दृष्टीस पडो. असें कीं, आदित्यमंडलस्थ जो पुरुष आहे तो मीं व्हावें. १६. ज्ञान आणि कर्म यांच्या योगानें संस्कार पावलेला असा माझा हा प्राण [ वायुः ] सर्वव्यापी [ अनिलं ] सूत्रात्मा [ अमृतं ] होवो. आतां हें ( माझें ) शरीर भस्मामध्यें ज्याचा अन्त आहे असें होवो. हे संकल्प करणाऱ्या प्राण्या, स्मरण करण्याला योग्य असें जें अग्निस्वरूपी ब्रह्म त्याचें स्मरण कर. १७. आजपर्यंत केलेल्या कर्मांचें स्मरण

कृतꣳ स्मर ॥ १७ ॥ अग्ने नय सुपथा राये अस्मान्वि-
श्वानि देव वयुनानि विद्वान् ॥ युयोध्यस्मज्जुहुराणमेनो
भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ॥ १८ ॥

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ इति वाजसनेयसंहितोपनिषत्संपूर्णा ॥ १ ॥

---

कर. सर्व प्रकारचें कर्म अथवा ज्ञान जाणणाऱ्या देवा, अग्ने, पुन्हां गमन आणि आगमन यांनीं वर्जित अशा चांगल्या मार्गानें आह्मांला संपत्तीप्रत ह्मणजे कर्मफलांच्या भोगाप्रत ने. आह्मांला वक्र ह्मणजे शत्रुरूपी असलेलें जें पाप त्याचा नाश कर. तुला आह्मी पुष्कळ नमस्कार करतों. १८.

॥ इति ईशावास्योपनिषत्समाप्ता ॥

---

## केनोपनिषत् ॥ २ ॥

ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक् प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मौपनिषदं माहं ब्रह्मं निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणमस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ केनेषितं पतति प्रेषितं मनः केन प्राणः प्रथमः

## केनोपनिषत्.

माझें शरीर, वाणी, प्राण, चक्षु, श्रोत्र, बल, ( इतर ) सर्व इंद्रियें वृद्धि पावोत. हें सर्व ( विश्व ) उपनिषदांत वर्णिलेलें ब्रह्म आहे. ब्रह्माचा तिरस्कार माझ्याकडून न होवो. ब्रह्म माझा तिरस्कार न करो. तिरस्कार न करो, तिरस्कार न होवो. ब्रह्मात्मस्वरूपीं रत झालेला जो मी त्या माझे ठायीं उपनिषद्गत धर्म राहोत.

आपल्या विषयाप्रत जाण्याला प्रेरणा केलेलें मन आपल्या

प्रैति युक्तः ॥ केनेषितां वाचमिमां वदन्ति चक्षुः श्रोत्रं
क उ देवो युनक्ति ॥ १ ॥ श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो
यद्वाचो ह वाचंऽ स उ प्राणस्य प्राणश्चक्षुषश्चक्षुरतिमुच्य
धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥ २ ॥ न तत्र

विषयाप्रत कोणाच्या प्रेरणेनें गमन करतें? सर्व इंद्रियांमध्यें श्रेष्ठ असा जो प्राण तो कोणाच्या प्रेरणेनें आपल्या विषयाप्रत गमन करतो? कोणीं प्रेरणा केलेली ही वाणी लोक बोलतात? कोणचा बरें प्रकाशमान देव चक्षु आणि श्रोत्र यांना प्रेरणा करतो? १. श्रोत्राचें जो श्रोत्र आहे, मनाचें जो मन आहे, वाचेची जो वाचा आहे, प्राणाचा जो प्राण आहे, चक्षूचा जो चक्षु आहे तो यांना प्रेरणा करतो. इंद्रियाचा इंद्रियभाव जे बुद्धिमान् जन टाकून देतात ते पुत्रमित्रकलत्ररूपी या लोकापासून परावृत्त होत्साते ह्मणजे सर्व इच्छांपासून परावृत्त होत्साते मरणापासून मुक्त होतात [अथवा, इंद्रियांचा इंद्रियभाव जे बुद्धिमान् जन टाकून देतात ते या मृत्युलोकामध्यें मृत्यु पावल्यावर ह्मणजे शरीराचा त्याग केल्यावर अमृतत्वाला

**चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न विद्मो न विजानीमो यथैतदनुशिष्यादन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि ॥ इति शुश्रुम पूर्वेषां ये नस्तद्व्याचचक्षिरे ॥ ३ ॥ यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि**

ह्मणजे अमरणरूपी मोक्षाला जातात ]. २. इंद्रियांच्या ठिकाणचें इंद्रियरूप ज्या अर्थी ब्रह्म त्या अर्थी तेथें [ ह्मणजे त्या ब्रह्माचे ठिकाणीं ] चक्षु जात नाहीं, वाचा जात नाहीं, मन जात नाहीं; [ कारण स्वतःकडे स्वतः कसें जावयाचें ? ] ह्मणून आह्मांला तें ब्रह्म जाणतां येत नाहीं. शिष्याला तें समजावून देतां येईल अशा रीतीनें तें आह्मांला समजलेलें नाहीं. जें जें ह्मणून जाणीवेचा विषय झालेलें आहे [ ह्मणजे उपलब्ध सर्व प्रकारचें ज्ञान ] आणि जें जें जाणीवेचा विषय झालेलें नाहीं, त्या सर्वांहून निराळें [ ह्मणजे आत्मरूपी ] हें ब्रह्म आहे. ज्या आचार्यांनीं आह्मांला समजावून दिलें त्यांजकडून आह्मीं हें ऐकलें. ३. जें वाणीनें प्रकाशित होत नाहीं ( पण ) जें वाणीला प्रका-

नेदं यदिदमुपासते ॥ ४ ॥ यन्मनसा न मनुते येनाहु-
र्मनो मतम् ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते
॥ ५ ॥ यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति ॥
तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ ६ ॥ यच्छ्रो-
त्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदंश्रुतम् ॥ तदेव ब्रह्म त्वं

शित करतें तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे. ४. जें कधीं मनानें जाणलें जात नाहीं, ज्यानें मन व्यापिलेलें आहे असें ब्रह्मवेत्ते सांगतात, तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधि-भेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे. ५. जें कधीं चक्षूनें पाहिलें जात नाहीं, अंतःकरण वृत्तीशीं संयुक्त झालेल्या ज्या ब्रह्माचे योगानें लोक चक्षूचे व्यापार पहातात तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधिभेद-विशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे. ६. जें कधीं श्रोत्रानें श्रवण केलें जात नाहीं, पण ज्यानें हें श्रोत्र श्रवण केलेलें आहे, तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या

विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ ७ ॥ यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्राणीयते ॥ तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ ८ ॥ इति प्रथमः खण्डः ॥ १ ॥

यदि मन्यसे सुवेदेति दभ्रमेवापि नूनं त्वं वेत्थ ब्रह्मणो रूपं यदस्य त्वं यदस्य च देवेष्वथ नु मीमांस्यमेव ते मन्ये

उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे. ७. ज्याचा कधीं प्राणानें वास घेतला जात नाहीं, पण जें प्राणाचा [ प्राणरूपी वायूचा ] वास घेतें, तेंच ब्रह्म असें तूं जाण; ज्या उपाधिभेदविशिष्ट अनात्म्याची ब्रह्म समजून उपासना करतात तो ब्रह्म नव्हे. ८. इति प्रथमः खण्डः

'मला या ब्रह्माचें स्वरूप उत्तम प्रकारें समजलें' असें जर तुला वाटलें तर खरोखर तुला तें अल्प समजलें आहे. 'मला या ब्रह्माचें देवतात्मक स्वरूप समजलें' असें जर तुला वाटेल तर तें देखील तुला अल्पच समजलें. मला वाटतें, तुझें तें ज्ञान ( कितपत आहे ) याचा विचारच केला पाहिजे, ९.१. ( शिष्य म्हणतो, ) मला ब्रह्म नीटपणें समजलें

विदितम् ॥ ९ ॥ १ ॥ नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च ॥ यो नस्तद्वेद तद्वेद नो न वेदेति वेद च ॥ १० ॥ २ ॥ यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः ॥ अविज्ञातं विजानतां विज्ञातमविजानताम् ॥ ११ ॥ ३ ॥ प्रतिबोध विदितं मतममृतत्वं हि

नाहीं. (गुरु ह्मणतो, तर मग तुला कांहीं तरी समजलें असलें पाहिजे. यावर शिष्य ह्मणतो, ) नाहीं; मला समजलें नाहीं ही गोष्ट मला समजली. आमच्यापैकीं जो 'नाहीं; मला ब्रह्म समजलें नाहीं' ही गोष्ट जाणतो त्याला ब्रह्म समजलें. १०. २. ज्याला वाटतें, मला ब्रह्म समजलें नाहीं, त्याला ब्रह्म समजलें. ज्याला वाटतें, मला ब्रह्माचें ज्ञान झालें त्याला ब्रह्माचें ज्ञान झालें नाहीं. आपल्याला ब्रह्माचें विशेष ज्ञान झालें असें ज्यांना वाटतें त्यांना मुळींच ज्ञान झालेलें नाहीं आपल्याला ब्रह्माचें मुळींच ज्ञान झालें नाहीं असें ज्यांना वाटतें त्यांना ब्रह्माचें ज्ञान झालें असें समजावें. ११. ३. प्रत्येक जाणीवेच्या प्रसंगा होणारें जें ज्ञान व ज्या ज्ञानापासून

विन्दते ॥ आत्मना विन्दते वीर्यं विद्यया विन्दतेऽमृतम् ॥ १२ ॥ ४ ॥ इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः ॥ भूतेषु भूतेषु विचित्य धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥ १३ ॥ ५ ॥ इति द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

ब्रह्म ह देवेभ्यो विजिग्ये तस्य ह ब्रह्मणो विजये देवा

मोक्षाची प्राप्ति होते तें ब्रह्माचें खरें ज्ञान. अविद्येचा नाश होऊन आत्मत्वाचें ज्ञान झालें ह्मणजे सामर्थ्य प्राप्त होतें; आणि विद्येच्या योगानें प्राप्त झालेल्या या सामर्थ्यानें अमृतत्व मिळतें, ह्मणजे मृत्यूवर जय मिळतो. १२.४. या लोकीं जर आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें तर त्यामध्यें परमार्थता आहे; या लोकीं जर आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें नाहीं तर महान् नाश आहे. चराचर भूतमात्राचे ठिकाणीं आत्मतत्व ब्रह्म आहे हें ज्यांनीं जाणलें आहे असे बुद्धिमान् जन अविद्यारूपी मृत्युलोकामधून जाऊन अमृतत्वाप्रत जातात ह्मणजे ब्रह्मच होतात. १२. ५. इति द्वितीय खण्डः ॥ २ ॥

अमहीयन्त त ऐक्षन्तास्माकमेवायं विजयोऽस्माकमेवायं महिमेति ॥ १४ ॥ १ ॥ तद्धैषां विजज्ञौ तेभ्यो ह प्रादुर्बभूव तन्न व्यजानन्त किमिदं यक्षमिति ॥ १५ ॥ ॥ २ ॥ तेऽग्निमब्रुवन्जातवेद एतद्विजानीहि किमेतद्यक्षमिति तथेति ॥ १६ ॥ ३ ॥ तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीत्यग्निर्वा अहमस्मीत्यब्रवीज्जातवेदा वा अहमस्मीति

ब्रह्मानें देवांना ( असुरांवर ) जय मिळवून दिला; त्या ब्रह्मानें मिळवून दिलेल्या विजयानें देवांना महिमा प्राप्त झाला. ( पण ) देवांना वाटलें कीं, आमचाच हा विजय आहे, आमचाच हा महिमा आहे. १४.१. ब्रह्मानें देवांचें हें मिथ्या ज्ञान जाणलें आणि देवांच्या पुढें ब्रह्म प्रकट झालें. तेव्हां देवांनीं ओळखलें नाहीं कीं, हा पूजनीय असा महान् प्राणी कोण आहे? १५.२. देव अग्नीला ह्मणाले, "हे जातवेद [ सर्व जाणणाऱ्या ], हें काय आहे तें जाण; हें पूजनीय आहे काय?" अग्नीनें उत्तर केलें, "बरें आहे." १६.३. अग्नि ब्रह्माकडे गेला, ब्रह्मानें विचारलें, "तूं कोण आहेस?"

॥ १७ ॥ ४ ॥ तं यस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदꣳ सर्वं दहेयं यदिदं पृथिव्यामिति ॥ १८ ॥ ५ ॥ तस्मै तृणं निदधावेतद्दहेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाक दग्धुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति ॥ १९ ॥ ६ ॥ अथ वायुमब्रुवन्वायवेतद्विजानीहि किमे-

अग्नि ह्मणाला, "मी अग्नि आहें; मी जातवेद या नांवानेंहि प्रसिद्ध आहें." १७.४. ब्रह्म ह्मणालें, "अशा नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या तुझ्यामध्यें कोणतें सामर्थ्य आहे?" अग्नि ह्मणाला, हें जें (अंतरिक्षामध्यें) सर्व आहे व जें पृथिवीमध्यें आहे तें सर्व मी दहन करूं शकतों." १८.५. ब्रह्मानें अग्नीच्या पुढें तृण ठेविलें व सांगितलें, "हें दहन कर." अग्नि आपल्या सर्व वेगानें त्या तृणाकडे धांवला, पण त्याचें दहन करण्याला समर्थ झाला नाहीं. तेव्हां त्या ब्रह्मापासून तो माघारा देवांकडे गेला आणि ह्मणाला, "हें पूजनीय आहे किंवा काय तें मी जाणूं शकलों नाहीं." १९.६. नंतर देव वायूला ह्मणाले, "वायो, हें काय आहे तें जाण; हें पूजनीय

तद्ब्रह्मेति तथेति ॥ २० ॥ ७ ॥ तदभ्यद्रवत्तमभ्यवदत्कोऽसीति वायुर्वा अहमस्मीत्यब्रवीत् मातरिश्वा वा अहमस्मीति ॥ २१ ॥ ८ ॥ तस्मिंस्त्वयि किं वीर्यमित्यपीदं सर्वमाददीयं यदिदं पृथिव्यामिति ॥ २२ ॥ ९ ॥ तस्मै तृणं निदधावेतदादत्स्वेति तदुपप्रेयाय सर्वजवेन तन्न शशाकादातुं स तत एव निववृते नैतदशकं विज्ञातुं यदे-

आहे काय?'' वायूनें उत्तर केलें, ''बरें आहे.'' २०.७. वायु ब्रह्माकडे गेला. ब्रह्मानें विचारलें, ''तूं कोण आहेस?'' वायु ह्मणाला, ''मी वायु आहें; अंतरिक्षांत गमन करणारा ह्मणून मातरिश्व या नांवानेंहि मी प्रसिद्ध आहें.'' २१.८. ब्रह्म ह्मणालें, ''अशा नांवांनीं प्रसिद्ध असलेल्या तुझ्यामध्यें कोणतें सामर्थ्य आहे?'' वायु ह्मणाला, हें जें (अंतरिक्षामध्यें) सर्व आहे व जें पृथिवीमध्यें आहे तें सर्व मी घेऊं शकतों.'' २२ ९. ब्रह्मानें वायूच्या पुढें तृण ठेविलें व सांगितलें ''हें घे.'' वायु आपल्या सर्व वेगानें त्या तृणाकडे धांवला, पण त्याचें ग्रहण करण्याला समर्थ झाला नाहीं.

तद्यक्षमिति ॥ २३ ॥ १० ॥ अथेन्द्रमब्रुवन्मघवन्नेतद्वि-
जानीहि किमेतद्यक्षमिति ॥ तथेति तदभ्यद्रवत्तस्मात्ति-
रोदधे ॥ २४ ॥ ११ ॥ स तस्मिन्नेवाकाशे स्त्रियमा-
जगाम बहुशोभमानामुमां हैमवतीं ताꣳ होवाच किमेत-
द्यक्षमिति ॥ २५ ॥ १२ ॥ इति तृतीयः खण्डः ॥ ३॥

सा ब्रह्मेति होवाच ब्रह्मणो वा एतद्विजये महीयध्व-

तेव्हां त्या ब्रह्मापासून तो माघारा देवांकडे गेला आणि ह्मणाला, "हें पूजनीय आहे किंवा काय त मी जाणूं शकलों नाहीं. २३.१०. नंतर देव इंद्राला ह्मणाले, "मघवन्, हें काय आहे तें जाण; हें पूजनीय आहे काय?" इंद्रानें उत्तर केलें, "बरें आहे." इंद्र ब्रह्माकडे गेला. इंद्रा पासून ब्रह्म अंतर्धान पावलें. २४.११. इंद्र त्याच जागीं स्तब्ध राहिला. सुवर्णाप्रमाणें दिसणारी व अतिशय शोभणारी अशी स्त्री उमा प्रादुर्भूत झाली. इंद्र तिला ह्मणाला, "आतां अंतर्धान पावलेलें पूजनीय (ब्रह्म) तें हेंच काय?" २५.१२. इति तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

मिति ततो हैव विदांचकार ब्रह्मेति ॥ २६ ॥ १ ॥ तस्माद्वा एते देवा अतितरामिवान्यान्देवान्यान्देवान्यदग्निर्वायुरिन्द्रस्ते ह्येनं नेदिष्ठं पस्पृर्शुस्ते ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥ २७ ॥ २ ॥ तस्माद्वा इन्द्रोऽतितरामिवान्यान्देवान्स ह्येनन्नेदिष्ठं पस्पर्श स ह्येनत्प्रथमो विदांचकार ब्रह्मेति ॥ २८ ॥ ३ ॥ तस्यैष आदेशो यदेतद्वि-

उमा ह्मणाली, "तें ब्रह्म आहे. ब्रह्माच्या विजयानें तुह्मांला महिमा प्राप्त झाला आहे." तेव्हां इंद्राला समजलें, हें ब्रह्म आहे. २६.१. ( अग्नि, वायु, इन्द्र हे देव ब्रह्माच्या समीप गेले ) ह्मणून हे इतर देवांहून श्रेष्ठ आहेत. ज्या अर्थी अग्नि, वायु व इन्द्र या देवांनीं अति समीप जाऊन ब्रह्माला स्पर्श केला त्या अर्थी त्यांनीं हें ब्रह्म प्रथम ( इतरांच्या अगोदर ) जाणलें. २७.२. ( ज्या अर्थी अग्नि व वायु यांच्या पेक्षां इन्द्राला ब्रह्माचें प्रत्यक्ष ज्ञान झालें ) त्या अर्थी इन्द्र इतर देवांहून श्रेष्ठ आहे. ज्या अर्थी इंद्रानें अति समीप जाऊन ब्रह्माला स्पर्श केला त्या अर्थी त्यानें हें ब्रह्म प्रथम (इत-

द्युतो व्यद्युतदा ३ इतीन् न्यमीमिषदा ३ इत्यधिदैवतम् ॥ ॥ २९ ॥ ४ ॥ अथाध्यात्मं यदेतद्गच्छतीव च मनोऽनेन चैतदुपस्मरत्यभीक्ष्णं संकल्पः ॥ ३० ॥ ५ ॥ तद्ध तद्वनं नाम तद्वनमित्युपासितव्यं स य एतदेवं वेदाऽभि हैनं सर्वाणि भूतानि संवाञ्छन्ति ॥ ३१ ॥ ६ ॥ उपनिषदं भो ब्रूहीत्युक्ता त उपनिषद्ब्राह्मीं वाव त उपनिषदमब्रूमेति

यांच्या अगोदर ) जाणलें. २८.३. त्या ब्रह्माचें देवताविषयक उपमारूपी दर्शन असें आहे—विजेच्या ठिकाणीं असलेलें जें प्रकाशमानत्व आणि तिरोधान. २९.४. त्या ब्रह्माचें अध्यात्मविषयक उपमारूपी दर्शन असें आहे–जें हें सर्वत्र गमन करणारें मन. या मनाच्या योगानें साधक ब्रह्माचे समीप जातो. स्मृत्यादि रूपानें मनाला ब्रह्माचा तत्काल प्रत्यय येतो. ३०.५. तें ब्रह्म प्राणिमात्रानें पूजन करण्याला योग्य असें आहे. 'पूजन करण्याला योग्य' या गुणानें विशिष्ट अशी त्या ब्रह्माची उपासना केली पाहिजे. अशा प्रकारच्या ब्रह्माची जो उपासना करतो त्याची सर्व प्राणिमात्र प्रार्थना करतात. ३१.६.

॥ ३२ ॥ ७ ॥ तस्यै तपो दमः कर्मेति प्रतिष्ठा वेदाः सर्वाङ्गानि सत्यमायतनम् ॥ ३३ ॥ ८ ॥ यो वा एतामेवं वेदापहत्य पाप्मानमनन्ते स्वर्गे लोके ज्येये प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति ॥ ३४ ॥ ९ ॥ इति चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

ॐ आप्यायन्तु ममाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणं मेऽस्त्वनि-

"मला उपनिषदांचें रहस्य सांग" अशी तूं प्रार्थना केल्या-वरून तुला उपनिषत् सांगितली. ब्राह्मी ह्मणजे ब्रह्माच्या [ परमात्म्याच्या ] संबंधाची उपनिषत् मीं सांगितली. ३२.७. त्या उपनिषदेची प्राप्ति होण्याला तप [ शरीर, इंद्रियें व मन यांचें समाधान ], दम, कर्म [ अग्निहोत्रादि ] हे उपाय [ आधार ] आहेत. वेद, वेदाचीं अंगें [ शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ], सत्य हेंहि ब्रह्मविद्येचे आधार आहेत. ३३.८. जो या ब्रह्मविद्येला वर लिहिलेल्या

राकरणं मेऽस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ इति सामवेदीयकेनोपनिषत्समाप्ता ॥

---

## कठोपनिषत् ॥ ३ ॥



ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ॥ उशन् ह वै वाजश्रवसः सर्ववेदसं ददौ ॥ तस्य

प्रकारें जाणतो तो मृत्युलोकाला कारण जी अविद्या तिचा नाश करून अंतीं सर्वांत श्रेष्ठ अशा स्वर्गलोकामध्यें ह्मणजे सुखात्मक ब्रह्मामध्यें कायमचा रहातो [ पुन्हां संसाराला येत नाहीं ].३४.९. इति चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

**॥ इति केनोपनिषत्समाप्ता ॥**

ह नचिकेता नाम पुत्र आस ॥ १ ॥ तꣳह कुमारꣳसन्तं
दक्षिणासु नीयमानासु श्रद्धाविवेश सोऽमन्यत ॥ २ ॥
पीतोदका जग्धतृणा दुग्धदोहा निरिन्द्रियाः ॥ अनन्दा नाम

## कठोपनिषत्.

### अध्याय पहिला.



आह्मीं (दोघांनीं) एकत्र रहावें, एकत्र सेवन करावें, एकत्र सामर्थ्य संपादन करावें. आमचें अध्ययन आह्मांला तेजस्वी करणारें असावें, आमच्याकडून एकमेकांचा द्वेष न घडो.

अशी आख्यायिका आहे कीं, वाजश्रवाचा पुत्र वाजश्रवस यानें फलाची इच्छा धरून ( विश्वजित् नामक यज्ञ केला व त्या यज्ञामध्यें ) सर्व धन दान केलें. त्याला नाचिकेता ( नचिकेतस् ) नांवाचा पुत्र होता. १. कुमारवयामध्यें असतांना त्याच्या अंतःकरणांत श्रद्धा उत्पन्न झाली. ऋत्विजांना दक्षिणा दिलेल्या गाई ते घेऊन जात असतां त्याच्या अंतःकरणांत श्रद्धा उत्पन्न झाली. तो विचार करूं लागला, ज्यांनीं उदक प्राशन केलें आहे, तृण खाल्लें आहे, ज्यांच्या दुधाचें दोहन केलें आहे, ज्यांचीं इंद्रियें जीर्ण आहेत, अशा गाई

ते लोकास्तान्स गच्छति ता ददत् ॥ ३ ॥ स होवाच पितरं तत कस्मै मां दास्यसीति ॥ द्वितीयं तृतीयं तꣳहोवाच मृत्यवे त्वा ददामीति ॥ ४ ॥ बहूनामेमि प्रथमो बहूनामेमि मध्यमः ॥ किꣳस्विद्यमस्य कर्तव्यं यन्मयाद्य करिष्यति ॥ ५ ॥ अनुपश्य यथा पूर्वे प्रति-

दान देणारा यजमान अनन्द ( ह्मणजे ज्या ठिकाणीं सुख नाहीं अशा ) लोकाप्रत जातो. २.३. ( आपल्या पित्याला असें वाईट फल प्राप्त होणार हें पाहून तें निवारण करावें या इच्छेनें ) नचिकेता आपल्या पित्याला ह्मणाला, " माझें दान तूं कोणत्या ऋत्विजाला करणार ? " ( पित्यानें उत्तर दिलें नाहीं ह्मणून ) त्यानें दुसऱ्यानें व तिसऱ्यानें हाच प्रश्न केला. ( तेव्हां क्रुद्ध होऊन ) पिता ह्मणाला, " मी तुला मृत्यूला देणार आहें." ४. ( हें ऐकून नचिकेता आपल्या मनाशीं विचार करूं लागला, ) पुष्कळांपेक्षां चांगल्या प्रकारानें (ह्मणजे शिष्यरूपानें ) मी मृत्यूकडे जात आहें; निदान पुष्कळांच्या मानानें मध्यम प्रकारानें तरी मी मृत्यूकडे जात आहें;

पश्य तथा परे ॥ सस्यमिव मर्त्यः पच्यते सस्यमिवाजा-
यते पुनः ॥ ६ ॥ वैश्वानरः प्रविशत्यतिथिर्ब्राह्मणो गृहान् ॥
तस्यैताꣳ शान्तिं कुर्वन्ति हर वैवस्वतोदकम् ॥ ७ ॥

(अधम प्रकारानें ह्मणजे पापकर्मांचीं फळें भोगण्याकरितां मी जात नाहीं); यमाचें माझ्या संबंधानें काय बरें प्रयोजन असावें कीं जें तो आतां करील! ५. (नचिकेता आपल्या पित्याला ह्मणतो,) पूर्वींच्या काळच्या लोकांकडे पहा आणि सांप्रतच्या काळच्या लोकांकडे पहा मनुष्य तृणाप्रमाणें नाश पावतो आणि तृणाप्रमाणेंच पुन्हां उत्पन्न होतो. ६. (पित्यानें नचिकेताला यमाकडे पाठविलें. यम यमलोकीं नव्हता, तो तीन दिवसांनीं आला. तोंपर्यंत नचिकेताला यमाचे द्वारीं थांबावें लागलें. यम आल्यावर आपल्या सेवकांना ह्मणाला—) ब्राह्मण अतिथि गृहामध्यें वैश्वानराप्रमाणें प्रवेश करतो [ह्मणजे गृह जणूं काय दहन करतो]. याकरितां लोक पाद्य, आसनादि देऊन अतिथीची शान्ति करतात. ह्मणून नचिकेताला पाद्य देण्यासाठीं वैवस्वत

आशाप्रतीक्षे सङ्गत॑ सूनृतां चेष्टापूर्ते पुत्रपशूँश्च सर्वान् एतद्वृङ्क्ते पुरुषस्याल्पमेधसो यस्यानश्नन्वसति ब्राह्मणो गृहे ॥ ८ ॥ तिस्रो रात्रीर्यदवात्सीर्गृहे मेऽनश्नन्ब्रह्मन्नातिथिर्नमस्यः ॥ नमस्तेऽस्तु ब्रह्मन्स्वस्ति मेऽस्तु तस्मात्प्रति

उदक आण. ७. ज्या अल्पबुद्धि पुरुषाच्या घरीं ब्राह्मण अतिथि उपाशीं रहातो त्याच्या आशा [ कनकाचलादिकांसारखी अनिर्ज्ञेय वस्तु प्राप्त व्हावी अशी प्रार्थना ], प्रतीक्षा [ राज्यादिकांसारखी प्रत्यक्ष ज्ञात वस्तु कधीं प्राप्त होते याची वाट पहाणें ], आशा व प्रतीक्षा या दोहोंनीं प्राप्त होणारें फल, प्रिय भाषण, यज्ञादिकांपासून प्राप्त होणारें स्वर्गादि फल, आरामादि क्रियांपासून प्राप्त होणारें पितृलोकादि फल, पुत्र, पशु इत्यादि सर्व वस्तु नाश पावतात. ८. यम नचिकेताला ह्मणाला, ज्या अर्थीं वंदन करण्याला योग्य असा तूं ब्राह्मण अतिथि तीन अहोरात्र माझ्या घरीं उपाशीं राहिलास, त्या अर्थीं हे ब्रह्मन् तुला मी नमस्कार करतों. माझें कल्याण असावें याकरितां प्रत्येक दिवसाबद्दल एक याप्रमाणें तीन वर माझ्यापाशीं

त्रीन्वरान्वृणीष्व ॥ ९ ॥ शान्तसंकल्पः सुमना यथा स्याद्वीतमन्युर्गौतमो माभिमृत्यो ॥ त्वत्प्रसृष्टं माभिवदेत्प्रतीत एतत्त्रयाणां प्रथमं वरं वृणे ॥ १० ॥ यथा पुरस्ताद्भविता प्रतीत औद्दालकिरारुणिर्मत्प्रसृष्टः ॥ सुखꣳरात्रीः शयिता वीतमन्युस्त्वां ददृशिवान्मृत्युमुखात्प्रमुक्तम् ॥ ११ ॥ स्वर्गे लोके न भयं किंचनास्ति न तत्र त्वं न

भाग. ९. ( नचिकेतस् संतुष्ट होऊन ह्मणाला, ) हे मृत्यो, माझा पिता गौतम माझ्या संबंधानें शांतचित्त, प्रसन्नहृदयी व विगतक्रोध होवो; आणि तूं मला परत पाठविल्यानें पूर्वींची स्मृति झाल्यावर तो कांहीं न बोलो. हा मी तीन वरांपैकीं पहिला वर मागतों. १०. यम ह्मणाला, तुझा पिता अरुणकुलोत्पन्न जो औद्दालकि तो पूर्वींची स्मृति झाल्यावर देखील पूर्वी जसा होता तसाच माझ्या आज्ञेनें होईल. मृत्युमुखापासून मुक्त झालेल्या तुला पाहिल्यानंतरहि पूर्वींप्रमाणें तो रात्रीं सुखानें झोंप घेणारा व विगतक्रोध असा होईल. ११. नचिकेता ह्मणाला, स्वर्गलोकामध्यें कोणतेंहि भय नाहीं; तेथें

जरया बिभेति ॥ उभे तीर्त्वाशनायापिपासे शोकातिगो मोदते स्वर्गलोके ॥ १२ ॥ स त्वमग्निꣳ स्वर्ग्यमध्येषि मृत्यो प्रब्रूहि तꣳ श्रद्दधानाय मह्यम् ॥ स्वर्गलोका अमृतत्वं भजन्त एतद्द्वितीयेन वृणे वरेण ॥ १३ ॥ प्र ते ब्रवीमि तदु मे निबोध स्वर्ग्यमग्निं नचिकेतः प्रजानन् ॥

तुझा प्रभाव नाहीं, ह्मणून जरा प्राप्त झाली असतां इहलोकावर जसे लोक भय पावतात तसे स्वर्गामध्ये भय पावत नाहींत. क्षुधा आणि पिपासा यांचें अतिक्रमण करून शोकाच्या पलीकडे गेलेले जन स्वर्गलोकामध्यें आनंद पावतात. १२. हे मृत्यो, अशा स्वर्गाला नेणारा जो अग्नि त्याचें ज्ञान तुला आहे. ( स्वर्गाची इच्छा करणारा ) श्रद्धावन्त जो मी त्या मला तूं अग्नीचें ज्ञान कथन कर. स्वर्ग हें ज्यांना फल प्राप्त होतें असे यजमान अग्नीच्या योगानें देवत्व पावतात. हें अग्नीचें ज्ञान मी दुसऱ्या वरानें मागतों. १३. यम ह्मणाला, हे नचिकेता, स्वर्ग प्राप्त करून देणारा अग्नि जाणणारा मी तें अग्निज्ञान तुला सांगतों. एकाग्र होऊन जाण. ज्याला अन्त नाहीं

अनन्तलोकाप्तिमथो प्रतिष्ठां विद्धि त्वमेतन्निहितं गुहायाम् ॥ १४ ॥ लोकादिमग्निं तमुवाच तस्मै या इष्टका याव-तीर्वा यथा वा ॥ स चापि तत्प्रत्यवदद्यथोक्तमथास्य मृत्युः पुनरेवाह तुष्टः ॥ १५ ॥ तमब्रवीत्प्रीयमाणो महात्मा वरं तवेहाद्य ददामि भूयः ॥ तवैव नाम्ना भवितायमग्निः

अशा स्वर्गलोकाची प्राप्ति करून देणारा अग्नि आहे, अग्नि सर्व जगताचा आधार आहे. अग्नीचें मी तुला जें ज्ञान सांगतों आहें तें अति गूढ आहे (विद्वानांचीच बुद्धि तें जाणूं शकते). १४. सर्व लोकांमध्यें प्रथम उत्पन्न झालेला जो अग्नि त्याबद्दल यमानें नाचिकेताला सर्व ज्ञान सांगितलें. इष्टका कोणत्या आहेत, किती आहेत व त्यांनीं अग्नि कसा उत्पन्न करावयाचा इत्यादि ज्ञान सांगितलें. यमानें जसें सांगितलें तसा त्याचा नाचिकेतानें पुनरुच्चार केला. तेव्हां यम संतुष्ट होऊन नचिके-ताला पुन्हां ह्मणाला नचिकेतावर संतुष्ट झालेला तो महात्मा ह्मणाला, मी तुला आतां आणखी एक वर देतों तो हा–हा अग्नि तुझ्या नांवानें यापुढें प्रसिद्ध होईल; ह्मणजे या अग्नीला आतां

सृंकां चै मामनेकरूपां गृहाण ॥ १६ ॥ त्रिणाचिकेत-
स्त्रिभिरेत्य सन्धिं त्रिकर्मकृत्तरति जन्ममृत्यू ॥ ब्रह्मजज्ञं
देवमीड्यं विदित्वा निचाय्येमाꣳ शान्तिमत्यन्तमेति ॥ १७॥
त्रिणाचिकेतस्त्रयमेतद्विदित्वा य एवं विद्वाꣳश्चिनुते नाचि-

नाचिकेत अग्नि असें ह्मणतील. अनेक रूपांनीं युक्त अशी ही शब्दवती रत्नमयी माला घे. १५. १६. मातृमान्, पितृमान् आणि आचार्यवान् अशा तीन संबंधांनीं युक्त होत्साता इज्या, अध्ययन आणि ज्ञान हीं तीन कर्मै करणारा ज्याप्रमाणें जन्म-मृत्यु तरतो त्याप्रमाणें तीन वेळां नाचिकेत अग्नीचें जो अनुष्ठान करतो तो जन्ममृत्यु तरून पलीकडे जातो. हिरण्यगर्भापासून उत्पन्न झालेला, ज्ञाता, प्रकाशमान्, पूज्य अशा या अग्नीचें ज्ञान—आत्मरूपानें दर्शन—झालें असतां अत्यंत श्रेष्ठ असें विराजफल प्राप्त होतें. १७. यज्ञाच्या इष्टकांचें ज्ञान झालेला जो तीन वेळां नाचिकेत अग्नीचें अनुष्ठान करतो, तो ज्याप्रमाणें मृत्यूच्या पाशांचा नाश करून स्वर्गलोकीं आनंद पावतो त्याप्रमाणें आत्मस्वरूपी अग्नीचें ज्ञान करून

केतम् ॥ स मृत्युपाशान्पुरतः प्रणोद्य शोकातिगो मोदते स्वर्गलोके ॥ १८ ॥ एष तेऽग्निर्नचिकेतः स्वर्ग्यो यमवृणीथा द्वितीयेन वरेण ॥ एतमग्निं तवैव प्रवक्ष्यन्ति जनासस्तृतीयं वरं नचिकेतो वृणीष्व ॥ १९ ॥ येयं प्रेते विचिकित्सा मनुष्येऽस्तीत्येके नायमस्तीति चैके ॥ एत-

घेऊन जो नाचिकेत अग्नीचें अनुष्ठान करतो तो अज्ञान, प्रीति, द्वेष इत्यादि लक्षणांनीं युक्त अशा मृत्युपाशांचा (इहलोकीं) मृत्यु येण्याच्या अगोदरच नाश करून शोकवियुक्त (ह्मणजे मानसिक दुःखानें वियुक्त) होत्साता विराट् स्वरूपाच्या ज्ञानामध्यें आनंद पावतो. १८. हे नचिकेतस्, तूं दुसरा वर ह्मणून जो वर मागितलास तो स्वर्गसाधनरूप असा अग्नि मीं तुला सांगितला. या अग्नीला (आतां) लोक तुझ्या नांवानें ओळखतील. हे नचिकेतस्, आतां तिसरा वर माग. १९. नचिकेतस् ह्मणाला, मनुष्य मरण पावला ह्मणजे (शरीर, इंद्रिय, मन, बुद्धि यांहून व्यतिरिक्त असा) आत्मा आहे असें कोणी ह्मणतात, असा

द्विद्यामनुशिष्टस्त्वयाहं वराणामेष वरस्तृतीयः ॥ २० ॥
देवैरत्रापि विचिकित्सितं पुरा न हि सुविज्ञेयमणुरेष धर्मः॥
अन्यं वरं नचिकेतो वृणीष्व मा मोपरोत्सीरति मा सृजै-
नम् ॥ २१ ॥ देवैरत्रापि विचिकित्सितं किल त्वं च
मृत्यो यन्न सुविज्ञेयमात्थ ॥ वक्ता चास्य त्वादृगन्यो न

आत्मा नाहीं असेंहि कोणी ह्मणतात. हा एक संशय आहे. तूं समजावून सांगितलेंस ह्मणजे मला याचें ज्ञान होईल. माझ्या वरांपैकीं हा तिसरा वर आहे. २०. यम ह्मणाला, यासंबंधाचा संशय देवांना देखील पूर्वीं आला होता. हा आत्मा नांवाचा धर्म [ पदार्थ ] सूक्ष्म आहे; याकरितां ( प्राकृत जनांना हा ) चांगल्या प्रकारें समजत नाहीं. हे नचिकेतस् तूं दुसरा वर पसंत कर. ( हा वर देण्याचा ) मला तूं आग्रह करूं नकोस. मला हा वर सोडून दे.” २१. “हे मृत्यो, ज्या अर्थीं देवांना देखील याविषयीं संशय पडला होता आणि ज्या अर्थीं हा चांगल्या प्रकारें समजत नाहीं असें तूं सांगतोस, त्या अर्थीं हा आत्म-रूपी धर्म समजावून देणारा तुझ्यावांचून दुसरा कोणी नाहीं

लभ्यो नान्यो वरस्तुल्य एतस्य कश्चित् ॥ २२ ॥ शता-
युषः पुत्रपौत्रान्वृणीष्व बहून्पशून्हस्तिहिरण्यमश्वान् ॥
भूमेर्महदायतनं वृणीष्व स्वयं च जीव शरदो यावदिच्छसि
॥ २३ ॥ एतत्तुल्यं यदि मन्यसे वरं वृणीष्व वित्तं चिरजी-
विकां च ॥ महाभूमौ नचिकेतस्त्वमेधि कामानां त्वा काम-
भाजं करोमि ॥२४॥ ये ये कामा दुर्लभा मर्त्यलोके सर्वा-
न्कामांश्छन्दतः प्रार्थयस्व ॥ इमा रामाः सरथाः सतूर्या

आणि या वरासारखा दुसरा कोणता वरहि नाहीं." २२. यम ह्मणाला, शंभर वर्षे असणारे पुत्र, पौत्र, माग; हत्ती, घोडे वगैरे पुष्कळ पशु, पुष्कळ सुवर्ण माग; पृथ्वीवर विस्तीर्ण असें राज्य माग; आणि तुझी जितकी इच्छा असेल तितकीं वर्षें तूं जग. २३. यांसारखा दुसराहि एखादा वर तुला वाटत असेल तर माग; संपत्ति माग; दीर्घायुष्य माग; हे नचिकेतस्, विस्तीर्ण अशा भूमीवर तूं राजा हो. इच्छेनुसार सर्व इच्छा भोगणारा असा मी तुला करतों. २४. मृत्युलोकामध्यें जे जे दुर्लभ मनोरथ तुला पाहिजे

न हीदृशा लम्भनीया मनुष्यैः ॥ आभिर्मत्प्रत्ताभिः परिचारयस्व नचिकेतो मरणं मानुप्राक्षीः ॥ २५ ॥ श्वो भावा मर्त्यस्य यदन्तकैतत्सर्वेन्द्रियाणां जरयन्ति तेजः ॥ अपि सर्वं जीवितमल्पमेव तवैव वाहास्तव नृत्यगीते ॥ २६ ॥ न

असतील ते ते सर्व तुझ्या इच्छेप्रमाणें मजपाशीं माग या अशा नितंबवती आणि हातांमध्यें तूर्य वाद्य धारण करणाऱ्या दिव्य स्त्रिया आहेत. मनुष्यांना ( माझ्या कृपेवांचून ) अशा मिळणें शक्य नाहीं. मी ( मृत्युलोकीं ) यांना पाठवितों. तूं त्यांच्याकडून सेवा करून घे. हे नचिकेतस्, मरणासंबंधाचा प्रश्न तूं विचारूं नकोस. २५. नचिकेतस् ह्मणाला, हे मनुष्यांचा अंत करणाऱ्या मृत्यो, हे सर्व भोग आज आहेत आणि उद्यां नाहींत अशा प्रकारचे ( क्षणिक ) आहेत. हे भोग सर्व इंद्रियांचें तेज क्षीण करतात. ( मला तूं दीर्घायुष्य देणार ह्मणतोस तर ) जेवढें ह्मणून ( प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचें देखील ) आयुष्य तेवढें सर्व अल्प आहे, ( मग माझें आयुष्य दीर्घ कसलें ? ) तुझ्या नितंबवती अप्सरा राहोत आणि

वित्तेन तर्पणीयो मनुष्यो लप्स्यामहे वित्तमद्राक्ष्म चेत्त्वा ॥ जीविष्यामो यावदीशिष्यसि त्वं वरस्तु मे वरणीयः स एव ॥ २७ ॥ अजीर्यताममृतानामुपेत्य जीर्यन्मर्त्यः क्वधःस्थः प्रजानन् ॥ अभिध्यायन्वर्णरतिप्रमोदानतिदीर्घे जीविते को रमेत ॥ २८ ॥ यस्मिन्निदं विचिकित्सन्ति

त्यांचीं तीं नृत्यगीतेंहि राहोत. २६. धनानें मनुष्याची तृप्ति होत नाहीं. तुझें दर्शन असलें ह्मणजे मला (पाहिजे असेल तितकें) धन मिळेल. जोंपर्यंत तूं मरणाचा नियन्ता आहेस तोंपर्यंत मला आयुष्यहि मिळेल. (पण) मला तोच एक वर मागावयाचा आहे. २७. जरा व मरण यांनीं युक्त असलेला, खालीं पृथ्वीवर रहाणारा, कोणता प्राणी गायन [वर्णः], रति व यांपासून होणारा आनंद हीं सर्व (नाशयुक्त आहेत असें) पाहिल्यावर आणि अजर व अमर अशा देवांकडे जाऊन यांहून उत्कृष्ट प्राप्तव्य आहे असें ज्ञान प्राप्त झाल्यावर अतिदीर्घ जीवितामध्यें रममाण होईल ? २८. हे मृत्यो, ज्या आत्म्याविषयीं (शाश्वत आहे कीं अशाश्वत

मृत्यो यत्साम्पराये महति ब्रूहि नस्तत् ॥ योऽयं वरो गूढ-मनुप्रविष्टो नान्यं तस्मान्नचिकेता वृणीते ॥ २९ ॥ इति प्रथमेऽध्याये प्रथमा वल्ली ॥ १ ॥

अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयस्ते उभे नानार्थे पुरुषꣳसिनीतः ॥ तयोः श्रेय आददानस्य साधु भवति हीयतेऽर्थाद्य उ प्रेयो वृणीते ॥ १ ॥ श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमे-

आहे ) अशा प्रकारें चिकित्सा करितात, त्या आत्म्याचें महत्त्वाच्या [ महति ] अशा परलोकासंबंधाचें [ सांपराये ] जें ( निर्णायक ज्ञान ) तें मला सांग. गहन विवेचनाचा विषय झालेला जो हा वर त्याहून दुसरा वर मी नचिकेतस् मागत नाहीं. २९. इति प्रथमाध्याये प्रथमा वल्ली.

श्रेय [ विद्या ] वेगळें आहे आणि प्रेय [ अविद्या ] वेगळें आहे. हीं दोन भिन्न अर्थ प्राप्त करून देणारीं आहेत. या दोघांनीं मनुष्य बद्ध आहे. या दोहोंपैकीं श्रेयाचा स्वीकार करणाराचें कल्याण होतें; जो प्रेयाचा स्वीकार करतो त्याला पुरुषार्थसिद्धि प्राप्त होत नाहीं. १. श्रेय आणि प्रेय हीं दोन

तस्तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ॥ श्रेयो हि धीरोऽभि-
प्रेयसो वृणीते प्रेयो मन्दो योगक्षेमाद्वृणीते ॥ २ ॥ स त्वं
प्रियान्प्रियरूपाꣳश्च कामानभिध्यायन्नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥
नैताꣳसृङ्कां वित्तमयीमवाप्तो यस्यां मज्जन्ति बहवो मनुष्याः
॥ ३ ॥ दूरमेते विपरीते विषूची अविद्या या च विद्येति
ज्ञाता ॥ विद्याभीप्सिनं नचिकेतसं मन्ये न त्वा कामा

मनुष्यापुढें प्राप्त झालेलीं आहेत. बुद्धिमान् मनुष्य [ धीरः ] त्यांची योग्य परीक्षा करून त्यांचें पृथक्करण करतो. बुद्धिमान् मनुष्य प्रेयाहून श्रेय पसंत करतो; आणि मंद मनुष्य ( शरीरादि ) प्राप्त वस्तूंचें [ योग ] रक्षण करण्यास [ क्षेम ]साधन ह्मणून प्रेय पसंत करतो. २. ( पण ) हे नचिकेतस्, प्रिय असलेल्या आणि प्रिय वाटणाऱ्या इच्छांचा तूं विचारपूर्वक [ अभिध्यायन् ] त्याग करीत आहेस. अनेक मनुष्यांचा नाश करणाऱ्या [ मज्जन्ति ] या वित्तरूपी मार्गाला [ सृंकां ] तूं गेला नाहींस ( सारांश तूं मंद नसून बुद्धिमान् आहेस ). ३. ( हीं श्रेय आणि प्रेय ) ज्यांना ( अनुक्रमें ) विद्या व अविद्या

बहवो लोलुपन्तः ॥ ४ ॥ अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितंमन्यमानाः ॥ दन्द्रम्यमाणाः परियान्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥ ५ ॥ न सांपरायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् ॥ अयं लोको

ह्मणतात तीं ( एकमेकांपासून फार ) दूर, विरुद्ध ( प्रकारचीं ) आणि भिन्न फल देणारीं [ विषूची=भिन्न गति असलेलीं ] आहेत. हे नचिकेतस्, ( ज्याअर्थीं ) नानाप्रकारचे काम तुला लुब्ध करूं शकले नाहींत ( त्याअर्थीं ) तूं विद्येची [ श्रेयाची=मोक्षसाधनाची ] इच्छा करणारा आहेस हें मीं जाणलें. ४. अविद्येच्या मध्यें ( गुरफटून ) असलेले, स्वतःला बुद्धिमान् आणि शास्त्रकुशल समजणारे, नानाप्रकारच्या मार्गांनीं जाणारे [ दंद्रम्यमाणाः ] मूढ लोक ( जन्ममरणादि अनेक दुःखांभोंवतीं ) घिरट्या घालतात. ज्याप्रमाणें आंधळ्यांनींच आंधळ्यांना मार्ग दाखविला असतां त्यांची जशी स्थिति होते तद्वत्. ५. प्रमादशील आणि वित्तमोहानें मूढ झालेल्या विवेकहीन मनुष्याला [ बालं ], परलोकाच्या प्राप्तीचें साधन

नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ॥ ६ ॥
श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृवन्तोऽपि बहवो यं न
विद्युः ॥ आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता
कुशलानुशिष्टः ॥ ७ ॥ न नरेणावरेण प्रोक्त एष सुवि-
ज्ञेयो बहुधा चिन्त्यमानः ॥ अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्त्य-

[ सांपरायः ] दिसत नाहीं. हाच लोक आहे, दुसरा नाहीं, असें मानणारा तो (मूढ) पुन्हां पुन्हां माझ्या तावडींत सांपडतो. ६. (कारण) हा (आत्मा व तद्विषयक ज्ञान ज्याविषयीं तूं मला विचारीत आहेस तें) पुष्कळांना श्रवण करण्यास देखील मिळत नाहीं; श्रवण करणारांपैकीं पुष्कळांना याचें ज्ञान होत नाहीं. (याचें ज्ञान) सांगणारा एखादाच असतो; याचें चांगलें ज्ञान प्राप्त झालेला देखील क्वचित्च असतो; (कारण) याविषयीं पूर्ण ज्ञान असलेल्या ज्ञात्यानें उपदिष्ट असा ज्ञाता एखादाच आढळतो. ७. या आत्म्या-विषयीं सामान्य बुद्धीच्या [ अवरेण ] मनुष्याला कांहीं सांगतां येत नाहीं. नानाप्रकारांनीं ज्याचा विचार करताल

^णु णीयान्ह्यतर्क्यमनुप्रमाणात् ॥ ८ ॥ नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ ॥ यां त्वमापः सत्यधृतिर्बतासि त्वादृङ्नो भूयान्नचिकेतः प्रष्टा ॥ ९ ॥ जानाम्यहꣳ शेवधिरित्यनित्यं न ह्यध्रुवैः प्राप्यते हि ध्रुवं तत् ॥

तो हा ( आत्मा ) जाणण्यास सुलभ नाहीं. मी आत्म्याहून भिन्न नाहीं असें जाणणाऱ्या ज्ञानी मनुष्यानें [ अनन्यः ] याविषयीं [ अत्र ] उपदेश केला असतां याचा नाना प्रकारचा विचार नाहींसा होतो [ ह्य० यथार्थ ज्ञान प्राप्त होतें ]. सूक्ष्माहून देखील सूक्ष्म अशा या आत्म्याचें ज्ञान तर्कानें होत नाहीं. ८. ( आत्म्याविषयींचें ) हें ज्ञान तर्कानें प्राप्त होणें [ आपनेया ] शक्य नाहीं. हे प्रियतमा, ( तार्किकाहून ) इतर अशा ज्ञात्यानेंच हें ज्ञान सांगितलें असतां चांगलें समजतें. हें ज्ञान तुला प्राप्त होत आहे.खरोखर तूं सत्यनिष्ठ आहेस. हे नचिकेतस्, तुझ्यासारखा विचारणारा ( शिष्य ) मला असावा. ९. हे नचिकेतस्, ( कर्मफलरूपी ) निधि [ शेवधिः ] अनित्य आहे हें ( आतां ) मला समजलें.

ततो मया नाचिकेतश्चितोऽग्निरनित्यैर्द्रव्यैः प्राप्तवानस्मि नित्यम् ॥ १० ॥ कामस्याप्तिं जगतः प्रतिष्ठां क्रतोरानन्त्यमभयस्य पारम् ॥ स्तोमं महदुरुगायं प्रतिष्ठां दृष्ट्वा धृत्या धीरो नचिकेतोऽत्यस्राक्षीः ॥ ११ ॥ तं दुर्दर्शं गूढमनुप्रविष्टं गुहाहितं गह्वरेष्ठं पुराणम् ॥ अध्यात्मयोगाधि-

कारण, अनित्य साधनांनीं तो नित्य असा निधि ( परमात्मा ) प्राप्त होत नाहीं. मीं अनित्य द्रव्यांनीं अग्नीचें हवन केलें. ह्मणून मला ( हें माझ्या पूर्वीच्या समजुतीप्रमाणें ) नित्य ( पण वस्तुतः अनित्य असें पद ) प्राप्त झालें. १०. हे नचिकेतस्, धैर्ययुक्त अशा तूं, सर्व इच्छांचा शेवट, जगताचा आश्रय, उपासनेचें फल, अभयाचें पैलतीर, स्तवन करण्यास योग्य, मोठें आणि विस्तीर्ण गति असलेलें असें परमात्मपद हेंच आपलें ( शाश्वत ) अंतिम [ प्रतिष्ठा ] आहे असें जाणून [ दृष्ट्वा ] (सर्व संसारभोगांचा) त्याग केलास ! ( तूं धन्य आहेस !) ११. दिसण्यास कठिण, गहन, ( अज्ञानानें ) आच्छादिलेला, बुद्धीच्या [गुहा] ठिकाणीं स्थित, अनेक संक-

गमेन देवं मत्वा धीरो हर्षशोकौ जहाति ॥ १२ ॥ एत-च्छ्रुत्वा संपरिगृह्य मर्त्यः प्रवृह्य धर्म्यमणुमेतमाप्य ॥ स मोदते मोदनीयꣳ हि लब्ध्वा विवृतꣳ सद्म नचिकेतसं मन्ये ॥ १३ ॥ अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मादन्यत्रास्मात्कृता-

टांनीं प्राप्त होणारा, प्राचीन, असा तो ( परम ) आत्मा [ देवः ] ( विषयांपासून पराङ्मुख करून ) चित्ताचा आत्म्याचे ठिकाणीं लय केल्यानें ज्ञात होतो. असें ज्ञान झाल्यावर [=साक्षात्कार झाल्यावर ] बुद्धिमान् मनुष्य हर्ष व शोक या दोहोंचाहि त्याग करतो. १२. हें ( आत्मज्ञान ) श्रवण करून, याचें योग्य ग्रहण करून [ मनन ], धर्मरूप अशा याचें [ आत्म्याचें ] ( शरीरापासून ) पृथक्करण करून [ निदिध्यासन ] सूक्ष्मरूप अशा याची प्राप्ति [ साक्षात्कार ] झाल्यावर तो मनुष्य ( अत्यंत ) आनंददायक अशा वस्तूची प्राप्ति झाल्यामुळें आनंद पावतो. करितां, हे नचिकेतस् तुझ्या -करितां ( ब्रह्मज्ञानरूपी ठिकाणाचें ) दारच उघडलें आहे असें मला वाटतें. १३. ( नचिकेतस् ह्मणाला, ) ( तर मग

कृतात् ॥ अन्यत्र भूताच्च भव्याच्च यत्तत्पश्यसि तद्वद
॥ १४ ॥ सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि
च यद्वदन्ति ॥ यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं
संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ॥ १५ ॥ एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म
एतदेवाक्षरं परम् ॥ एतद्ध्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति
तस्य तत् ॥ १६ ॥ एतदालम्बनं श्रेष्ठमेतदालम्बनं

शास्त्रयुक्त ) कर्माच्या देखील पलीकडचें, अधर्माच्या पलीकडचें, या कार्य व कारण यांच्या पलीकडचें, भूत व भविष्य यांच्या पलीकडचें असें जें तूं जाणतोस तें मला सांग. १४. ( यम ह्मणाला, ) सर्व वेद ज्या पदाचें प्रतिपादन करतात सर्व तपें जें ( प्राप्तव्य आहे ह्मणून ) सांगतात, ज्याच्या ( प्राप्तीच्या ) इच्छेनें ब्रह्मचर्याचें आचरण करतात तें पद, मी तुला थोडक्यांत सांगतों, ॐ [ ॐकारवाच्य ब्रह्मास्मि मी ब्रह्म आहे हें ज्ञान ] हें आहे. १५. हेंच अक्षर ( अपर ) ब्रह्म आहे, हेंच अक्षर पर [=श्रेष्ठ ] ( ब्रह्म ) आहे. हेंच अ-क्षर [=शाश्वत ] ( ब्रह्म ) जाणलें ह्मणजे ज्याला ज्याची [ अपर

परम् ॥ एतदालम्बनं ज्ञात्वा ब्रह्मलोके महीयते ॥ १७ ॥ न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित् ॥ अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ १८ ॥ हन्ता चेन्मन्यते हन्तुꣳहतश्चेन्मन्यते हतम् ॥ उभौ तौ न विजानीतो नायꣳहन्ति न हन्यते

ब्रह्माची अथवा पर ब्रह्माची ] इच्छा होते तें त्याला प्राप्त होतें. १६. ( आतां ओंकाररूप आत्म्याचें साक्षात् स्वरूप सांग तात—) ज्ञानी मनुष्य जन्म पावत नाहीं अथवा मरण पावत नाहीं; ( कारण, आत्मा ) कोठून आलेला नाहीं अथवा ( स्वतःहून भिन्न असा ) कोणी नाहीं. हा जन्मरहित, नित्य, क्षयरहित व वृद्धिरहित आहे. शरीराचा वध झाला असतां याचा वध होत नाहीं. १८. मारणारा ( मनुष्य ) जर समजेल कीं मी याला [ आत्म्याला ] मारीन, मेलेला (मनुष्य) जर समजेल कीं हा ( आत्मा ) मेला, तर त्या दोघांनाहि कांहीं समजत नाहीं. हा ( आत्मा कोणाला ) मारीत नाहीं आणि ( कोणाकडून ) मारला जात नाहीं. १९. या ( ब्रह्म-

॥ १९ ॥ अणोरणीयान्महतो महीयानात्मास्य जन्तोर्नि-
हितो गुहायाम् ॥ तमक्रतुः पश्यति वीतशोको धातुः
प्रसादान्महिमानमात्मनः ॥ आसीनो दूरं व्रजति शयानो
याति सर्वतः ॥ कस्तं मदामदं देवं मदन्यो ज्ञातुमर्हति
॥ २० ॥ अशरीरꣳशरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् ॥ महान्तं
विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥ २१ ॥ नायमात्मा

देवापासून गवताच्या काडीपर्यंत सर्व ) प्राणिमात्राचा, सूक्ष्मा-हून अधिक सूक्ष्म व स्थूलाहून अधिक स्थूल असा आत्मा हृदयामध्यें [ गुहायाम् ] स्थित आहे. आत्म्याचा हा महिमा इंद्रियांच्या प्रसन्नतेमुळें [ धातुप्रसादात् ] निष्काम [ अक्रतुः ] मनुष्य जाणतात; ( व तेणेंकरून ) ते शोकरहित होतात. २०. ( एरवीं सकाम प्राकृत मनुष्यांना हा ज्ञेय नाहीं. कारण, ) स्थित असतां तो दूर जातो, एके ठिकाणीं असून तो सर्वत्र गमन करतो. मदयुक्त व मदरहित अशा ( विरुद्ध-गुणयुक्त ) त्या दिव्य आत्म्याला माझ्यावांचून इतर कोण जाणूं शकणार आहे? २१. ( स्वतः ) शरीररहित असून अनित्य [ अनव-

प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ॥ यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ॥ २२ ॥ नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः ॥ नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥ २३ ॥ यस्य ब्रह्म च क्षत्रं च उभे भवत ओदनः ॥ मृत्युर्यस्योपसेचनं क

स्थेषु ] अशा शरीरांमध्यें रहाणाऱ्या त्या महान् व सर्वव्यापी आत्म्याला ( तो मीच आहें असें ) जाणून बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं. २२. हा आत्मा ( आत्मज्ञानाव्यतिरिक्त ) शास्त्रश्रवणानें प्राप्त होत नाहीं, बुद्धीनें समजत नाहीं, पुष्कळ श्रवणानें प्राप्त होत नाहीं. ज्या ( स्वतःच्या ) आत्म्याची ( साधक ) ज्ञान देण्याबद्दल प्रार्थना करतो त्याच आत्म्याच्या द्वारें हा ( आत्मा ) प्राप्त होतो. हा आत्मा त्याच साधकाला आपलें स्वरूप प्रकट करतो. २३. पापकर्मापासून परावृत्त न झालेला, ( इंद्रियभोगांपासून ) उपरत न झालेला, एकाग्रचित्त न झालेला अथवा शान्तिरहित चित्त असलेला, अशा मनुष्याला ज्ञानाचे योगानें देखील आत्मप्राप्ति होत नाहीं

इत्था वेद यत्र सः ॥ २४ ॥ इति प्रथमेऽध्याये द्वितीया वल्ली ॥ २ ॥

ऋतं पिबन्तौ सुकृतस्य लोके गुहां प्रविष्टौ परमे परार्धे ॥ छायातपौ ब्रह्मविदो वदन्ति पञ्चाग्नयो ये च त्रिणाचिकेताः ॥ १ ॥ यः सेतुरीजानानामक्षरं ब्रह्म यत्परम् ॥

२४. ब्राह्मण आणि क्षात्रिय हे ( धर्माचे आधारभूत वर्ण ) ज्याचें खाद्य होतात, मृत्यु ( देखील ) ज्याचें ( उपखाद्य ) होतो, तो आत्मा कसा व कोठें आहे हें कोण जाणूं शकेल ? २५. इति प्रथमाध्याये द्वितीया वल्ली ॥ २ ॥

( प्राप्त व प्राप्तव्य अशा आत्म्याच्या दोन प्रकारांचें वर्णन करतात–) स्वतः केलेल्या कर्माचें फल भोगणारे ( या ) शरीरामध्यें [ लोके ] ब्रह्माचें [ परं ] श्रेष्ठ [ परमं ] स्थान [ अर्धे ] अशा बुद्धीच्या [ गुहां ] ठिकाणीं प्रवेश केलेले, छाया आणि प्रकाश यांच्याप्रमाणें (जीवात्मा व परमात्मा हे ) आहेत असें ब्रह्मज्ञ सांगतात. तीन वेळां नाचिकेत अग्नीचें हवन केलेले गृहस्थ [ पंचाग्नयः ]( देखील असेंच सांगतात).

अभयं तितीर्षतां पारं नाचिकेत॰ शकेमहि ॥ २ ॥ आत्मानꣳ रथिनं विद्धि शरीरꣳ रथमेव तु ॥ बुद्धिं तु सारथिं विद्धि मनः प्रग्रहमेव च ॥ ३ ॥ इन्द्रियाणि हयानाहुर्विषयांस्तेषु गोचरान् ॥ आत्मेन्द्रियमनोयुक्तं भोक्तेत्याहुर्मनीषिणः ॥ ४ ॥ यस्त्वविज्ञानवान्भवत्ययुक्तेन मनसा सदा ॥ तस्येन्द्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ॥

१. यजन करणाऱ्या ( कर्मनिष्ठ ) लोकांना सेतूप्रमाणें असलेला जो नाचिकेत अग्नि तो आह्मी जाणतों; आणि संसार तरून जाण्याची इच्छा करणारांचें भयरहित असें पैलतीर जें परब्रह्म तें देखील आह्मी जाणतों. २. आत्मा हा रथी आहे, शरीर हा रथ आहे, बुद्धि हा सारथि आहे आणि मन हा लगाम आहे असें जाण. ३. इंद्रियें हे अश्व, विषय हे त्यांचे मार्ग आणि इंद्रियें व मन यांसह आत्मा त्यांचा भोक्ता आहे असें विवेकी मनुष्य सांगतात. ४. सर्वदा निग्रहहीन मनाचे योगानें ज्याचा बुद्धिरूपी सारथी अकुशल असतो त्याला— वाईट घोडे ज्याप्रमाणें अकुशल सारथ्याला वश नसतात त्या-

॥ ५ ॥ यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा सदा ॥ तस्येन्द्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ॥ ६ ॥ यस्त्वविज्ञानवान्भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ॥ न स तत्पदमाप्नोति संसारं चाधिगच्छति ॥ ७ ॥ यस्तु विज्ञानवान्भवति समनस्कः सदा शुचिः ॥ स तु तत्पदमाप्नोति यस्माद्भूयो न जायते ॥ ८ ॥ विज्ञानसारथिर्यस्तु मनः-

प्रमाणें——इंद्रियें वश नसतात. ५. परंतु, सर्वदा निग्रहयुक्त मनाचे योगानें ज्याचा बुद्धिरूपी सारथी कुशल असतो, त्याला —चांगले घोडे ज्याप्रमाणें कुशल सारथ्याला वश असतात त्याप्रमाणें——इंद्रियें वश असतात. ६. जो ज्ञानहीन असतो, ज्याचें मन ताब्यांत नसतें, जो सर्वदा अशुचि असतो, त्याला तें ( परम ) पद प्राप्त होत नाहीं; त्याला ( जन्ममरणरूप ) संसारच प्राप्त होतो. ७. परंतु, जो ज्ञानयुक्त असतो, ज्याचें मन ताब्यांत असतें, जो सर्वदा शुचिर्भूत असतो, त्याला तें (परम) पद प्राप्त होतें; तें प्राप्त झाल्यानंतर तो पुन्हां जन्म ( व मरण ) पावत नाहीं. ८. विवेक हा ज्याचा सारथी आहे व

07707

प्रग्रहवान्नरः ॥ सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम् ॥ ९ ॥ इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः ॥ मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥ १० ॥ महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः ॥ पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ॥ ११ ॥ एष सर्वेषु भूतेषु गूढोत्मा

ज्याचें मन ताब्यांत आहे तो मनुष्य (या संसाररूपी) मार्गाचें ( पैल ) तीर पावतो. तेंच विष्णुरूपी परब्रह्माचें श्रेष्ठ स्थान आहे. ९. इंद्रियांहून इंद्रियांचे अर्थ श्रेष्ठ आहेत, इंद्रियांच्या अर्थांहून मन श्रेष्ठ आहे, मनाहून बुद्धि श्रेष्ठ आहे आणि बुद्धीहून महान् असा आत्मा [ जगतांत प्रथम उत्पन्न झालेलें हिरण्यगर्भरूप तत्त्व ] श्रेष्ठ आहे. १०. आत्म्याहून ( सर्व जगताचें बीजरूप जें ) अव्यक्त ( तें ) श्रेष्ठ आहे; अव्यक्ताहून ( सर्व कारणांचें आदिकारण असा ) परपुरुष [ परम आत्मा ] श्रेष्ठ आहे. परपुरुषाहून श्रेष्ठ असें कांहींहि नाहीं. ( सर्व प्राणिमात्रांच्या गतीचा ) तोच शेवट होय; तोच गतीचा अंत होय. ११. हा आत्मा सर्व भूतांचे ठिकाणीं

न प्रकाशते ॥ दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥ १२ ॥ यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञस्तद्यच्छेज्ज्ञान आत्मनि॥ ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छान्त आत्मनि ॥ १३ ॥ उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ॥ क्षुरस्य

गूढरूपानें आहे; तो कोणाला आत्मरूपानें प्रकाशित होत नाहीं. केवळ एकाग्र आणि सूक्ष्म अशा बुद्धीच्या योगानें सूक्ष्मदृष्टि मनुष्यांना याचें ज्ञान होतें. १२. ( तें ज्ञान होण्याचा उपाय सांगतात---) विवेकी मनुष्यानें वाणीचा [ ह्मणजे सर्व इंद्रियांचा ] मनाचे ठिकाणीं [ मनसी=मनसि ] लय करावा. मनाचा ज्ञानस्वरूप बुद्धीच्या ठिकाणीं [ ज्ञाने आत्मनि ] लय करावा. बुद्धीचा [ ज्ञानं ] महान् अशा [=प्रथमज हिरण्यगर्भरूप ] आत्म्याचे ठिकाणीं लय करावा. ( हिरण्यगर्भरूप ) आत्म्याचा अविक्रिय अशा ( मुख्य ) आत्म्याचे ठिकाणीं लय करावा. १३. ( याप्रमाणें परम आत्म्याचे ठिकाणीं सर्वांचा लय झाला ह्मणजे मिथ्या ज्ञानाची निवृत्ति होते. ह्मणून हे जीवहो, आत्मज्ञानप्राप्तीकरितां ) उठा,

धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तत्कवयो वदन्ति ॥१४॥
अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् ॥
अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवं निचाय्य तन्मृत्युमुखात्प्रमुच्यते
॥ १५ ॥ नाचिकेतमुपाख्यानं मृत्युप्रोक्तꣳ सनातनम् ॥

( अज्ञाननिद्रेंतून ) जागे व्हा, श्रेष्ठ अशा ( ज्ञानवान् ) आचार्यांकडे जाऊन ( सर्वव्यापी आत्मा मी आहें ) हें ज्ञान प्राप्त करून घ्या. ज्याप्रमाणें वस्तऱ्याच्या तीक्ष्ण केलेल्या धारेवर पाय ठेवून जाणें अशक्य असतें त्याप्रमाणें हा ( आत्मज्ञानाचा ) मार्ग चालण्यास अत्यंत कठिण आहे असें ज्ञानी लोक सांगतात. १४. ( हें ब्रह्म किती सूक्ष्म आहे तें सांगतात-- ) शब्दरहित, स्पर्शरहित, रूपरहित, क्षयरहित, रसरहित, नित्य [ न बदलणारें ], गंधरहित, आदिरहित, अंतरहित, बुद्धीहून पर [ श्रेष्ठ ] आणि शाश्वत असें जें ब्रह्म तें जाणल्यानें ( जन्म व ) मरण यांच्यापासून सुटका होते. १५. यमानें नचिकेतस् याला सांगितलेलें हें सनातन उपाख्यान ( इतरांना ) सांगितल्यानें अथवा ( ज्ञात्यांपासून )

उक्त्वा श्रुत्वा च मेधावी ब्रह्मलोके महीयते ॥ १६ ॥ य इमं परमं गुह्यं श्रावयेद्ब्रह्मसंसदि ॥ प्रयतः श्राद्धकाले वा तदानन्त्याय कल्पते तदानन्त्याय कल्पत इति ॥ १७ ॥
इति प्रथमाध्याये तृतीया वल्ली ॥ ३ ॥

॥ इति प्रथमोऽध्यायः समाप्तः ॥ १ ॥

पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ॥ कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुर-

श्रवण केल्यानें बुद्धिमान् मनुष्य ब्रह्मरूप लोकामध्यें महत्त्व पावतो [=ब्रह्मरूप होतो ]. १६. हें अत्यंत गूढ आख्यान जो कोणी शुचिर्भूत होत्साता ब्राह्मणांच्या सभेला ऐकवील अथवा श्राद्धकालीं ( भोजन करणारांना ) ऐकवील त्याचें तें कृत्य अनंतफलदायक होईल. १७. इति तृतीया वल्ली ॥ ३ ॥

**इति प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥**

---

## अध्याय दुसरा.



( आत्मज्ञानाला प्रतिबंधक काय असतें तें सांगतात, कारण तें समजल्यावांचून त्याचा प्रतिकार करतां येणार नाहीं—)

मृतत्वमिच्छन् ॥ १ ॥ पराचः कामाननुयन्ति बालास्ते मृत्योर्यन्ति विततस्य पाशम् ॥ अथ धीरा अमृतत्वं विदित्वा ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयन्ते ॥ २ ॥ येन रूपं रसं गन्धं शब्दान्स्पर्शांश्च मैथुनान् ॥ एतेनैव विजानाति

बहिर्मुख ( अशीं ) इंद्रियें ( फक्त ) परमेश्वरानें मारून टाकलीं आहेत ( इतरांनीं कोणी नाहीं ). ह्मणून ( मनुष्य ) बाहेर [ विषयांकडे ] पहातो, अंतरात्म्याकडे पहात नाहीं. एखादाच बुद्धिमान् मनुष्य मोक्षाची इच्छा करणारा होत्साता व सर्व इंद्रियें अंतर्मुख केलेला ( इंद्रियांहून ) उलट गमन करणाऱ्या [ ह्म० अंतर्मुख ] आत्म्याला पहातो. १. अल्पबुद्धि मनुष्य बाह्य विषयांच्या मागें जातात ( ह्मणून ) ते सर्वगामी मृत्यूच्या पाशाप्रत जातात. परंतु बुद्धिमान् मनुष्य ( प्रत्यगात्मस्वरूप ) अमृतत्व हेंच शाश्वत आहे असें जाणून या लोकीं अनित्य विषयांची इच्छा करीत नाहीं. २. ( जें जाणल्यानें विवेकी इतर कशाची इच्छा करीत नाहींत तें कसें प्राप्त होतें तें सांगतात—) ज्याच्या योगानें रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श आणि मैथुन है

किमत्र परिशिष्यते एतद्वै तत् ॥ ३ ॥ स्वप्नान्तं जागरितान्तं चोभौ येनानुपश्यति ॥ महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति ॥ ४ ॥ य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमन्तिकात् ॥ ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते एतद्वै तत् ॥ ५ ॥ यः पूर्वं तपसो जातमद्भ्यः पूर्वमजा-

देहादिलक्षणी विषय जाणतां येतात तो हा ( देहाहून भिन्न ) आत्माच आहे. आत्म्याला सोडून या लोकीं कोणतेंहि ज्ञान नाहीं. ( हे नचिकेतसा, ) तूं विचारलेला ( सर्वज्ञ आत्मा ) तो हा. ३. स्वप्नामध्यें आणि जागृतीमध्यें जाणले जाणारे सर्व विषय ज्याच्या योगानें मनुष्य जाणतो तो महान् व सर्वव्यापी आत्मा होय असें ज्ञान झाल्यावर [ ह्म० सर्व विषयांचा अनुभव घेणारा मीच परमात्मा आहें असें ज्ञान झाल्यावर ] बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं. ४. कर्मफलाचा भोक्ता [ मध्वदं ] हा जीव आत्मा आहे आणि हा भूतभविष्याच्या ईश्वराच्या समीप आहे असें जो जाणतो तो ( स्वतःच्या ) संरक्षणाची इच्छा करीत नाहीं [ ह्म० निर्भय

यत ॥ गुहां प्रविश्य तिष्ठन्तं यो भूतेभिर्व्यपश्यत एतद्वै तत् ॥ ६ ॥ या प्राणेन संभवत्यदितिर्देवतामयी ॥ गुहां प्रविश्य तिष्ठन्तीं या भूतेभिर्व्यजायत एतद्वै तत् ॥ ७ ॥ अरण्योर्निहितो जातवेदा गर्भ इव सुभृतो गर्भि-

होतो ]. तूं विचारलेला ( सर्वज्ञ ) आत्मा तो हा. ५. तपाच्या [=ज्ञानाच्या] अगोदर उत्पन्न झालेलें, उदक इत्यादि पंचमहाभूतांच्या अगोदर उत्पन्न झालेलें, ( प्राणिमात्राच्या ) हृदयाकाशामध्यें [ गुहां ] प्रवेश करून ( पांच ) भूतांसह वर्तमान रहात असलेलें असें जें कांहीं ( हिरण्यगर्भरूप तेज ) कोणी ( मुमुक्षु ) पहातो तें हेंच ब्रह्म होय. तूं विचारलेला ( सर्वज्ञ ) आत्मा तो हा. ६. शब्दादि विषय भक्षण करणारी [ अदिति ] देवतारूपी जी ब्रह्माबरोबर उत्पन्न झाली, ( प्राणिमात्राच्या ) हृदयाकाशामध्यें प्रवेश करून रहाणारी व जी भूतांबरोबर उत्पन्न झाली, अशी जी ( हिरण्यगर्भरूपी देवता ) तें हेंच ब्रह्म होय. ७. गर्भिणी स्त्रियांनीं काळजीपूर्वक रक्षण केलेल्या गर्भाप्रमाणें, जागरूक असे ऋत्विज ज्याचें

र्णीभिः ॥ दिवे दिव ईड्यो जागृवाद्भिर्हविष्मद्भिर्मनुष्येभिरग्निः
एतद्वै तत् ॥ ८ ॥ यतश्चोदेति सूर्योऽस्तं यत्र च गच्छति ॥
तं देवाः सर्वेऽर्पितास्तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥ ९ ॥
यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह ॥ मृत्योः स मृत्युमा-
प्नोति य इह नानेव पश्यति ॥ १० ॥ मनसैवेदमाप्तव्यं

दररोज ( रक्षण व ) स्तवन करतात असा दोन अरणींमध्यें असणारा जो जातवेद अग्नि तें हेंच ब्रह्म होय. ८. ज्या ( प्राणमय तेजा— ) पासून सूर्य उदय पावतो व ज्यामध्यें अस्त पावतो त्या (प्राणमय तेजा—) मध्यें सर्व देव (चक्राच्या मध्यभागीं सर्व अरा बसविलेल्या असतात त्याप्रमाणें) बसविलेले आहेत. त्याच्या बाहेर कोणीहि जाऊं शकत नाहीं. तें हेंच ब्रह्म होय. ९. या लोकीं जें ( कार्यकारणादि उपाधींनीं युक्त असें ) ब्रह्म ( भासमान होतें ) तेंच परलोकीं ( नित्य ज्ञानस्वभाव ) ब्रह्म आहे. जें परलोकीं आहे तेंच या लोकीं आहे. ( मायेनें मोहित होत्साता ) जो ( ब्रह्माचें ) नानात्व पहातो तो ( एका ) मरणामागून ( दुसरें ) मरण पावतो [ ह्म० जन्ममरणरूपी फेऱ्यांत

नेह नानास्ति किंचन ॥ मृत्योः स मृत्युं गच्छति य इह नानेव पश्यति ॥ ११ ॥ अङ्गुष्ठमात्रः पुरुषो मध्य आत्मनि तिष्ठति ॥ ईशानो भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते एतद्वै तत् ॥ १२ ॥ अङ्गुष्ठमात्रः पुरुषो ज्योतिरिवाधूमकः ॥ ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ श्वः एतद्वै तत् ॥ १३ ॥ यथोदकं दुर्गे वृष्टं पर्वतेषु विधा-

सांपडतो ]. १०. या लोकीं अनेक असें कांहीं नाहीं; ज्याला अनेकाप्रमाणें भास होतो तो मरणामागून मरण ( याप्रमाणें ) पावतो; हें ( ज्ञान ) मनानेंच जाणावयाचें आहे. ११. भूत व भविष्य यांचा स्वामी पुरुष [ ज्यानें हें सर्व व्याप्त—पूर्ण आहे] शरीरामध्यें अंगुष्ठप्रमाण रहातो. हें जो जाणतो तो भयरहित होतो. हेंच तें ब्रह्म होय. १२. ( हा ) अंगुष्ठमात्र पुरुष प्रकाशस्वरूप आहे; धूमरहित आहे; भूत व भविष्य यांचा स्वामी आहे. (हा) आज आहे व उद्यांहि आहे [ ह्म० नित्य आहे ]. हेंच तें ब्रह्म होय. १३. दुर्गम प्रदेशामध्यें पडलेलें उदक ज्याप्रमाणें पर्वतयुक्त सखल प्रदेशामध्यें पसरून नाहींसें होतें त्याप्र-

वति ॥ एवं धर्मान्पृथक् पश्यंस्तानेवानुविधावति ॥ १४ ॥ यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ॥ एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ॥ १५ ॥ इति द्वितीयेऽध्याये प्रथमा वल्ली समाप्ता ॥ ४ ॥

पुरमेकादशद्वारमजस्यावक्रचेतसः ॥ अनुष्ठाय न शोचति विमुक्तश्च विमुच्यते एतद्वै तत् ॥ १ ॥ हꣳसः

माणें ( प्रत्येक शरीराचे ठिकाणीं ) पृथक् धर्म (आहेत असें) पहाणारा मनुष्य त्या पृथक् धर्मांमध्येंच नाहींसा होतो [ म्ह० पुनःपुनः पृथक् शरीरें धारण करतो ]. १४. हे गौतमा, ज्याप्रमाणें शुद्ध उदकामध्यें शुद्ध उदक टाकलें असतां तें तसेंच ( शुद्ध ) होतें त्याप्रमाणें ( एकत्वाचें ) ज्ञान झालेल्या मुनीचा आत्मा ( एकत्वरूपच ) होतो. १५.

इति द्वितीयाध्याये प्रथमा वल्ली.

ज्याचें ज्ञान [ चेतस् ] नित्य आहे अशा [ अवक्र=नित्य ] जन्मरहित आत्म्याचें ( शरीर हें ) नगर आहे, या नगराला अकरा द्वारें आहेत. [ म्ह० या शरीराचा आत्मा हा स्वामी

शुचिषद्वसुरन्तरिक्षसद्धोता वेदिषदतिथिर्दुरोणसत् । नृष-द्वरसदृतसद्व्योमसदब्जा गोजा ऋतजा अद्रिजा ऋतं बृहत् ॥ २ ॥ ऊर्ध्वं प्राणमुन्नयत्यपानं प्रत्यगस्यति ॥ मध्ये

आहे ]. या आत्म्याचें ध्यान केलें असतां मनुष्य भयरहित होतो. ( कर्मरूपी बंधनांपासून ) मुक्त होतो. ( नंतर शरीरापासून) मुक्त होतो. हेंच तें ब्रह्म होय. १ ( हा आत्मा एकाच शरीरामध्यें रहाणारा नसून सर्वशरीरव्यापी आहे असें सांगतात–) हा आदित्यरूपानें [हंसः] आकाशामध्यें स्थित आहे, वायुरूपानें अंतरिक्षामध्यें स्थित आहे, अग्निरूपानें [होता] वेदीचे ठिकाणीं स्थित आहे, अतिथिरूपानें गृहामध्यें स्थित आहे ( अथवा सोमरूपानें कलशामध्यें स्थित आहे ), मनुष्यांमध्यें, देवांमध्यें, यज्ञामध्यें (अथवा सत्यामध्यें) व आकाशामध्यें स्थित आहे. हा उदकामध्यें (शंख, मकर इत्यादिरूपानें) उत्पन्न होतो, पृथिवीमध्यें ( धान्यादिरूपानें ) उत्पन्न होतो, यज्ञामध्ये (यज्ञफलादिरूपानें ) उत्पन्न होतो, पर्वतामध्यें ( नदी आदिरूपानें ) उत्पन्न होतो; ( असा असूनहि ) हा महान् आत्मा ( सर्वत्र)

वामनमासीनं विश्वेदेवा उपासते ॥ ३ ॥ अस्य विस्रंस-
मानस्य शरीरस्थस्य देहिनः ॥ देहाद्विमुच्यमानस्य
किमत्र परिशिष्यते एतद्वै तत् ॥ ४ ॥ न प्राणेन नापा-
नेन मर्त्यो जीवति कश्चन ॥ इतरेण तु जीवन्ति यस्मि-
न्नेतावुपाश्रितौ ॥ ५ ॥ हन्त त इदं प्रवक्ष्यामि गुह्यं ब्रह्म

सत्यस्वरूप आहे. २. ( जो हृदयापासून ) प्राणवायु वर नेतो आणि अपानवायु खालीं सोडतो त्या मध्यभागीं ( हृदयकमलीं ) स्थित व ( मुमुक्षूंनीं ) भक्ति करण्यास योग्य [वामनं] अशा आत्म्याची सर्व इंद्रियें उपासना करतात [ ह्म० त्याच्या आज्ञेनें आपले व्यापार करतात. अर्थात् या जड शरीराहून तो वेगळा आहे. ] ३. प्राण्याच्या शरीरामध्यें रहाणारा हा ( आत्मा ) देहामधून निघून गेला असतां ( नुसत्या देहामध्यें ) काय शिल्लक रहातें ? [ कांहीं नाहीं. अर्थात् आत्मा शरीराहून भिन्न आहे ]. हेंच तें ब्रह्म होय. ४. ( केवळ ) प्राणवायूनें अथवा अपानवायूनें कोणीहि मनुष्य जिवंत राहूं शकत नाहीं. हे वायु ज्याच्या आश्रयानें रहातात अशा

सनातनम् ॥ यथा च मरणं प्राप्य आत्मा भवति गौतम ॥ ६ ॥ योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः ॥ स्थाणुमन्येऽनुसंयन्ति यथाकर्म यथाश्रुतम् ॥ ७ ॥ य एष सुप्तेषु जागर्ति कामं कामं पुरुषो निर्मिमाणः ॥ तदेव शुक्रं तद्ब्रह्म

निराळ्या आत्म्याच्याच योगानें ( मनुष्य ) जिवंत राहूं शकतात. ५. हे गौतमा, आतां मी तुला गुह्य व सनातन असें ब्रह्म सांगतों; आणि ( देहाला ) मरण प्राप्त झालें असतां आत्म्याचें काय होतें हें सांगतों. ६. ( आत्मज्ञान न झालेले ) कोणी मनुष्य ( पुन्हां ) शरीर धारण करण्यासाठीं जननेंद्रियामध्यें प्रवेश करतात. दुसरे कोणी ( अत्यंत अधम ) मनुष्य ( वृक्षादि ) स्थावरभाव पावतात. ( सारांश, ) जसें कर्म केलें असेल आणि जसें ज्ञान मिळविलें असेल त्या मानानें सर्वांना अवस्था प्राप्त होते. ७. हे (प्राणादि वायु) निद्रित असतांना, आपल्या इच्छेप्रमाणें ( अर्थ ) निर्माण करीत जो पुरुष जागृत असतो तोच शुद्ध [ शुक्र ] ब्रह्म होय, तेंच शाश्वत आहे असें ( सर्व शास्त्रांमध्यें ) सांगितलें आहे. ( पृथि-

तदेवामृतमुच्यते ॥ तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन्न एतद्वै तत् ॥ ८ ॥ अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥ ९ ॥ वायुर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव ॥ एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ॥ १० ॥ सूर्यो यथा सर्व-

ऱ्यादि ) सर्व लोक त्याच्या आश्रयानें राहिले आहेत. त्याच्या बाहेर कोणीहि जाऊं शकत नाहीं. तेंच हें ब्रह्म होय. ८. ज्याप्रमाणें एकच अग्नि या लोकांमध्यें प्रविष्ट होत्साता प्रत्येक ( दाह्य ) वस्तूसंबंधानें निरनिराळें रूप धारण करतो, त्याप्रमाणें सर्व भूतांचा अंतरात्मा ( आकाशाप्रमाणें ) बाहेर [ बहिः ] एकच असून प्रत्येकाचे ठिकाणीं निरनिराळें रूप धारण करतो. ९. ज्याप्रमाणें एकच वायु या लोकामध्यें प्रविष्ट होत्साता प्रत्येक वस्तूसंबंधानें निरनिराळें रूप धारण करतो, त्याप्रमाणें सर्व भूतांचा अंतरात्मा ( आकाशाप्रमाणें ) बाहेर एकच असून प्रत्येकाचे ठिकाणीं निरनिराळें रूप धारण करतो. १०.

लोकस्य चक्षुर्न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ॥ एकस्तथा सर्व-
भूतान्तरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ॥ ११ ॥
एको वशी सर्वभूतान्तरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ॥
तमात्मस्थं येनुऽपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरे-

( सर्व वस्तु प्रकाशित करण्याला कारण ह्मणून ) सर्व लोकांचा चक्षु असा जो सूर्य तो ज्याप्रमाणें ( अशुद्ध पदार्थांच्या ) दर्शनरूपी दोषांनीं [ चाक्षुषैः ] अथवा ( अशुद्ध पदार्थांच्या संसर्गाच्या ) बाह्य दोषांनीं [ बाह्यैः ] लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें ( दुःखरूपी अध्यासाहून ) भिन्न [ बाह्यः ] असलेला सर्व भूतांचा एकच असा अंतरात्मा लोकांच्या ( जन्ममरणादि ) दुःखांनीं लिप्त होत नाहीं. ११. एक [ज्याच्यासारखा अथवा ज्याच्याहून अधिक दुसरा कोणी नाहीं ], ( सर्व जगताचा ) स्वामी, सर्व भूतांचा अंतरात्मा आणि एकच स्वरूप जो अनेक प्रकारांनीं दाखवितो अशा त्या-( परमेश्वरा-)ला आपल्या हृदयाकाशामध्यें ( ज्ञानरूपानें ) स्थित असलेला जे ज्ञानी मनुष्य ( साक्षात्कारयुक्त ) पहातात त्यांनाच शाश्वत सुख

षाम् ॥ १२ ॥ नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ॥ तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ॥ १३ ॥ तदेतदिति मन्यन्तेऽनिर्देश्यं परमं सुखम् ॥ कथं नु तद्विजानीयां किमु भाति विभाति वा ॥ १४ ॥ न तत्र सूर्यो

प्राप्त होतें, इतरांना नाहीं. १२. ( सर्व ) अनित्य वस्तूंमध्यें जो नित्य आहे, ( जगताला )चेतना देणाऱ्यांना जो चेतना देणारा आहे, ( स्वतः ) एक असून जो अनेकांना कर्मांचीं फलें [ कामान् ] देतो, त्याला स्वतःच्या ठिकाणीं स्थित असा जे पहातात त्यांनाच शाश्वत शान्ति प्राप्त होते, इतर कोणाला नाहीं. १३. तें ( आत्मज्ञानरूपी ) असाधारण सुख अनिर्देश्य [ अमुक प्रकारचें आहे असें सांगण्यास अशक्य ] असतांहि ( निवृत्तैषण विद्वान् ) ' तें असें आहे ' या प्रकारें ( प्रत्यक्ष ) अनुभवतात. त्या ( आत्मज्ञानरूपी ) सुखाचें मला कसें बरें ज्ञान होईल ? तें ( स्वतःच ) प्रकाशित होतें काय ? अथवा आमच्या बुद्धीला तें स्पष्ट समजतें काय ? १४. ( याला उत्तर— )

भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ॥ तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ १५ ॥ इति द्वितीयेऽध्याये पञ्चमी वल्ली समाप्ता ॥ ५ ॥

ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थः सनातनः ॥ तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते ॥ तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे

त्या ब्रह्माला सूर्य प्रकाशित करूं शकत नाहीं, चंद्र अथवा तारका प्रकाशित करूं शकत नाहींत. ( मग ) हा अग्नि तरी कसा प्रकाशित करणार ? ( तर ) तें ब्रह्म स्वतः प्रकाशरूपी आहे म्हणून त्याच्याच प्रकाशाच्या आधारानें हें सर्व ( सूर्य चंद्र आदि ) प्रकाश पावतें. त्याच्याच तेजानें हें सर्व स्पष्ट प्रकाश पावतें. १५.

इति द्वितीयाध्याये द्वितीया वल्ली.

( कर्मरूपी वायूच्या योगानें नित्य चलन पावणाऱ्या ) अश्वत्थाप्रमाणें असलेल्या या ( संसार–) वृक्षाचें मूळ वर ( ब्रह्माचे ठिकाणीं ) आहे आणि ( स्वर्ग, नरक, तिर्यक् इत्यादि ) शाखा खालीं आहेत. या वृक्षाचें जें मूळ तेंच शुद्ध ब्रह्म होय.

तदु नात्येति कश्चन एतद्वै तत् ॥ १ ॥ यदिदं किंच
जगत्सर्वं प्राण एजति निःसृतम् ॥ महद्भयं वज्रमुद्यतं य
एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥ २ ॥ भयादस्याग्निस्तपति
भयात्तपति सूर्यः ॥ भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः
॥ ३ ॥ इह चेदशकद्बोद्धुं प्राक् शरीरस्य विस्रसः ॥ ततः

तेंच अविनाशी आहे असें ( ज्ञाते ) सांगतात. ( स्वर्ग, गंधर्व इत्यादि ) सर्व लोक त्याच्याच आश्रयानें आहेत. त्याहून वरचढ असें कांहीं नाहीं. १. हें सर्व जग ब्रह्माचे ठिकाणीं [ प्राणे ] कंप पावतें व नियमानें चालतें [निःसृतं (प्रचलति)] वज्र धारण करणाऱ्या व महाभयंकर अशा ( स्वामीला पाहून ज्याप्रमाणें सेवक कंप पावतात व नियमानें काम करतात तद्वत् ). हें ( ब्रह्म ) जे जाणतात ते ( जन्म व ) मृत्यु यांनीं रहित होतात. २. याच्या भयानें अग्नि तपन पावतो, याच्या भयानें सूर्य तपन पावतो; याच्या भयानें इंद्र व वायु (आपापलीं कामें ) करतात; तसाच पांचवा मृत्यु देखील ( याच्याच भयानें आपल्या उद्योगास ) प्रवृत्त होतो. ३. या लोकीं शरी-

सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पते ॥ ४ ॥ यथादर्शे तथा
ऽत्मनि यथा स्वप्ने तथा पितृलोके ॥ तथाप्सु परीव ददृशे
तथा गन्धर्वलोके छायातपयोरिव ब्रह्मलोके ॥ ५ ॥ इन्द्रि-

राचा नाश होण्यापूर्वी मनुष्य जर ब्रह्म जाणूं शकेल ( तर तो संसारबंधनापासून मुक्त होतो ); नाहींतर ( पृथिव्यादि ) सृष्ट लोकांमध्यें ( पुन्हां ) शरीरत्वाप्रत पावतो. ४. ज्याप्रमाणें आरशामध्यें ( आपलें स्पष्ट) दर्शन होतें त्याप्रमाणें ( आरशा-प्रमाणें निर्मल झालेल्या) स्वतःच्या बुद्धीमध्यें (आत्म्याचें स्पष्ट) दर्शन होतें. ज्याप्रमाणें स्वप्नांत (जागृतीच्या वासनांचे योगानें आपलें अस्पष्ट ) दर्शन होतें त्याप्रमाणें ( कर्मफलभोगाच्या आसक्तीमुळें ) पितृलोकामध्यें ( आत्म्याचें अस्पष्ट ) दर्शन होतें. ज्याप्रमाणें उदकामध्यें ( आपलें स्वरूप ) भ्रमण कर-णारें दिसतें [ परिददृशे इव ] त्याप्रमाणें गंधर्वलोकामध्यें ( आत्म्याचें ) दर्शन ( अस्पष्टच) होतें. ( फक्त ) ब्रह्मलोकीं (आत्म्याचें ) दर्शन छाया आणि प्रकाश यांच्याप्रमाणें (स्पष्ट) होतें. ५. ( आकाशादि आपापल्या कारणांपासून ) वेगळीं

याणां पृथग्भावमुदयास्तमयौ च यत् ॥ पृथगुत्पद्यमानानां मत्वा धीरो न शोचति ॥ ६ ॥ इन्द्रियेभ्यः परं मनो मनसः सत्त्वमुत्तमम् ॥ सत्वादधि महानात्मा महतोऽव्यक्तमुत्तमम् ॥ ७ ॥ अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिङ्ग एव च ॥ यंज्ज्ञात्वा मुच्यते जन्तुरमृतत्वं च गच्छति ॥८॥

उत्पन्न झालेलीं इंद्रियें ( आत्म्याहून ) निराळीं आहेत आणि त्यांना उत्पत्ति व विनाश होतात ( आत्म्याला होत नाहींत ) हें जाणून बुद्धिमान् मनुष्य शोक करीत नाहीं. ६. इंद्रियें ( व त्यांचे अर्थ ) यांहून मन श्रेष्ठ आहे, मनाहून बुद्धि [ सत्त्व ] श्रेष्ठ आहे, सत्त्वाहून महान् असा आत्मा [ जगतांत प्रथम उत्पन्न झालेलें तत्त्व ] श्रेष्ठ आहे आणि त्या आत्म्याहून ( सर्व जगताचें बीजरूप जें ) अव्यक्त ( तें ) श्रेष्ठ आहे. ७. सर्वांचा व्यापक आणि अभेद्य [ अलिंग=कोणत्याहि साधनानें जाणतां येत नाहीं असा ] असा पर पुरुष अव्यक्ताहून श्रेष्ठ आहे. त्याचें ज्ञान झालें असतां प्राणी ( जिवंतपणींच अविद्यादिकांपासून ) मुक्त होतो आणि ( शरीरत्यागानंतर )

न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ॥
हृदा मनीषी मनसाभिक्लृप्तो य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ९
यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ॥ बुद्धिश्च न विचेष्टति तामाहुः परमां गतिम् ॥ १० ॥ तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणाम् ॥ अप्रमत्तस्तदा भवति

अमृतत्वाप्रत जातो [ ह्म० जन्ममरणापासून मुक्त होतो ]. ८. याचें रूप दृष्टीच्या विषयामधलें नाहीं, डोळ्यांनीं याला कोणी पाहूं शकत नाहीं ( अथवा इतर इंद्रियांनीं जाणूं शकत नाहीं ). मनाचें नियमनकरणाऱ्या [ मनीट् तृतीया–मनीषा ] ( हृदयस्थ ) बुद्धीनें [ हृदा ] मननाचे योगानें [ मनसा ] प्रकाशित झाल्यावर [ अभिक्लृप्तः ] ( हा आत्मा जाणतां येतो ). याप्रमाणें ज्यांना ब्रह्माचें [ =आत्म्याचें ] ज्ञान होतें ते मृत्युरहित होतात. ९. ( आपापल्या विषयांपासून निवृत्त होऊन ) जेव्हां पांच इंद्रियें मनाबरोबर रहातात आणि बुद्धि आपल्या व्यापारापासून निवृत्त होते, तेव्हां त्या स्थितीला अत्यंत श्रेष्ठ गति असें ह्मणतात. १०. ( या स्थितीमध्यें इंद्रियांचा व

योगो हि प्रभवाप्ययौ ॥ ११ ॥ नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ॥ अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते ॥ १२ ॥ अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्त्वभावेन

इंद्रियव्यापारांचा जरी वियोग होतो तरी ) तिला योग असें ह्मणतात. ( यानंतर जेव्हां ) इंद्रियांची स्थिर धारणा होईल तेव्हां ( मुमुक्षु ) प्रमादरहित होतो ( नुसत्या निवृत्तीनें नाहीं ); कारण, ( नुसता ) योग उपाय व अपाय ( दोन्ही ) करणारा आहे. ११. ( ब्रह्म जर बुद्धीचा विषय असेल तर ' तें ब्रह्म असें ' अशा प्रकारें तें बुद्धीला ग्रहण करतां येईल. पण बुद्धि आपल्या व्यापारापासून निवृत्त झाली ह्मणजे ' ब्रह्म नाहीं ' असें ह्मणण्याचा प्रसंग प्राप्त होईल. अशा प्रसंगाचें निरसन करण्याकरितां सांगतात— ) केवळ वाणीनें, बुद्धीनें अथवा चक्षु आदि इंद्रियांनीं याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. ( इंद्रियांची स्थिर धारणा होईल तेव्हांच होईल ). (तथापि जगताला मूल कारण हेंच ब्रह्म असल्यामुळें ब्रह्माला अस्तित्व आहे, कारण कार्य दिसत आहे. ह्मणून जगताला

चोभयोः ॥ अस्तीत्येवोपलब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति १३
यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ॥ अथ
मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ १४ ॥ यदा सर्वे
प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थयः ॥ अथ मर्त्योऽमृतो भवत्ये-

मूळ कारण असें ब्रह्म 'आहे' असेंच ह्मटलें पाहिजे ). 'ब्रह्म आहे' असें ह्मणणाऱ्याहून इतर [ अस्तीति ब्रुवतः अन्यत्र ] ( नास्तिक ) मनुष्याला ब्रह्म कसें समजणार? ( अर्थात् समजणारच नाहीं ). १२. ( ह्मणून नास्तित्ववादी पक्ष सोडून ) ( जगद्रूपी कार्य आणि कारण ब्रह्म हीं भिन्न नाहींत अशा ) दोघांच्या तत्त्वभावानें '( ब्रह्म ) आहे' हाच पक्ष मान्य केला पाहिजे. 'आहे' या प्रकारें मान्य केल्यावर ( सर्व उपाधिविरहित असा ) तत्त्वभाव प्रकट होतो. १३. ( ज्ञान होण्यापूर्वीं ) मनुष्याच्या बुद्धीला ज्या ज्या इच्छा होत्या त्या सर्व जेव्हां नाश पावतात तेव्हां तो मृत्युरहित होतो; ( व ) याच देहीं ब्रह्मरूप पावतो. १४. या देहीं जेव्हां बुद्धीचीं सर्व बंधनें तुटतात तेव्हां मनुष्य मृत्युरहित होतो. हाच ( सर्व वेदान्त-

तावदनुशासनम् ॥ १५ ॥ शतं चैका च हृदयस्य नाड्य-
स्तासां मूर्धानमभिनिःसृतैका ॥ ययोर्ध्वमायन्नमृतत्वमेति
विष्वङ्न्या उत्क्रमणे भवन्ति ॥ १६ ॥ अंगुष्ठमात्रः
पुरुषोन्तरात्मा सदा जनानां हृदये संनिविष्टः ॥ तं स्वाच्छा-
रीरात्प्रवृहेन्मुञ्जादिवेषीकां धैर्येण ॥ तं विद्याच्छुक्रममृतं तं
विद्याच्छुक्रममृतमिति ॥ १७ ॥ मृत्युप्रोक्तां नचिकेतोऽथ

वाक्यांचा ) उपदेश आहे, ( याहून अधिक उपदेश कांहीं नाहीं ). १५. हृदयापासून निघणाऱ्या एकशेंएक नाडी आहेत, त्यामध्यें मस्तकाला भेदून जाणारी एक ( सुषुम्ना नामक ) नाडी आहे. तिच्या द्वारें वर जाणारा [ =प्राण सोडणारा ] मृत्युरहितत्वाप्रत जातो, बाकीच्या नानाविध गति असणाऱ्या [ विष्वङ् ] नाडी ( पुन्हां ) संसारप्राप्ति आणतात. १६. अंगुष्ठप्रमाण अंतरात्मा पुरुष मनुष्यांच्या हृदयामध्यें नेहमीं स्थित आहे. त्याला धैर्यानें आपल्या शरीरापासून पृथक् करावा. मुंज नामक तृणामधून ( त्यांतील ) काडी जशी वेगळी काढतात तद्वत्. तोच ( अंतरात्मा ) शुद्ध ब्रह्म असें

लब्ध्वा विद्यामेतां योगविधिं च कृत्स्नम् ॥ ब्रह्मप्राप्तो विरजोऽभूद्विमृत्युरन्योऽप्येवं यो विदध्यात्ममेव ॥ १८ ॥ इति द्वितीयेऽध्याये षष्ठी वल्ली समाप्ता ॥ ६ ॥

इति द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

ॐ सह नाववतु ॥ सह नौ भुनक्तु ॥ सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ इति यजुर्वेदीयकठोनिषत्समाप्ता ॥३॥

ॐ तत्सत् ॥

---

जाणावें. १७. याप्रमाणें यमानें सांगितलेलें हें ज्ञान आणि संपूर्ण योगविधि नाचिकेतानें प्राप्त करून घेतल्यावर त्याला ब्रह्मप्राप्ति झाली [=तो मुक्त झाला ], तो धर्म व अधर्म यांविरहित झाला व मृत्युरहित झाला. या प्रकारें इतरहि जो कोणी ( आत्म-) ज्ञानी होईल तोहि आत्मरूप, ( धर्माधर्मरहित व मृत्युरहित ) होईल. १८. इति द्वितीयाध्याये तृतीया वल्ली.

॥ इति काठकोपनिषत्समाप्ता ॥

## प्रश्नोपनिषत् ॥ ४ ॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांᳲ सस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐशान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ सुकेशा च भारद्वाजः शैब्यश्च सत्यकामः सौर्यायणी च गार्ग्यः कौशल्यश्चाश्वलायनो भार्गवो वैदर्भिः

### प्रश्नोपनिषत्.



### प्रश्न पहिला.

हे देवहो, आमचे कर्ण कल्याणकारक ( गोष्टी ) श्रवण करोत. हे यजनीय देवहो, आमचे चक्षु कल्याणकारक ( गोष्टी ) पाहोत. स्थिर अशा अवयवांनीं व शरीरांनीं युक्त होत्साात्या आह्मांकडून तुमचें स्तवन होवो. देवांनीं दिलेलें जें आयुष्य असेल तें आह्मांस प्राप्त होवो. ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

भरद्वाजाचा पुत्र सुकेश, शिबीचा पुत्र सत्यकाम, गर्गगोत्री

कबन्धी कात्यायनस्ते हैते ब्रह्मपरा ब्रह्मनिष्ठाः परं ब्रह्मान्वेषमाणा एष ह वै तत्सर्वं वक्ष्यतीति ते ह समित्पाणयो भगवन्तं पिप्पलादमुपसन्नाः ॥ १ ॥ तान्ह स ऋषिरुवाच भूय एव तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संवत्सरं संवत्स्यथ यथाकामं प्रश्नान्पृच्छत यदि विज्ञास्यामः सर्वं ह वो वक्ष्याम इति ॥ २ ॥ अथ कबन्धी कात्यायन उपेत्य पप्रच्छ ॥

त्पन्न सौर्यायणि, अश्वलाचा पुत्र कौसल्य, विदर्भ देशींचा भार्गव आणि कत्याचा पुत्र कबंधी हे ( अपर ) ब्रह्म तेंच पर ब्रह्म असें समजणारे व त्याच ब्रह्माचे ठिकाणीं निष्ठा असलेले ( पण ) परब्रह्माचा शोध करीत असलेले हातांमध्यें समिधा घेऊन " तें सर्व ब्रह्म हा ( मुनि ) आपणांस सांगेल " असें जाणून पिप्पलाद मुनीकडे आले. १. ते ऋषि त्यांना ह्मणाले, तपश्चर्या व ब्रह्मचर्य यांचें श्रद्धेनें पालन करीत आणखी एक वर्षपर्यंत रहा ( आणि मग ) इच्छा असेल ते प्रश्न विचारा. जर मला माहीत असेल तर मी सर्व तुह्मांला सांगेन. २. नंतर ( ऋषींनीं सांगितल्याप्रमाणें एक वर्ष झाल्यावर ) कत्याचा

भगवन्कुतो ह वा इमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥ ३ ॥
तस्मै स होवाच प्रजाकामो वै प्रजापतिः स तपोऽतप्यत
स तपस्तप्त्वा स मिथुनमुत्पादयते ॥ रयिं च प्राणं चेत्येतौ
मे बहुधा प्रजाः करिष्य इति ॥ ४ ॥ आदित्यो ह वै
प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च
तस्मान्मूर्तिरेव रयिः ॥ ५ ॥ अथादित्य उदयन्यत्प्राचीं

पुत्र कबंधी ( ऋषीकडे ) येऊन विचारता झाला कीं, "हे भगवन्, या प्रजा कोठून उत्पन्न होतात?" ३. त्याला ते ऋषि ह्मणाले, प्रजापतीला प्रजा उत्पन्न करण्याची इच्छा होऊन त्यानें तप आचरण केलें. तप आचरण करून त्यानें रयि [ चंद्र ] आणि प्राण [ सूर्य ] हें मिथुन, माझी अनेक प्रकारची प्रजा हे करतील अशा उद्देशानें, उत्पन्न केलें. ४. प्राण ह्मणजे ( खाणारा ) सूर्य आणि रयि ह्मणजे ( खाद्य ) चंद्र. अथवा रयि ह्मणजे हें सर्व—मूर्त [ स्थूल ] व अमूर्त [ सूक्ष्म ]. ( पण मूर्त व अमूर्त असा या सर्वांचा विभाग केला ह्मणजे ) जें मूर्त तें अन्न [ रयि ] ( आणि अमूर्त तो

दिशं प्रविशति तेन प्राच्यान्प्राणान् रश्मिषु संनिधत्ते ॥ यद्द-
क्षिणां यत्प्रतीचीं यदुदीचीं यदधो यदूर्ध्वं यदन्तरा दिशो
यत्सर्वं प्रकाशयति तेन सर्वान्प्राणान् रश्मिषु संनिधत्ते ॥
॥ ६ ॥ स एष वैश्वानरो विश्वरूपः प्राणोऽग्निरुदयते ॥
तदेतदृचाभ्युक्तम् ॥ ७ ॥ विश्वरूपं हरिणं जातवेदसं परा-

भक्षण करणारा प्राण ). ५. जेव्हां सूर्य उदय पावून पूर्व दिशा व्यापतो तेव्हां त्या ठिकाणचे [ ह्म० पूर्वेकडचे=प्राच्यान् ] प्राण ( आपल्या ) किरणांमध्यें धारण करतो [ ह्मणजे सर्व किरणांनीं व्यापतो ]. (त्याचप्रमाणें ) दक्षिण, पश्चिम, उत्तर, अधर, ऊर्ध्व, उपदिशा आणि इतर सर्व ( प्रदेश ) जेव्हां प्रकाशित करतो तेव्हां त्यांमधील सर्व प्राण ( आपल्या ) किरणांमध्यें धारण करतो [ह्मणजे सर्व वस्तुजात किरणांनीं व्यापतो]. ६. तो हा वैश्वानर [ सर्व जीवात्मक ], विश्वरूप [ सर्व प्रपंचात्मक ], प्राण व अग्नि असा ( सूर्य ) उदय पावतो ( व सर्व व्यापतो ). तेंच ( या ) मंत्रानें सांगितलें आहे—
" विश्वरूप, किरणयुक्त [ हरिणः ], जातवेदा [ सर्व वस्तु-

यणं ज्योतिरेकं तपन्तम् ॥ सहस्ररश्मिः शतधा वर्तमानः प्राणः प्रजानामुदयत्येष सूर्यः ॥ ८ ॥ संवत्सरो वै प्रजापतिस्तस्यायने दक्षिणं चोत्तरं च ॥ तद्ये ह वै तदिष्टापूर्ते कृतमित्युपासते ते चान्द्रमसमेव लोकमभिजयन्ते ॥ त एव पुनरावर्तन्ते तस्मादेते ऋषयः प्रजाकामा दक्षिणं प्रतिप-

जास जाणणारा ], सर्व प्राणाचा आश्रय, ( सर्व प्राण्यांचा ) एकच प्रकाशभूत आणि तपन पावणारा ( असा सूर्य आहे असें ब्रह्मवेत्ते जाणतात ). अनेकरश्मि, ( प्राणिभेदानें ) अनेकधा वर्तमान व प्रजांचा प्राण असा हा सूर्य उदय पावतो. " ७. ८. ( चंद्र व सूर्य या मिथुनानें युक्त अशा अहोरात्रांचा समुदाय संवत्सर हा प्रजापति होय. त्याचे दक्षिण आणि उत्तर असे दोन मार्ग [ अयनं ] आहेत. त्यांमध्यें जे इष्ट व पूर्त ( या अनित्य कर्मांची ) उपासना करतात त्यांना ( अन्नरूप ) चंद्रलोक प्राप्त होतो. ते ( कर्मफलभोगानंतर ) पुन्हां ( मर्त्यलोकीं ) परत येतात. ह्मणून हे प्रजाकाम ऋषि दक्षिणायनरूप अयनाप्रत

द्यन्ते ॥ एष ह वै रयिर्यः पितृयाणः ॥ ९ ॥ अथोत्तरेण तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया विद्ययात्मानमन्विष्यादित्यमभिजयन्ते। एतद्वै प्राणानामायतनमेतदमृतमभयमेतत्परायणमेतस्मान्न पुनरावर्तन्त इत्येष निरोधस्तदेष श्लोकः ॥ १० ॥ पञ्चपादं पितरं द्वादशाकृतिं दिव आहुः परे अर्धे पुरीषि-

[ ह्म० चंद्रलोकाप्रत ] जातात. ज्याला पितृयाण ह्मणतात तो रयि [ अन्न ] हाच. ९. तपश्चर्या, ब्रह्मचर्य, श्रद्धा व विद्या यांचे योगानें ( प्राणरूपी ) आत्म्याला ( आत्मरूप ) जाणणारे उत्तरायणानें आदित्यलोक पावतात. हा सर्व प्राणांचा ( सामान्य ) आश्रय आहे. हा नाशरहित आहे, भयरहित आहे, ही अत्यंत श्रेष्ठ गति आहे. येथें गेल्यावर ( प्राणी ) पुन्हां परत येत नाहींत ह्मणून ( केवलकर्मी ) अज्ञानी मनुष्यांना हा बंद आहे. याविषयीं असा श्लोक आहे. १०. पांच पायांनीं युक्त [ हेमंत व शिशिर मिळून एक ऋतु समजला असतां संवत्सराचे पांच ऋतु होतात ], सर्वांचा जनक, बारा अवयवांनीं [ महिन्यांनीं ] युक्त व उदकानें युक्त [ पुरीषिणं, आदित्यामुळें वृष्टि होते

णम् ॥ अथेमे अन्य उ परे विचक्षणं सप्तचक्रे षडर आहु-
रर्पितमिति ॥ ११ ॥ मासो वै प्रजापतिस्तस्य कृष्णपक्ष
एव रयिः शुक्लः प्राणस्तस्मादेते ऋषयः शुक्ल इष्टिं कुर्व-
न्तीतर इतरस्मिन् ॥ १२ ॥ अहोरात्रो वै प्रजापतिस्त-
स्याहरेव प्राणो रात्रिरेव रयिः प्राणं वा एते प्रस्कन्दन्ति ॥
ये दिवा रत्या संयुज्यन्ते ब्रह्मचर्यमेव तद्यद्रात्रौ रत्या संयु-
ज्यन्ते ॥ १३ ॥ अन्नं वै प्रजापतिस्ततो ह वै तद्रेतस्त-

ह्मणून ] असा हा ( चंद्रादित्यरूप प्रजापति ) स्वर्ग लोकाच्या वरील अर्धामध्यें [ दिवः परे अर्धे ] आहे असें कोणी ह्मणतात [ अथ इमे ]. सप्तहययुक्त ( सतत गमन करणाऱ्या ) याच्या चक्रामध्यें सहा ( ऋतुरूपी ) अरा ठोकल्या आहेत असा हा सर्वज्ञ आहे असें दुसरे ह्मणतात. ११. ( संवत्सराचा अवयव ) मास हा ( देखील ) प्रजापति आहे. त्याचा कृष्णपक्ष हा रयि आणि शुक्लपक्ष हा प्राण. ह्मणून हे ऋषि शुक्ल पक्षांत यज्ञ कर-तात. इतर ( कोणी अज्ञानामुळें ) कृष्ण पक्षांत करतात. १२. अहोरात्र हा प्रजापति. त्याचा दिवस हा प्राण आणि रात्र हा

स्मादिमाः प्रजाः प्रजायन्त इति ॥ १४ ॥ तद्ये ह वै तत्प्रजापतिव्रतं चरन्ति, ये मिथुनमुत्पादयन्ते ॥ तेषामेवैष ब्रह्मलोको येषां तपो ब्रह्मचर्यं येषु सत्यं प्रतिष्ठितम् ॥१५॥ तेषामसौ विरजो ब्रह्मलोको न येषु जिह्ममनृतं न माया चेति ॥ १६ ॥ इति प्रथमः प्रश्नः ॥ १ ॥

अथ हैनं भार्गवो वैदर्भिः पप्रच्छ ॥ भगवन्कत्येव देवाः प्रजां विधारयन्ते कतर एतत्प्रकाशयन्ते कः पुनरेषां वरिष्ठ

राये. ......जे तप व ब्रह्मचर्य आचरण करतात आणि ज्यांचे ठिकाणीं सत्य स्थित आहे अशा या ( केवलकर्मी ) गृहस्थांना हा ( चंद्ररूपी ) ब्रह्मलोक प्राप्त होतो. १३–१५. कौटिल्य, असत्य आणि माया [ मिथ्या आचार ] हीं ज्यांचे ठिकाणीं नाहींत त्या [ ज्ञानयुक्त कर्म करणारांना ] हा रजोविरहित ब्रह्मलोक प्राप्त होतो.” १६. इति प्रथमः प्रश्नः ॥ १ ॥

## प्रश्न दुसरा.

नंतर विदर्भ देशींचा भार्गव प्रश्न करिता झाला कीं, हे भगवन् “ कोणते देव शरीराचें [ प्रजा ] विशेष धारण कर-

इति ॥ १ ॥ तस्मै स होवाचाकाशो ह वा एष देवो वायुरग्निरापः पृथिवी वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ॥ ते प्रकाश्याभिवदन्ति वयमेतद्बाणमवष्टभ्य विधारयामः ॥ २ ॥ तान्वरिष्ठः प्राण उवाच मा मोहमापद्यथाहमेवैतत्पञ्चधात्मानं

तात ? कोणते (देव) ( इंद्रियांचें आपापल्या कर्मांचे ठिकाणीं) प्रकाशन करतात ? आणि त्यांमध्यें वरिष्ठ कोण ? '' १. त्याला ते ( पिप्पलाद मुनि ) ह्मणाले, " आकाश, वायु, अग्नि, उदक, पृथिवी आणि वाणी [ ह्म० कर्मेंद्रियें ], मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि ( कर्मेंद्रियें व बुद्धींद्रियें ) हे ते ( शरीर धारण करणारे देव ) होत. ते ( आपलें कार्य ) सर्वांना प्रकट करून ह्मणतात, " आह्मीच या ( विनाशी ) शरीराला [ बाणं= विनाशं गच्छति इति ] शिथिल न होऊं देतां [ अवष्टभ्य ] धारण करतों.'' २ ( अशा प्रकारें अभिमान वाळगणाऱ्या) त्या इंद्रियांना ( त्यांच्याहून ) वरिष्ठ प्राण ह्मणाला, " मोह पावूं नका. कारण मीच स्वतःचे पांच विभाग करून ( त्यांचे योगानें ) या शरीराला अशिथिल प्रकारें धारण करीत आहें.''

प्रविभज्यैतद्बाणमवष्टभ्य विधारयामीति ॥ ३ ॥ तेऽश्रद्दधाना बभूवुः सोऽभिमानादूर्ध्वमुत्क्रमत इव तस्मिन्नुत्क्रामत्यथेतरे सर्व एवोत्क्रामन्ते तस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्व एव प्रातिष्ठन्ते। तद्यथा मक्षिका मधुकरराजानमुत्क्रामन्तं सर्वा एवोत्क्रामन्ते त एवमस्मिंश्च प्रतिष्ठमाने सर्वा एव प्रातिष्ठन्ते एवं वाङ्मनश्चक्षुः श्रोत्रं च ते प्रीताः प्राणं स्तु-

या भाषणाचा त्या इंद्रियांना विश्वास वाटला नाहीं. ३. त्यांच्या या अभिमानामुळें प्राणानें (शरीरांतून) वर निघून गेल्यासारखें केलें. तो (प्राण) वर निघून गेल्यावर सर्व (चक्षु आदि इंद्रियें) नाश पावलीं. (नंतर) प्राण (पुन्हां) स्थित झाल्यावर सर्व (इंद्रियें) स्थित झालीं. ज्याप्रमाणें मधुमक्षिका आपला राजा (एका ठिकाणाहून) उडून गेला ह्मणजे सर्व उडून जातात आणि तो (एका ठिकाणीं) बसला ह्मणजे सर्व (त्या ठिकाणीं) बसतात तद्वत्. याप्रमाणें, वाणी, मन, चक्षु, श्रोत्र इत्यादि इंद्रियें (प्राणाचें माहात्म्य जाणल्यावर) त्याचे ठिकाणीं प्रीतियुक्त होत्सातीं प्राणाची स्तुति करूं

न्वन्ति ॥ ४ ॥ एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवा-
नेष वायुरेष पृथिवी रयिर्देवः सदसच्चामृतं च यत् ॥ ५ ॥
अरा इव रथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितम् ॥ ऋचो यजूंषि
सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्म च ॥ ६ ॥ प्रजापतिश्चरसि गर्भे
त्वमेव प्रतिजायसे ॥ तुभ्यं प्राणः प्रजास्त्विमा बलिं हरन्ति

लागलीं. ४. हा ( प्राण ) अग्निरूपानें ज्वलन पावतो, हाच सूर्यरूपानें ( प्रकाशतो ), हाच पर्जन्यरूपानें ( वर्षाव करतो ), हाच इंद्ररूपानें ( प्रजापालन करतो ), वायुरूपानें ( वहातो ); हाच पृथिवी आहे, चंद्र आहे, सर्व जगताचा देव आहे, सर्व मूर्त आणि अमूर्त ( वस्तु ) आहे, हाच अमृत होय. ५. ज्याप्रमाणें ( चक्राच्या ) अरा रथ-नाभीचे ठिकाणीं स्थित असतात त्याप्रमाणें सर्व ( वस्तुजात ) प्राणाच्या ठिकाणीं स्थित आहे. ऋचा यजू आणि साम असे ( तिन्ही वेदांचे ) मंत्र, यज्ञ, क्षत्रियत्व आणि ब्राह्मणत्व हीं ( सर्व या प्राणाचे ठिकाणीं स्थित आहेत ). ६. हे प्राणा, तूंच प्रजापति आहेस, तूं गर्भामध्यें जातोस व जन्म पावतोस.

यः प्राणैः प्रतितिष्ठसि ॥ ७ ॥ देवानामसि वह्नितमः पितॄणां प्रथमा स्वधा ॥ ऋषीणां चरितं सत्यमथर्वाङ्गिरसामसि ॥ ८ ॥ इन्द्रस्त्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता ॥ त्वमन्तरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥ ९ ॥ यदा त्वमभिवर्षस्यथेमाः प्राणते प्रजाः ॥ आनन्दरूपास्तिष्ठन्ति

जो तूं ( चक्षु आदि ) इंद्रियांच्या रूपानें ( शरीरामध्यें ) रहातोस त्या तुला हे ( सर्व ) प्राणी ( चक्षु आदि द्वारांनीं ) बलि देतात. ७. सर्व देवांकडे बलि नेणारा [ वाह्नितमः ] तूं आहेस. पितृश्राद्धामध्यें पहिली आहुति तूं आहेस. अर्थवाचे जसे अंगिरस ऋषि त्याप्रमाणें ( मुख्य ) प्राणाचे जे चक्षु आदि ऋषि [इंद्रियें] त्यांचें ( देहधारणादि ) सत्य चरित तूं आहेस ८. हे प्राणा, तूं ( आपल्या ) तेजाच्या योगानें (केवळ) इंद्र आहेस, ( जगताचा ) पालनकर्ता रुद्र आहेस. तूं अंतरिक्षामध्यें संचार करतोस ( अर्थात् ) ज्योतींचा स्वामी सूर्य तूं आहेस. ९. जेव्हां तूं ( पर्जन्यरूपानें ) वर्षाव करतोस तेव्हां ही प्रजा जगते. ( तुझ्या वृष्टीच्या योगानें ) यथेच्छ अन्न होईल असें पाहून ( सर्व प्रजा )

कामायान्नं भविष्यतीति ॥ १० ॥ व्रात्यस्त्वं प्राणैकऋ-षिरत्ता विश्वस्य सत्पतिः ॥ वयमाद्यस्य दातारः पिता त्वं मातरिश्वनः ॥ ११ ॥ या ते तनूर्वाचि प्रतिष्ठिता या श्रोत्रे या च चक्षुषि ॥ या च मनसि संतता शिवां तां कुरु मोत्क्रमीः ॥ १२ ॥ प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवे यत्प्रति-

आनंदरूप होतात. १०. हे प्राणा, तूं व्रात्य आहेस [=जगतामध्यें तूंच पहिल्यानें उत्पन्न झाल्यामुळें तुझा संस्कार कोणीं केला नाहीं=तूं जगाच्या आरंभीं उत्पन्न झालास ], ( सर्व हवी ) भक्षण करणारा ( अथर्व वेदांतील प्रसिद्ध ) एकर्षिनामक ( अग्नि ) तूं आहेस, विद्यमान विश्वाचा पति आहेस. आद्य अशा तुला ( हवि ) देणारे आह्मी आहोंत. वायूचा ( देखील ) उत्पन्न-कर्ता तूं आहेस. ११. जें तुझें रूप वाचेमध्यें स्थित आहे, श्रोत्रामध्यें, चक्षूमध्यें, मनामध्यें संतत स्थित आहे तें शुभ कर. उत्क्रमण पावूं नको [ ह्म० अशुभ करूं नको ]. १२. ( एकंदरींत ) त्रैलोक्यामध्यें जें जें ह्मणून स्थित आहे तें तें सर्व प्राणाच्या अधीन आहे. ( हे प्राणा ), माता ज्याप्रमाणें

ष्ठितम् ॥ मातेव पुत्रान्रक्षस्व श्रीश्च प्रज्ञां च विधेहि न इति ॥ १२ ॥ इति द्वितीयः प्रश्नः ॥ २ ॥

अथ हैनं कौसल्यश्चाश्वलायनः प्रपच्छ ॥ भगवन्कुत एष प्राणो जायते कथमायात्यस्मिञ्छरीर आत्मानं वा प्रविभज्य कथं प्रातिष्ठते केनोत्क्रमते कथं बाह्यमभिधत्ते कथमध्यात्ममिति ॥ १ ॥ तस्मै स होवाचाति प्रश्नान्पृच्छसि

पुत्रांचें पालन करते त्याप्रमाणें आमचें रक्षण कर. आह्मांला संपत्ति व बुद्धि दे. १२. इति द्वितीयः प्रश्नः ॥ २ ॥

## प्रश्न तिसरा.

नंतर अश्वलाचा पुत्र कौसल्य प्रश्न करता झाला कीं, हे भगवन्, हा प्राण कशापासून उत्पन्न होतो ? या शरीरांत कसा येतो ? आत्म्याहून पृथक् असा ( शरीरांत) कसा रहातो ? (शरीरापासून ) कसा निघून जातो ? आधिभौतिक व आधिदैविक वस्तु कसा धारण करतो ? आध्यात्मिक [ आत्म्याशीं संबद्ध असें शरीर ] कसें धारण करतो ? १. पिप्पलाद मुनि ह्मणाले, ( सामान्य मनुष्यांना न समजण्यासारख्या प्रश्नांहून देखील )

ब्रह्मिष्ठोऽसीति तस्मात्तेऽहं ब्रवीमि ॥ २ ॥ आत्मन एष प्राणो जायते ॥ यथैषा पुरुषे छायैतस्मिन्नेतदाततं मनोकृतेनायात्यस्मिञ्छरीरे ॥ ३ ॥ यथा सम्राडेवाधिकृतान्विनियुङ्क्ते ॥ एतान्ग्रामानेतान्ग्रामानधितिष्ठस्वेत्येवमेवैष प्राणः ॥ इतरान्प्राणान्पृथक्पृथगेव संनिधत्ते ॥ ४ ॥ पायूपस्थेऽपानं चक्षुः श्रोत्रे मुखनासिकाभ्यां प्राणः स्वयं प्राति-

कठिण प्रश्न तूं विचारीत आहेस. तूं ब्रह्मज्ञ आहेस म्हणून (संतुष्ट होत्साता ) मी तुला सांगतों. २. ( परम पुरुष ) आत्म्यापासून प्राण उत्पन्न होतो. ज्याप्रमाणें देहाची छाया त्याप्रमाणें या ब्रह्माचे ठिकाणीं हा ( प्राण ) होतो. मनाच्या [ संकल्पाच्या ] योगानें उत्पन्न झालेल्या कर्मांमुळें हा ( प्राण ) या शरीरांत येतो. ३. ज्याप्रमाणें अमुक अमुक गांवावर अधिकार चालवा अशी अधिकाऱ्यांची नेमणूक सम्राट् करतो, त्याप्रमाणें हा ( मुख्य ) प्राण इतर ( चक्षु आदि ) प्राणांची निरानिराळ्या कामांवर नेमणूक करतो. ४. पायु [ गुद ] व उपस्थ यांचे ठिकाणीं अपान; चक्षु व श्रोत्र यांचे ठिकाणीं स्थित

ष्ठते मध्ये तु समानः ॥ एष ह्येतद् हुतमन्नं समुन्नयति तस्मादेताः सप्तार्चिषो भवन्ति ॥ ५ ॥ हृदि ह्येष आत्मा ॥ अत्रैतदेकशतं नाडीनां तासां शतं शतमेकैकस्यां द्वासप्ततिर्द्वासप्ततिः प्रतिशाखानाडीसहस्राणि भवन्त्यासु व्यानश्चरति ॥ ६ ॥ अथैकयोर्ध्व उदानः पुण्येन पुण्यं लोकं

आणि मुख व नासिका यांचे द्वारें ( बाहेर जाणारा ) प्राण असतो. ( प्राण व अपान यांच्या ) मध्यें [ नाभीचे ठिकाणीं ] समान असतो. हा ( अग्नीमध्यें ) टाकलेलें अन्न ( सर्वत्र ) समान करतो. याचे योगानें ( हृदयापासून ) सात ज्वाळा [ दर्शन, श्रवण इत्यादि प्रकारच्या ] उत्पन्न होतात. ५. हृदयामध्यें हा ( लिंगस्वरूपी ) आत्मा आहे. येथेंच एकशें एक ( प्रधान ) नाडी आहेत. त्या प्रत्येक (प्रधान) नाडीचे शंभर भेद [शाखानाडी] आहेत. त्या प्रत्येक शाखानाडीच्या (पुन्हां) बहात्तर हजार प्रतिशाखा नाड्या आहेत. या नाड्यांमध्यें व्यान संचार करतो. ६. ( प्रधान नाड्यांपैकीं ) एका ( सुषुम्ना ) नाडीनें ऊर्ध्वगामी उदान ( वायु ) पुण्यकर्मांचे योगानें पुण्य-

नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम् ॥ ७ ॥
आदित्यो ह वै बाह्यः प्राण उदयत्येष ह्येनं चाक्षुषं प्राण-
मनुगृह्णानः ॥ पृथिव्यां या देवता सैषा पुरुषस्यापानमव-
ष्टभ्यान्तरा यदाकाशः स समानो वायुर्व्यानः ॥ ८ ॥
तेजो ह वाव उदानस्तस्मादुपशान्ततेजाः ॥ पुनर्भवमिन्द्रि-
यैर्मनसि संपद्यमानैः ॥ ९ ॥ यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति

लोकाला नेतो; पापकर्माचे योगानें पापलोकाला नेतो; दोन्ही समान असतील तर मनुष्यलोकाला नेतो. ७. आदित्य हा बाह्य प्राण आहे. तो चाक्षुष प्राणावर अनुग्रह करीत वर जातो. पृथिवीचें अधिष्ठान असणारी जी देवता ती अपान व्यापून देहाच्या खालीं जाते. मध्यभागींची आकाश देवता समान व्यापून रहाते. (सर्वव्यापी) वायु व्यान व्यापतो. ८. (सामान्य) तेजोरूपी देवता उदान व्यापून रहाते. ( तें देवतेचें तेज शरीरांतून नाहींसें झालें ह्मणजे) त्याचे योगानें मनुष्य नष्टतेज होतो [ मरण पावतो ], ( सर्व ) इंद्रियें मनामध्यें प्रविष्ट होऊन पुनर्जन्माप्रत जातो. ९. ( मरणकालीं ) जो संकल्प असतो त्या

प्राणस्तेजसा युक्तः ॥ सहात्मना यथासंकल्पितं लोकं नयति ॥ १० ॥ य एवं विद्वान्प्राणं वेद ॥ न हास्य प्रजा हीयतेऽमृतो भवति तदेष श्लोकः ॥ ११ ॥ उत्पत्तिमायतिं स्थानं विभुत्वं चैव पञ्चधा ॥ अध्यात्मं चैव प्राणस्य विज्ञायामृतमश्नुते विज्ञायामृतमश्नुत इति ॥ १२ ॥ इति तृतीयः प्रश्नः ॥

संकल्पानें मुख्यप्राणयुक्त होतो. प्राण तेजानें युक्त होऊन ( स्वामी भोक्ता ) जो आत्मा त्यासह संकल्पानुरूप लोकाप्रत नेतो १०. जो हें सर्व जाणतो त्यालाच प्राणाचें ज्ञान झालें ( असें समजावें). हें ज्ञान झालेल्या मनुष्याचा वंश क्षीण होत नाहीं. (शरीर नष्ट झालें तरी ) तो मृत्युरहित होतो. याविषयीं पुढील श्लोक आहे –( या ) प्राणाची उत्पत्ति, आगमन, स्थिति आणि पांच प्रकारांनीं ( शरीर ) व्यापून रहाणें ( हें बाह्य ) व आत्म्याशीं संबद्ध असें ( चक्षु इत्यादिकांचे ठिकाणीं ) रहाणें हीं जाणणारा मृत्युरहितत्व पावतो. १२.

इति तृतीयः प्रश्नः ॥ ३ ॥

अथ हैनं सौर्यायणी गार्ग्यः पप्रच्छ ॥ भगवन्नेतस्मि-
न्पुरुषे कानि स्वपन्ति कान्यस्मिञ्जाग्रति कतर एष देवः
स्वप्नान्पश्यति कस्यैतत्सुखं भवति कस्मिन्नु सर्वे संप्रतिष्ठिता
भवन्तीति ॥ १ ॥ तस्मै स होवाच ॥ यथा गार्ग्य मरी-
चयोऽर्कस्यास्तं गच्छतः सर्वा एतस्मिंस्तेजोमण्डल एकीभ-
वन्ति ॥ ताः पुनःपुनरुदयतः प्रचरन्त्येवं ह वै तत्सर्वं परे

## प्रश्न चवथा.

नंतर गर्गगोत्रोत्पन्न सौर्यायणि ( पिप्पलाद ) मुनींना प्रश्न करिता झाला कीं, हे भगवन् या शरीरामध्यें कोणतीं इंद्रियें झोंप घेतात ? कोणतीं जागतात ? कोणता देव स्वप्नें पहातो ? सुख होतें हें कोणाला होतें ? १. हीं सर्व ( इंद्रियें वगैरे ) कशामध्यें स्थिर आहेत ? ( पिप्पलाद ) मुनि त्याला ह्मणाले, हे गार्ग्या, ज्याप्रमाणें अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे सर्व किरण त्या तेजोमंडलामध्यें एक होतात आणि सूर्य पुन्हां उदय पावला ह्मणजे ( त्यापासून ) प्रसृत होतात, त्याप्रमाणें तें सर्व ( विषयेंद्रियांपासून उत्पन्न होणारें त्यांहून ) श्रेष्ठ व दिव्य अशा

देवे मनस्येकीभवति ॥ तेन तर्ह्येष पुरुषो न शृणोति न पश्यति न जिघ्रति न रसयते न स्पृशते नाभिवदते नादत्ते नानन्दयते न विसृजते नेयायते स्वपितीत्याचक्षते ॥ २ ॥ प्राणाग्नय एवैतस्मिन्पुरे जाग्रति गार्हपत्यो ह वा एषोऽपानो व्यानोऽन्वाहार्यपचनो यद्गार्हपत्यात्प्रणीयते प्रणयनादाहव-नीयः प्राणः ॥ ३ ॥ यदुच्छ्वासनिःश्वासावेतावाहुती समं

मनामध्यें ( स्वप्नकालीं ) एक होतें. ह्मणून हा पुरुष ( त्या वेळीं ) ऐकत नाहीं, पहात नाहीं, वास घेत नाहीं, स्वाद घेत नाहीं, स्पर्श जाणत नाहीं, बोलत नाहीं, घेत नाहीं, आनंद पावत नाहीं, टाकीत नाहीं, गमन करीत नाहीं. तो झोंप घेत आहे असें ह्मणतात. २. ( इंद्रियें झोंप घेत असतां ) या शरीरामध्यें प्राणरूपी अग्नि जागृत असतात. अपान हा गार्हपत्य ( अग्नि ) होय. व्यान हा अन्वाहार्यपचन (दक्षिणाग्नि) होय. प्राण हा गार्ह-पत्यापासून वर ( मुख व नासिका यांचे ठिकाणीं ) नेला जातो ह्मणून आहवनीय ( अग्नि ) होय ३. उच्छ्वास आणि निश्वास-रूपी आहुति ( शरीराच्या बाहेर व आंत ) समान नेतो ह्मणून

नयतीति स समानः मनो ह वाव यजमान इष्टफलमेवो- दानः स एनं यजमानमहरहर्ब्रह्म गमयति ॥ ४ ॥ अत्रैष देवः स्वप्ने महिमानमनुभवति ॥ यद्दृष्टं दृष्टमनुपश्यति श्रुतं श्रुतमेवार्थमनुशृणोति देशदिगन्तरैश्च प्रत्यनुभूतं पुनः- पुनः प्रत्यनुभवति दृष्टं चादृष्टं च श्रुतं चाश्रुतं चानुभूतं चाननुभूतं च सच्चासच्च सर्वं पश्यति सर्वः पश्यति ॥ ५ ॥

समान हा होता होय. मन हा यजमान होय. आणि उदान हें यज्ञाचें फल होय. ( कारण ) तो ( ऊर्ध्वगामी उदान सुषुप्ति कालीं) दररोज यजमानाला [मनाला] ब्रह्माची प्राप्ति करून देतो. ४. या वेळीं हाच (मनोरूपी ) देव स्वप्नामध्यें ( आपल्या ) महान् रूपाचा अनुभव घेतो, जें जें ( वासनेच्या प्रबलतेनुरूप ) पाहिलें असेल तें तें पुन्हां पहातो, ऐकलें असेल तें तें पुन्हां ऐकतो, नाना ठिकाणीं अनुभविलें असेल तें तें पुन्हां अनुभवितो; पाहिलेलें, न पाहिलेलें, ऐकलेलें, न ऐकलेलें, अनुभविलेलें, न अनुभविलेलें, अस्तित्वांत असलेलें, आस्तित्वांत नसलेलें असें सर्व ( स्वतः ) सर्वरूप होत्साता पहातो. ५. तो ( मनोरूपी ) देव जेव्हां

स यदा तेजसाभिभूतो भवत्यत्रैष देवः स्वप्नान्न पश्यत्यथ तदैतस्मिञ्छरीरे एतत्सुखं भवति ॥ ६ ॥ स यथा सोम्य वयांसि वासो वृक्षं संप्रतिष्ठन्ते ॥ एवं ह वै सत्सर्वं पर आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ७ ॥ पृथिवी च पृथिवीमात्रा चापश्चापोमात्रा च तेजश्च तेजोमात्रा च वायुश्च वायुमात्रा चाकाशश्चाकाशमात्रा च चक्षुश्च द्रष्टव्यं च श्रोत्रं च

( ब्रह्मरूपी ) तेजानें व्याप्त होतो तेव्हां याला स्वप्नें दिसत नाहींत ( मनाचे किरण हृदयामध्यें आकृष्ट होतात ). तेव्हां ( सुषुप्तीमध्यें ) या शरीराला हें सुख होतें. ६. बाळा गार्ग्या, पक्षी ज्याप्रमाणें निवासस्थानाच्या वृक्षावर ( एकत्र ) जातात त्याप्रमाणें (यावेळीं) हीं सर्व पर-श्रेष्ठ अशा ( आनंदस्वरूपी ) आत्म्याचे ठिकाणीं एकत्र होतात, ७. ( हें सर्व ह्मणजे )— ( स्थूल ) पृथिवी, ( कारणरूप सूक्ष्म ) पृथिवीमात्रा, आप, आपोमात्रा, तेज, तेजोमात्रा, वायु, वायुमात्रा, आकाश, आकाशमात्रा, चक्षु, द्रष्टव्य [ चक्षूला गोचर असें सर्व ], श्रोत्र, श्रोतव्य, घ्राण, घ्रातव्य, रस, रसयितव्य, त्वचा, स्पर्शयितव्य,

श्रोतव्यं च घ्राणं च घ्रातव्यं च रसश्च रसयितव्यं च त्वक् च स्पर्शयितव्यं च वाक् च वक्तव्यं च हस्तौ चादातव्यं चोपस्थश्चानन्दयितव्यं च पायुश्च विसर्जयितव्यं च पादौ च गन्तव्यं च मनश्च मन्तव्यं च बुद्धिश्च बोद्धव्यं चाहङ्कारश्चाहंकर्तव्यं च चित्तं च चेतयितव्यं च तेजश्च विद्योतयितव्यं च प्राणश्च विधारयितव्यं च ॥ ८ ॥ एष हि द्रष्टा स्प्रष्टा श्रोता घ्राता रसयिता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञानात्मा पुरुषः ॥ स परेऽक्षरे आत्मनि संप्रतिष्ठते ॥ ९ ॥

ाणी, वक्तव्य, हस्त, हस्तविषय, उपस्थ, उपस्थानंदविषय, ुद, विसर्जयितव्य, पाय, गमनविषय, मन, मंतव्य, बुद्धि, ोद्धव्य, अहंकार, अहंकारविषय, चित्त, चित्तविषय, तेज, ेजोविषय, प्राण आणि प्राणधारणविषय. ८. हाच ( उपाधिहित झालेला ) पहाणारा, स्पर्श करणारा, श्रवण करणारा, ास घेणारा, स्वाद घेणारा, मनन करणारा, जाणणारा, रणारा, विज्ञानस्वभावी आत्मा पुरुष होय. हा पर [ श्रेष्ठ ] ाविनाशी अशा आत्म्याचे [ परमात्म्याचे ] ठिकाणीं स्थित

परमेवाक्षरं प्रतिपद्यते स यो ह वै तदच्छायमशरीरमलो-
हितं शुभ्रमक्षरं वेदयते यस्तु सोम्य ॥ स सर्वज्ञः सर्वो
भवति तदेष श्लोकः ॥ १० ॥ विज्ञानात्मा सह देवैश्च
सर्वैः प्राणा भूतानि संप्रतिष्ठन्ति यत्र ॥ तदक्षरं वेदयते
यस्तु सोम्य स सर्वज्ञः सर्वमेवाविवेशेति ॥ ११ ॥ इति
चतुर्थः प्रश्नः ॥ ४ ॥

आहे. ९. हे बाळा, त्या अच्छाय [ तमोरहित ], ( सर्व नाम-रूपादि उपाधिरूपी ) शरीररहित, अंतःकरणरहित [ अथवा रागरहित ], शुभ्र [ प्रकाशरूप ], नाशरहित अशा परमात्म्याला जो जाणतो तो त्या अविनाशी परमात्म्याप्रत जातो. तो सर्वरूप व सर्वज्ञ होतो. याविषयीं असा श्लोक आहे— सर्व करणांनीं [ देवैः ] युक्त असे प्राण व ( पृथिव्यादि ) भूतें ज्या विज्ञानरूपी परमात्म्याचे ठिकाणीं स्थित आहेत त्या अविनाशी परमात्म्याला जो जाणतो तो, हे बाळा, सर्वज्ञ होय, तो सर्व व्यापून रहातो. १०. ११.

इति चतुर्थः प्रश्नः ॥ ४ ॥

अथ हैनं शैब्यः सत्यकामः पप्रच्छ ॥ स यो ह वै तद्भगवन्मनुष्येषु प्रायणान्तमोङ्कारमभिध्यायीत ॥ कतमं वाव स तेन लोकं जयतीति ॥ १ ॥ तस्मै स होवाच ॥ एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारस्तस्माद्विद्वानेतेनैवायतनेनैकतरमन्वेति ॥ २ ॥ स यद्येकमात्रमभिध्यायीत स तेनैव

## प्रश्न पांचवा.

नंतर शिबीचा पुत्र सत्यकाम मुनींना विचारता झाला कीं, हे भगवन्, मनुष्यांपैकीं जो कोणी मरणापर्यंत ओंकाराचें [ ओंकाररूपी ब्रह्माचें ] ध्यान करील [ यमनियमादि व्रतांचें यावज्जीव पालन करील ] तो तेणेंकरून कोणता लोक प्राप्त करून घेईल ? १. (मुनि ह्मणाले), हे सत्यकामा, ओंकाररूपी ब्रह्म पर आणि अपर असें ( दोन प्रकारचें ) आहे. ह्मणून हें जाणणारा मनुष्य याच ( आत्मप्राप्तीला साधन अशा ) ओंकारध्यानरूपी आश्रयानें ( स्वतःला प्रिय वाटणाऱ्या ) दोहोंपैकीं एका ब्रह्माकडे जातो. २. तो जर केवळ अकारमात्र ब्रह्माचें ध्यान करील तर त्या ध्यानाचे योगानें ( एक-

संवेदितस्तूर्णमेव जगत्यामभिसंपद्यते ॥ तमृचो मनुष्यलोक-मुपनयन्ते स तत्र तपसा ब्रह्मचर्येण श्रद्धया संपन्नो महि-मानमनुभवति ॥ ३ ॥ अथ यदि द्विमात्रेण मनसि संप-द्यते सोऽन्तरिक्षं यजुर्भिरुन्नीयते ॥ स सोमलोकं॥स सोम-लोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते ॥ ४ ॥ यः पुनरेतंत्त्रि-मात्रेणैवोमित्येतेनैवाक्षरेण परं पुरुषमभिध्यायीत स तेजसि

मात्रा—) ज्ञानयुक्त होऊन लवकरच पृथिवीवर ( संपन्न ) जन्म पावतो. ( अनेकजन्मांनंतर ) ऋग्वेदाचे मंत्र त्याला मनुष्यशरीराला आणतात. तो तेथें तप, ब्रह्मचर्य आणि श्रद्धा यांनीं युक्त होत्साता वैभवाचा [ आत्मानंदरहित मानु-षानंदाचा ] अनुभव घेतो. ३. जर दोन मात्रांनीं युक्त अशा ब्रह्माचें ध्यान करील तर तो मनानें संपन्न होतो. यजुर्वेदाचे मंत्र त्याला अंतरिक्षांतील सोमलोकाप्रत नेतात. तो सोमलोकामध्यें ऐश्वर्याचा अनुभव घेऊन पुन्हां ( कर्मानुसार ) ( मृत्युलोकीं ) परत येतो. ४. परंतु जो ( पूर्ण ) तीन मात्रांनीं ओम् या अक्षरानें परपुरुषाचें

सूर्ये संपन्नः ॥ यथा पादोदरस्त्वचा विनिर्मुच्यत एवं ह वै स पाप्मना विनिर्मुक्तः स सामभिरुन्नीयते ब्रह्मलोकं स एतस्माज्जीवघनात्परात्परं पुरिशयं पुरुषमीक्षते तदेतौ श्लोकौ भवतः ॥ ५ ॥ तिस्रो मात्रा मृत्युमत्यः प्रयुक्ता अन्योन्यसक्ता अनुविप्रयुक्ताः ॥ क्रियासु बाह्याभ्यन्तरमध्य-

ध्यान करील तो तेजोयुक्त सूर्यलोकीं संपन्न होतो. ज्याप्रमाणें सर्प कात टाकून निघतो त्याप्रमाणें तो पापापासून मुक्त होत्साता साममंत्रांनीं वर ब्रह्मलोकीं जातो [ खालीं येत नाहीं ]. तो ( तेथें ) या जीवयुक्त आत्म्याहून अत्यंत श्रेष्ठ व सर्वशरीरव्यापी अशा पुरुषाला पहातो. याविषयीं पुढील श्लोक आहेत. ५.—तीन मात्रा ( ब्रह्मदृष्टि नसेल तर ) मृत्युयुक्त आहेत. त्याच आत्म्याचे ध्यानाकडे लावल्या तर परस्परसंबद्ध व अभिन्न आहेत. बाह्य, आभ्यंतर आणि मध्यम [ याग, प्राणायाम, जप इत्यादि ] क्रियांचे ठिकाणीं ( ब्रह्माहून मी भिन्न नाहीं अशा ) योग्य रीतीनें या मात्रांचा उपयोग केला असतां ज्ञानी मनुष्य ( ओंकाररूप होत्साता )

मासु सम्यक् प्रयुक्तासु न कम्पते ज्ञः ॥ ६ ॥ ऋग्भिरेतं यजुर्भिरन्तरिक्षं ससामभिर्यत्तत्कवयो वेदयन्ते ॥ तमोंकारेणैवायतनेनान्वेति विद्वान्यत्तच्छान्तमजरममृतमभयं परं चेति ॥ ७ ॥ इति पञ्चमः प्रश्नः ॥ ५ ॥

अथ हैनं सुकेशा भारद्वाजः पप्रच्छ ॥ भगवान्हिरण्यनाभः कौसल्यो राजपुत्रो मामुपेत्यैतं प्रश्नमपृच्छत ॥ षोड-

चंचलतारहित होतो. ६. ऋग्वेदमंत्रांनीं हा ( मनुष्य ) लोक, यजुर्वेदमंत्रांनीं अंतरिक्ष लोक आणि सामवेदमंत्रांनीं ज्ञानी जो जाणतात तो ( ब्रह्म ) लोक प्राप्त होतो तो हा ( अपर-ब्रह्मलक्षण त्रिविध लोक ) ओंकाररूपी साधनानेंच विद्वानाला प्राप्त होतो. शान्त, जरारहित, मरणरहित व भयरहित असें जें पर ( ब्रह्म ) तेंहि याच साधनानें प्राप्त होतें. ७.

इति पंचमः प्रश्नः ॥ ५ ॥

## प्रश्न सहावा.

नंतर भरद्वाजाचा पुत्र सुकेश मुनींना विचारता झाला कीं, हे भगवन्, कोसलदेशींचा हिरण्यनाभ नामक राज-

शकलं भारद्वाज पुरुषं वेत्थ तमहं कुमारमब्रुवं नाहमिमं वेद यद्यहमिममवेदिषं कथं ते नावक्ष्यामिति समूलो वा एष परिशुष्यति योऽनृतमभिवदति तस्मान्नार्हाम्यनृतं वक्तुं स तूष्णीं रथमारुह्य प्रवव्राज ॥ तं त्वा पृच्छामि क्वासौ पुरुष इति ॥ १ ॥ तस्मै स होवाच ॥ इहैवान्तःशरीरे सोम्य स पुरुषो यस्मिन्नेताः षोडशकलाः प्रभवन्तीति

पुत्र माझ्याकडे येऊन प्रश्न विचारता झाला कीं, हे भारद्वाजा, सोळा कलांचा [ अवयवांचा ] पुरुष तुला माहीत आहे का?" त्या कुमाराला मीं सांगितलें कीं, "मला माहीत नाहीं. जर असा ( पुरुष ) मला माहीत असता तर मीं तुला कां बरें सांगितला नसता ? जो असत्य बोलतो तो मूळासकट सर्वत्र शुष्क होतो. ह्मणून मीं असत्य भाषण करणें योग्य नाहीं." तो मुकाट्यानें रथावर आरूढ होऊन परत गेला. ( असा ) हा पुरुष कोठें आहे असें मी आपणांस विचारतों. १. त्याला ते ( मुनि ) ह्मणाले, बाळा, ज्याच्यामध्यें सोळा कला उत्पन्न होतात असा हा पुरुष याच शरीराच्या अंतर्भागीं

॥ २ ॥ स ईक्षांचक्रे ॥ कस्मिन्नहमुत्क्रान्त उत्क्रान्तो भविष्यामि कस्मिन्वा प्रतिष्ठिते प्रतिष्ठास्यामीति ॥ ३ ॥ स प्राणमसृजत प्राणाच्छ्रद्धां खं वायुर्ज्योतिरापः पृथिवीन्द्रियम् ॥ मनोऽन्नमन्नाद्वीर्यं तपो मन्त्राः कर्मलोका लोकेषु च नाम च ॥ ४ ॥स यथेमा नद्यः स्यन्दमानाः समुद्रायणाः समुद्रं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते तासां नामरूपे

( हृदयकमलीं ) आहे. २. तो ( पुरुष ) विचार करता झाला कीं, " असें कोणतें तत्त्व आहे कीं जें ( देहांतून ) वर गेलें असतां ( स्वयंप्रकाश आनंदरूप असा ) मी वर जाईन आणि जें ( देहामध्यें ) स्थित असतां मी स्थित राहीन ? " ( ह्मणून ) त्यानें प्राणाची उत्पत्ति केली, प्राणापासून श्रद्धा, नंतर आकाश, वायु, तेज, आप, पृथिवी, इंद्रिय [ कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें ], मन, अन्न, अन्नापासून वीर्य, तप, ( वेदांचे मंत्र, ( अग्निहोत्रादि ) कर्म, लोक [ कर्माचें फल पृथिवी, स्वर्ग इत्यादि ] आणि लोकांमध्यें नांव. ४. ज्याप्रमाणें या वहाणाऱ्या व समुद्राकडे जाणाऱ्या नद्या समुद्राप्रत प्राप्त झाल्या

समुद्र इत्येवं प्रोच्यते ॥ एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडश-
कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति भिद्येते
तासां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो
भवति तदेष श्लोकः ॥ ५ ॥ अरा इव रथनाभौ कला
यस्मिन्प्रतिष्ठिताः ॥ तं वेद्यं पुरुषं वेद यथा मा वो मृत्युः
परिव्यथा इति ॥ ६ ॥ तान्होवाचैतावदेवाहमेतत्परं ब्रह्म

असतां अस्त पावतात व त्यांचें नांव आणि रूप हीं समुद्रा मध्यें नष्ट होतात, त्याप्रमाणें या सर्वसाक्षी पुरुषाच्या सोळा कला पुरुषाकडे जाणाऱ्या आहेत, त्या पुरुषाकडे आल्या ह्मणजे अस्त पावतात व त्यांचें नांव आणि रूप हीं पुरुषामध्यें नष्ट होतात असें (ब्रह्मज्ञान्यांनीं) सांगितलें आहे. (हें जो जाणतो) तो कलारहित व मृत्युरहित होतो. याविषयीं असा श्लोक आहे—५. रथनाभीचे ठिकाणीं ज्याप्रमाणें अरा, त्याप्रमाणें ज्याचे ठिकाणीं कला स्थित आहेत त्या जाणण्याला योग्य अशा पुरुषाला, हे शिष्यहो, तुह्मांला मृत्यूनें पीडा देऊं नये याकरितां, जाणा. ६. (नंतर) त्यांना ते (पिप्पलाद

वेदानातः परमस्तीति ॥ ७ ॥ ते तमर्चयन्तस्त्वं हि नः पिता योऽस्माकमविद्यायाः परं पारं तारयसीति ॥ नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥८॥ इति षष्ठः प्रश्नः ६

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्ताक्ष्र्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

॥ इति प्रश्नोपनिषत्समाप्ता ॥ ॐ तत्सत् ॥

---

मुनि ) ह्मणाले, परब्रह्माचें मला इतकेंच ज्ञान आहे; आणि या ज्ञानाहून अधिक ज्ञान ( कोणालाच ) नाहीं. ७. त्या शिष्यांनीं मुनींची पूजा करून भाषण केलें, अविद्येच्या परतीरावर नेऊन आमचें तारण करणारा जो तूं तोच खरोखर आमचा पिता आहेस. ( ब्रह्मविद्यासंप्रदायी ) श्रेष्ठ ऋषींना आमचा (आदरयुक्त) नमस्कार असो. ८. इति षष्ठः प्रश्नः६

॥ इति प्रश्नोपनिषत्समाप्ता ॥

---

मुण्डकोपनिषत् ॥ ५ ॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ॐ ब्रह्मा देवानां प्रथमः संबभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता ॥ स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठामथर्वाय ज्ये-

मुंडकोपनिषत्.



हे देवहो, आमचे कर्ण कल्याणकारक ( गोष्टी ) श्रवण करोत. हे यजनीय देवहो, आमचे चक्षु कल्याणकारक (गोष्टी) पाहोत. स्थिर अशा अवयवांनीं व शरीरांनीं युक्त होत्सात्या आह्मांकडून तुमचें स्तवन होवो. देवांनीं दिलेलें जें आयुष्य असेल तें आह्मांस प्राप्त होवो. प्राचीन ज्ञानी असा इंद्र, सर्वज्ञानी सूर्य, अरिष्टांचा नाश करणारा गरुड आणि बृहस्पति हे आमचें कल्याण करोत. ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

ष्ठपुत्राय प्राह ॥ १ ॥ अथर्वणे यां प्रवदेत ब्रह्माथर्वा तां पुरोवाचाङ्गिरे ब्रह्मविद्याम् ॥ स भारद्वाजाय सत्यवहाय प्राह भारद्वाजोऽङ्गिरसे परावराम् ॥ २ ॥ शौनको ह वै महाशालोऽङ्गिरसं विधिवदुपसन्नः पप्रच्छ ॥ कस्मिन्नु भगवो विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति ॥ ३ ॥ तस्मै स होवाच ॥ द्वे विद्ये वेदितव्ये इति ह स्म यद्ब्रह्मविदो

( इंद्रादि ) देवांपैकीं प्रथम, विश्वाचा कर्ता व भुवनांचा पालयिता ब्रह्मदेव उत्पन्न झाला. सर्व विद्यांचें आश्रयस्थान अशी ब्रह्मविद्या त्यानें ( अ पला ) ज्येष्ठ पुत्र अथर्वा याला सांगितली. १. ब्रह्मदेवानें जी अथर्वा याला सांगितली ती त्यानें नंतर अंगिः याला सांगितली. त्यानें भरद्वाजगोत्रोत्पन्न सत्यवहाला सांगितली. ( अशी एकापासून दुसऱ्याला अशा ) क्रमानें आलेली ( ही विद्या ) सत्यवहानें अंगिरसाला सांगितली. २. अत्यंत गृहस्थधर्मयुक्त शौनक विधिपूर्वक अंगिरस् मुनीकडे येऊन विचारता झाला कीं, हे भगवन्, ( असें ) काय ( आहे कीं जें ) जाणलें असतां हें सर्व ज्ञात होईल ? ३. त्याला ते मुनि

वदन्ति परा चैवापरा च ॥ ४ ॥ तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥ अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ ५ ॥ यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुःश्रोत्रं तदपाणिपादं ॥ नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तद-

ह्मणाले, परा विद्या आणि अपरा विद्या या दोन विद्या जाणण्याला योग्य आहेत असें ब्रह्मवेत्ते सांगतात. ४. त्यांपैकीं अपरा विद्या ह्मणजे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद (आणि त्यांचीं अंगें ) शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष हीं होत. आतां परा विद्या ह्मणजे जिच्या योगानें तें अविनाशी ( ब्रह्म ) प्राप्त होतें ती होय. ५. तें ( ब्रह्म ) ह्मणजे जें ( ज्ञानेंद्रियांना ) पहाण्यास अशक्य, (कर्मेंद्रियांना) ग्रहण करण्यास अशक्य, मूलरहित, गुणरहित, चक्षु व श्रोत्र यांनीं रहित, हस्त व पाद यांनीं रहित, नित्य, सर्वविध [=विभु= ब्रह्मदेवापासून सर्व प्राण्यांच्या रूपानें सर्वविध असलेलें ], सर्वव्यापी, अत्यंत सूक्ष्म आणि क्षयरहित असें जें ( सर्व )

ऽव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥ ६ ॥ यथोर्णना-
भिः सृजते गृह्णते च यथा पृथिव्यामोषधयः संभवन्ति ॥
यथा सतः पुरुषात्केशलोमानि तथाक्षरात्संभवतीह विश्वम्
॥ ७ ॥ तपसा चीयते ब्रह्म ततोऽन्नमभिजायते ॥
अन्नात्प्राणो मनः सत्यं लोकाः कर्मसु चामृतम् ॥ ८ ॥

प्राण्यांच्या उत्पत्तीला कारण आहे असें ज्ञाते जाणतात तें होय.
६. ज्याप्रमाणें कोळी (स्वतःच तंतु) उत्पन्न करतो व (पुन्हां) आंत घेतो, ज्याप्रमाणें पृथिवीवर ओषधी उत्पन्न होतात, ज्याप्रमाणें जिवंत मनुष्यापासून (मस्तकाचे) केश आणि (शरीरावरील) लव उत्पन्न होतात त्याप्रमाणें (त्या) क्षयरहित ब्रह्मापासून विश्व उत्पन्न होतें. ७. (सृष्टि निर्माण करण्याच्या) ज्ञानानें [ तपसा ] ( कार्यलक्षण अथवा हिरण्यगर्भ ) ब्रह्म वृद्धि पावतें [ मी अनेक रूपें धारण करीन अशी दृष्टि होते ]; त्यापासून अन्न उत्पन्न होतें; अन्नापासून प्राण उत्पन्न होतो; प्राणापासून मन [ संकल्प ] उत्पन्न होतें; मनापासून आकाशादि भूतपंचक [ सत्य ] उत्पन्न होतें; पंचमहाभूतांपासून

यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः ॥ तस्मादेतद्ब्रह्म नाम रूपमन्नं च जायते ॥ ९ ॥ इति प्रथममुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

तदेतत्सत्यं मन्त्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि ॥ तान्याचरथ नियतं सत्यकामा.

( भू आदि सात ) लोक उत्पन्न होतात; लोकांपासून कर्म उत्पन्न होतें; आणि कर्मांचे ठिकाणीं कर्मफल [अमृतं] उत्पन्न होतें. ८. जें ( सामान्यतः ) सर्व जाणणारें, ( विशेषतः ) सर्व जाणणारें [ सर्ववित् ], ज्याचें तप ज्ञानमय आहे ( आयासमय नाहीं ), अशा अ-क्षर ब्रह्मापासून ( कार्यलक्षण हिरण्यगर्भरूप ) ब्रह्म उत्पन्न होतें. त्यापासून पुढें रूप, अन्न (इत्यादि) उत्पन्न होतात. इति प्रथममुंडके प्रथमः खंडः ॥ १ ॥

( दोन्ही विद्यांचें सामान्य स्वरूप सांगून आतां विशेष स्वरूप सांगतात— ) ( ऋग्वेदादि ) मंत्रांचे ठिकाणीं ( अग्निहोत्रादि ) जीं कर्में ( वसिष्ठादि ) ऋषींनीं अवलोकन केलीं तीं ( हौत्र, आध्वर्यव आणि औद्गात्र अशा ) तिहींनीं युक्त बहुत

एष वः पन्थाः सुकृतस्य लोके ॥ १ ॥ यदा लेलायते ह्यर्चिः समिद्धे हव्यवाहने ॥ तदाज्यभागावन्तरेणाहुतीः प्रतिपादयेत् ॥ २ ॥ यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च ॥ अहुतमवैश्वदेवमविधिना हुतमासप्तमांस्तस्य लोकान्हिनस्ति ॥ ३ ॥

प्रकारांनीं प्रवृत्त असलेलीं सत्य आहेत [ पुरुषार्थ प्राप्त करून देणारीं आहेत ]. हे कर्मफलेच्छुहो, त्यांचें नित्य आचरण करा. चांगल्या प्रकारें आचरिलेल्या कर्मांचें फल मिळण्याला [ लोके ] हा मार्ग आहे. १. जेव्हां इंधनांनीं सम्यक् पेटलेल्या अग्नीमध्यें ज्वाळा चलन पावत असते तेव्हां आज्यभागांचे मध्यंतरीं आहुति द्याव्या. २. ज्याचें अग्निहोत्र दर्शकर्मवर्जित, पौर्णमासकर्मवर्जित, चातुर्मास्यकर्मवर्जित, आग्रयणकर्मवर्जित, अतिथिपूजनवर्जित, हवनवर्जित, वैश्वदेववर्जित, हवन असेल तर तें अविधिपूर्वक, असें असेल तर तेणेंकरून त्याला सातहि लोक अप्राप्य होतात [ योग्य कर्म केलें असतां सात लोकांची प्राप्ति होते ]. ३. काली,

काली कराली च मनोजवा च सुलोहिता या च सुधूम्रवर्णा ॥ स्फुलिंगिनी विश्वरुची च देवी लेलायमाना इति सप्तजिह्वाः ॥ ४ ॥ एतेषु यश्चरते भ्राजमानेषु यथाकालं चाहुतयो ह्याददायन् ॥ तं नयन्त्येताः सूर्यस्य रश्मयो यत्र देवानां पतिरेकोऽधिवासः ॥ ५ ॥ एह्येहीति तमाहुतयः सुवर्चसः सूर्यस्य रश्मिभिर्यजमानं वहन्ति ॥ प्रियां वाचमभिवदन्त्योऽर्चयन्त्य एष वः पुण्यः सुकृतो

कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी आणि दिव्य विश्वरुची अशा चलन पावणाऱ्या सात अग्नीच्या जिव्हा आहेत. ४. या प्रदीप्त असतां यांचे मध्यें यथाकाल आहुति देऊन जो (अग्निहोत्रादि) कर्म करतो त्याला या सूर्यरश्मिरूप होऊन ज्या ठिकाणीं देवेंद्र एकटा वास करतो त्या ठिकाणीं नेतात. ५ दीप्तियुक्त [ सुवर्चसः ] अशा त्या आहुति ‘ इकडे ये ’ ‘ इकडे ये ’ असें ह्मणतच ( कीं काय ) सूर्याच्या रश्मींचे द्वारें ‘ हा पुण्य ब्रह्मलोक [ स्वर्ग ] तुझ्या कर्मांचें फल होय ’ असें

ब्रह्मलोकः ॥ ६ ॥ प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ॥ एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मूढा जरामृत्युं ते पुनरेवापियन्ति ॥ ७ ॥ अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पण्डितं मन्यमानाः ॥ जंघन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः ॥ ८ ॥ अविद्यायां बहुधा वर्तमाना वयं कृतार्था इत्यभिमन्यन्ति बालाः ॥

प्रिय भाषण उच्चारीत व पूजन करीत यजमानाला (स्वर्गलोकीं) नेतात. ६. (सोळा ऋत्विज्, यजमान आणि पत्नी असें) अठरा जणांचें (ज्ञानरहित ह्मणून) गौण कर्म ज्यामध्यें सांगितलें आहे अशा या यज्ञरूपी नौका अस्थिर आहेत. जे मूढ हेंच श्रेयस्कर आहे असें समजतात ते पुनः पुनः जरा व मृत्यु यांप्रत येतात. ७. अज्ञानामध्यें रहाणारे (परंतु) स्वतःला बुद्धिमान् व विद्वान् असें मानणारे (हे) मूढ (जरारोगादिकांनीं) वारंवार पीडित होत्साते अंध अंधानें वाट दाखविली असतां जसे (व्यर्थ) भ्रमण पावतात त्याप्रमाणें भ्रमण पावतात. ८. अनेक प्रकारांनीं अविद्येमध्यें

यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ॥ ९ ॥ इष्टापूर्तं मन्यमाना वरिष्ठं नान्यच्छ्रेयो वेदयन्ते प्रमूढाः ॥ नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं वा विशन्ति ॥ १० ॥ तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्यां चरन्तः ॥ सूर्यद्वारेण ते विरजाः

रहाणारे अज्ञानी जन आपण कृतार्थ आहोंत असा अभिमान बाळगतात. ( कर्मांचे ठिकाणीं असलेल्या ) प्रीतीमुळें ( आपल्या अधःपाताचें ) कारण कर्मी जन जाणत नाहींत. त्यामुळें ते दुःखी होत्साते कर्मफलाचा क्षय झाला ह्मणजे खालीं पडतात. ९. इष्ट [ यागादि श्रौत ] आणि पूर्त [ वापीतडागादि स्मार्त ] कर्म हेंच अत्यंत श्रेष्ठ आहे असें मानणारे मूढ जन याहून श्रेयस्कर दुसरें कांहीं नाहीं असें समजतात. कर्मांचें फल जें स्वर्गांतील श्रेष्ठ स्थान त्याचा उपभोग घेतल्यानंतर ते या ( मानुष ) लोकीं अथवा याहून हीन अशा ( तिर्यक् इत्यादि ) लोकीं प्रवेश करतात. १०. ( परंतु याच्या उलट ) जे शमयुक्त विद्वान् अरण्यामध्यें

प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥ ११ ॥ परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन ॥ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् ॥ १२ ॥तस्मै स विद्वानुपसन्नाय सम्यक् प्रशान्तचित्ताय शमान्विताय ॥ येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच

भिक्षाचर्य आचरण करून तप [ आश्रमविहित कर्म ] आणि श्रद्धा [ ब्रह्मविद्या ] यांचें सेवन करतात ते कर्मरहित [ विरजाः ] होऊन ज्या ठिकाणीं तो मृत्युरहित व अव्ययस्वभाव ( परम ) पुरुष आहे त्या ( सत्यलोकादिकांचे ) ठिकाणीं सूर्याचे मार्गानें जातात. ११. कर्मापासून प्राप्त होणारे लोक ( नाशवंत आहेत असें ) जाणून ब्राह्मणानें वैराग्ययुक्त व्हावें. कर्मानें नित्य [ अकृतः ] असें ब्रह्म ( प्राप्त होत ) नाहीं. त्याच्या ज्ञानाकरितां त्यानें हातामध्यें समिधा घेऊन श्रुतिसंपन्न व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूकडेच जावें. १२. ( याप्रकारें ) येणाऱ्या शान्तचित्त व शमानें युक्त अशा त्याला तो ज्ञानी ( गुरु ), अ-क्षर व सत्य असा ( परम ) पुरुष

तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम् ॥१३॥ इति प्रथममुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

इति प्रथममुण्डकं समाप्तम् ।

तदेतत्सत्यं यथा सुदीप्तात्पावकाद्विस्फुलिङ्गाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः ॥ तथाक्षराद्विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते तत्र चैवापियन्ति ॥ १ ॥ दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यजः ॥ अप्राणो ह्यमनाः शुभ्रो ह्यक्षरात्परतः

जिच्या योगानें जाणला जातो ती ब्रह्मविद्या योग्य प्रकारें सांगतो. १३. इति प्रथममुंडके द्वितीयः खंडः ॥ २ ॥

**॥ इति प्रथममुंडकम् ॥**

( अपरा विद्या असत्य होय पण ) ही ( परा विद्या ) सत्य आहे. ज्याप्रमाणें चांगल्या पेटलेल्या अग्नीपासून तत्स्वरूप हजारों ठिणग्या उत्पन्न होतात, त्याप्रमाणें हे बाळा, ( त्या ) अ-क्षर ब्रह्मापासून [ पुरुषापासून ] नाना प्रकारचे जीव [ भावाः ] उत्पन्न होतात आणि त्याच्यामध्येंच लय पावतात. १, तो पुरुष दीप्तिमान्, अमूर्त, बाह्यवर्ती तसाच आन्तरवर्ती,

परः ॥ २ ॥ एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेन्द्रियाणि च ॥ खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥ ३ ॥ अग्निर्मूर्धा चक्षुषी चन्द्रसूर्यौ दिशः श्रोत्रे वाग्विवृताश्च वेदाः ॥ वायुः प्राणो हृदयं विश्वमस्य पद्भ्यां पृथिवी ह्येष सर्वभूतान्तरात्मा ॥ ४ ॥ तस्मादग्निः समिधो यस्य सूर्यः सोमात्पर्जन्य ओषधयः पृथिव्याम् ॥ पुमान् रेतः

जन्मरहित, अप्राण [ क्रियारहित ], मनोरहित [ संकल्परहित ], शुद्ध, ( उपाधियुक्त ) दुसऱ्या अक्षराहून श्रेष्ठ ( उपाधि-रहित अ-क्षर ) असा आहे. २. याच्यापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु, तेज, उदक आणि विश्वाला धारण करणारी पृथ्वी हीं उत्पन्न होतात. ३. याचें अग्नि हें मस्तक, चंद्र व सूर्य हे चक्षु, दिशा हें श्रोत्र, प्रसिद्ध वेद ही वाणी, वायु हा प्राण, सर्व विश्व हें हृदय आणि पृथिवी याच्या पायांपासून उत्पन्न झाली. हा भूतांचा अंतरात्मा आहे. ४. त्या पुरुषा-पासून ( द्युलोक हा ) अग्नि उत्पन्न झाला, या अग्नीच्या समिधा सूर्य होय. ( सूर्याचें द्युलोकाग्नीमध्यें हवन केल्यानें चंद्र

सिञ्चति योषितायां बह्वीः प्रजाः पुरुषात्संप्रसूताः ॥ ५ ॥ तस्मादृचः साम यजूंषि दीक्षा यज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च ॥ संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः ॥ ६ ॥ तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि ॥ प्राणापानौ व्रीहियवौ

उत्पन्न झाला ). चंद्राच्या हवनापासून [ चंद्र हा समिधा अर्थात् द्युलोक हाच अग्नि ] पर्जन्य उत्पन्न झाला. (पर्जन्याचें) पृथिवी-( रूपी अग्नी-) चे ठिकाणीं ( हवन केल्यानें ) ओषधी उत्पन्न झाल्या. (ओषधींचें पुरुषरूपी अग्नीमध्यें हवन केल्यानें रेत उत्पन्न झालें).......अशा प्रकारें (त्या परम) पुरुषापासूनच बहुत प्रजा उत्पन्न झाल्या. ५. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, ( मौंजी आदि ) दीक्षा, (अग्निहोत्रादि यूपरहित)यज्ञ, सर्व (यूपसहित) यज्ञ [ क्रतु ], दक्षिणा, संवत्सर [ कर्मांगकाल ], यजमान, आणि जेथें चंद्र पावन करतो व जेथें सूर्य तपन पावतो ते ( कर्म-फलरूपी ) लोक हे त्या ( परम ) पुरुषापासूनच उत्पन्न झाले. ६. त्यापासूनच ( वसु आदि ) नाना प्रकारचे देव, साध्य, मनुष्य,

तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च ॥ ७ ॥ सप्त प्राणाः प्रभवन्ति तस्मात्सप्तार्चिषः समिधः सप्त होमाः ॥ सप्त इमे लोका येषु चरन्ति प्राणा गुहाशया निहिताः सप्त सप्त ॥ ८ ॥ अतः समुद्रा गिरयश्च सर्वेऽस्मात्स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः ॥ अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतै-

पशु, पक्षी, प्राण, अपान, ( हवीकरितां लागणारे ) व्रीहि व यव, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्य आणि विधि हीं सर्व उत्पन्न झालीं. ७. सात प्राण, ( अग्नीच्या ) सात ज्वाळा, समिधा [ विषय ], सात होम, ज्यांमध्यें प्राण वावरतात असे सात लोक [ = इंद्रियें ] आणि हृदयामध्यें ( अथवा शरीरामध्यें ) [ गुहायां ] ( विधात्यानें प्रतिप्राण्याचे ठिकाणीं ) स्थापन केलेले प्राण हीं सर्व त्या ( परम पुरुषा- ) पासूनच उत्पन्न झालीं. ८. सर्व समुद्र आणि पर्वत यापासून उत्पन्न झाले. नाना प्रकारचीं रूपें धारण करणाऱ्या नद्या यापासून प्रवाह पावतात. सर्व ओषधी आणि ज्या ( षड्विध ) रसाच्या योगानें अंतरात्मा [ सूक्ष्म शरीर ] ( स्थूल ) भूतांनीं परिवेष्टित

स्तिष्ठते ह्यन्तरात्मा ॥ ९ ॥ पुरुष एवेदं विश्वं कर्म तपो ब्रह्म परामृतम् ॥ एतद्यो वेद निहितं गुहायां सोऽविद्याग्रन्थिं विकिरतीह सोम्य ॥ १० ॥ इति द्वितीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

आविः संनिहितं गुहाचरं नाम महत्पदमत्रैतत्समर्पितम् ॥ एजत्प्राणन्निमिषच्च यदेतज्जानथ सदसद्वरेण्यं परं विज्ञा-

असें रहातें तो रस हीं सर्व त्या ( परम ) पुरुषापासूनच उत्पन्न झालीं. ९. हें ( सर्व ) विश्व, कर्म, तप, श्रेष्ठ व मृत्यु-रहित असें ब्रह्म ( सर्व परम ) पुरुषच आहे. हें ब्रह्म ( आपल्या ) हृदयामध्यें स्थित आहे असें जो जाणतो तोच हे बाळा, अविद्यारूपी ग्रंथी तोडून टाकण्यास समर्थ होतो. १०. इति द्वितीयमुंडके प्रथमः खंडः ॥ १ ॥

प्रकाशरूप [ आविः ], ( हृदयामध्यें ) सम्यक् स्थित [ संनिहित ], शरीरामध्यें संचार करणारें [ गुहाचरं ] अशी ज्याची प्रसिद्धि आहे; महत्त्वामुळें ( सर्व पदांच्या अर्थांचें म्हणजे ) पदार्थांचें स्थान; ज्यामध्यें चलन पावणारे ( पक्षी

नाघद्वारिष्ठं प्रजानाम् ॥ १ ॥ यदर्चिमद्यदणुभ्योऽणु च यस्मिँल्लोका निहिता लोकिनश्च ॥ तदेतदक्षरं ब्रह्म सप्राणस्तदु वाङ्मनः ॥ तदेतत्सत्यं तदमृतं तद्वेद्धव्यं सोम्य विद्धि ॥ २ ॥ धनुर्गृहीत्वौपनिषदं महास्त्रं शरं

आदि ), प्राणापानादिकांनीं युक्त ( मनुष्य, पशु आदि ), निमेष ( व उन्मेष ) करणारे ( प्राणी ) असें सर्व ( वस्तुजात ) ( ज्याप्रमाणें रथनाभीचे ठिकाणीं अरा त्याप्रमाणें ) स्थित आहेत; सदसत्स्वरूप [ सद्रूप व असद्रूप सर्व वस्तु ज्यानें व्यापलेल्या आहेत ]; वरणीय, लौकिक ज्ञानाच्या पलीकडे असलेलें आणि सर्व वस्तूंमध्यें श्रेष्ठ अशा ब्रह्माचें, हे शिष्यहो, तुह्मी ज्ञान करून घ्या. १. जें दीप्तिमान् आहे, जें सूक्ष्माहून देखील सूक्ष्म आहे, ( भू आदि ) लोक आणि ( त्या ) लोकांतील ( मनुष्यादि ) रहिवासी हे ज्याच्यामध्यें स्थित आहेत तें हें अ–क्षर [ क्षयरहित ] ब्रह्म होय. तेंच प्राण, तेंच वाणी, तेंच मन होय. तें सत्य, अविनाशी आहे. तें ( मनाचें ) लक्ष्य झालें पाहिजे. बाळा, तूं त्याचें ज्ञान करून

ह्युपासानिशितं संधयीत ॥ आयम्य तद्भावगतेन चेतसा लक्ष्यं तदेवाक्षरं सोम्य विद्धि ॥ ३ ॥ प्रणवो धनुः शरो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते ॥ अप्रमत्तेन वेद्धव्यं शरवत्तन्मयो भवेत् ॥ ४ ॥ यस्मिन्द्यौः पृथिवी चान्तरिक्षमोतं मनः सह प्राणैश्च सर्वैः ॥ तमेवैकं जानथ आत्मानमन्या वाचो विमुञ्चथामृतस्यैष सेतुः ॥ ५ ॥ अरा इव

घे. २. महास्त्र जें उपनिषद्रूपी धनुष्य तें घेऊन त्याला सतत ध्यानानें बारीक केलेला [ उपासानिशित ] शर लाव. ब्रह्माचे ठिकाणीं ज्याची भावना गेली आहे अशा चित्तानें तें ओढून, हे बाळा, त्याच अ--क्षर ( ब्रह्मरूपी ) लक्ष्याचें छेदन कर. ३. ओंकार हें धनुष्य, आत्मा हा शर आणि ब्रह्म हें त्याचें लक्ष्य. एकाग्र चित्तानें नेम मारला असतां—ज्याप्रमाणें शर लक्ष्यमय होतो त्याप्रमाणें—( मारणारा ) ब्रह्ममय होतो. ४. स्वर्ग, पृथिवी, अंतरिक्ष, आणि सर्व प्राणांसह [ इंद्रियांसह ] मन हीं ज्याचे ठिकाणीं वेष्टिलीं आहेत तें एक ब्रह्म तुह्मीच आहां असें जाणा. इतर ( अविद्यारूपी ) वाचा सोडून द्या,

रथनाभौ संहता यत्र नाड्यः ॥ स एषोऽन्तश्चरते बहुधा जायमानः ॥ ॐ इत्येवं ध्यायथ आत्मानं स्वस्ति वः पराय तमसः परस्तात् ॥ ६ ॥ यः सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि ॥ दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः ॥ मनोमयः प्राणशरीरनेता प्रतिष्ठितोऽन्ने हृदयं संनिधाय ॥

ह्याच मोक्षप्राप्तीचा सेतु आहे. ५. ज्याप्रमाणें रथनाभीचे ठिकाणीं अरा त्याप्रमाणें ( शरीरांतील ) नाड्या ज्याचे ठिकाणीं एक होतात तो ( क्रुद्ध, हर्षयुक्त इत्यादि ) नाना प्रकारांनीं प्रकट होणारा ( आत्मा ) ( शरीराचे ) मध्यें आहे. त्या आत्म्याचें ओंकाररूपानें ध्यान करा. ( अविद्यारूपी ) तमाच्या पलीकडे जाऊं इच्छिणाऱ्या तुमचें पैलतीरीं सुखानें गमन होवो. ६. जो ( सामान्यतः ) सर्व जाणणारा आहे, जो ( विशेषतः ) सर्व वस्तु जाणणारा आहे, पृथ्वीवर ज्याचा महिमा स्पष्ट दिसत आहे [ सूर्य, चंद्र, पंचमहाभूतें वगैरे आपलीं कामें नियमानें करीत आहेत हा त्याचाच महिमा ], दिव्य अशा ब्रह्मपुरांतील ह्मणजे हृदयपुंडरीकांतील आका

तद्विज्ञानेन परिपश्यन्ति धीरा आनन्दरूपममृतं यद्विभाति ॥ ७ ॥ भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः ॥ क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ८ ॥ हिरण्मये परे कोशे विरजं ब्रह्म निष्कलम् ॥ तच्छुभ्रं ज्योतिषां

शामध्यें हा आत्मा स्थित आहे. मनाचे द्वारें प्रकट होणारा, प्राण व शरीर यांचा नियंता असा हा ( आत्मा ) हृदयाचा आश्रय घेऊन अन्नाचे ठिकाणीं स्थित आहे. आनंदरूपानें आणि अमृतरूपानें जें प्रकाशमान होत आहे असें हें आत्मतत्त्व ज्ञाते ( शमदमादि वैराग्यानें प्राप्त झालेल्या विशिष्ट अनुभवयुक्त ) ज्ञानानें जाणतात. ७. कारणरूप [ पर ] व कार्यरूप [ अवर ] अशा त्या आत्मतत्त्वाचें ज्ञान झालें ह्मणजे ज्ञात्याची ( अविद्यावासनारूप ) हृदयाची ग्रंथि छेदन पावते, सर्व संशयांचा नाश होतो आणि ( जन्ममरणाला कारण अशा सर्व ) कर्मांचा क्षय होतो. ८.ज्योतिर्मय अशा श्रेष्ठ [ आत्मस्वरूपाची उपलब्धि येथें होते ह्मणून श्रेष्ठ ] कोशामध्यें असलेलें मलरहित, अवयव-

ज्योतिस्तद्यदात्मविदो विदुः ॥ ९ ॥ न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ॥ तमेव भान्तमनु भाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ १० ॥ ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण ॥ अधश्चोर्ध्वं च प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥११॥ इति द्वितीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥२॥

॥ इति द्वितीयमुण्डकं समाप्तम् ॥

रहित, शुद्ध प्रकाशरूप पदार्थांचें देखील प्रकाशक असें ब्रह्म, जे आत्म्याला जाणणारे असतात तेच जाणतात. ९. त्या ब्रह्माला सूर्य प्रकाशित करीत नाहीं, चंद्र अथवा तारका प्रकाशित करीत नाहींत, या विजा प्रकाशित करीत नाहींत, मग अग्नि कुठला ? तें स्वतःप्रकाश आहे आणि त्याच्याच अनुरोधानें सर्व (प्रकाशरूप वस्तु ) प्रकाशित होतात. त्याच्याच प्रकाशाचे योगानें हें सर्व ( जगत् ) प्रकाश पावतें. १०. हें मरणरहित ब्रह्मच पुढें, मागें, उजवीकडे, डावीकडे, वर, खालीं सर्वत्र पसरलेलें आहे. हें सर्व विश्व ब्रह्मच होय. हें सर्वांमध्यें अत्यंत श्रेष्ठ आहे. ११. इति द्वितीयमुंडके द्वितीयः खंडः ॥ २ ॥ इति द्वितीयमुंडकम् ॥ २ ॥

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते॥
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति
॥ १ ॥ समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति
मुह्यमानः ॥ जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमान-
मिति वीतशोकः ॥ २ ॥ यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं

सर्वदा एकत्र असणारे व एकमेकांचे मित्र असे दोन पक्षी [ जीव व ईश्वर ] एकाच (शरीररूपी) वृक्षाला चिकटून राहिले आहेत. त्यांपैकीं एक [ जीव ] ( कर्मनिष्पन्न ) ( विचित्र ) स्वादांनीं युक्त असें फल भक्षण करतो व दुसरा कांहीं भक्षण न करितां केवळ पहात असतो. १. (दोघांनाहि) समान असणाऱ्या त्या ( शरीररूपी ) वृक्षाचे ठिकाणीं संलग्न झालेला ( एक ) पुरुष [ जीव ] आपलें स्वामित्व नाहीं अशा कल्पनेनें वेडा होत्साता दुःख करतो. ( अनेक जन्मांनंतर ) जेव्हां, अनेक योगिजनांनीं सेवित, ईश्वर आणि त्याचा महिमा (असा दुसरा पक्षी शिवात्मा )( मीच आहें ) असें प्रत्यक्ष पहातो तेव्हां तो शोकरहित होतो. २. स्वयंज्योतिःस्वभाव, ( जगाचा ) कर्ता,

कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ॥ तदा विद्वान्पुण्यपापे विधूय निरञ्जनः परमं साम्यमुपैति ॥ ३ ॥ प्राणो ह्येष यः सर्वभूतैर्विभाति विजानन्विद्वान्भवते नातिवादी ॥ आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ॥ ४ ॥ सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यग्ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ॥ अन्तःशरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो

स्वामी, आणि ब्रह्म व ब्रह्माचें कारण हीं दोन्ही एकच असलेल्या ( परम ) पुरुषाचें जेव्हां प्रत्यक्ष ज्ञान होतें तेव्हां तो ज्ञाता पुण्य आणि पाप यांचा नाश करून लेपरहित होत्साता ( त्या परब्रह्माबरोबर ) अत्यंत साम्य पावतो. ३. जो सर्व भूतांचे द्वारें प्रकाशित होत आहे तो प्राण ( अथवा ईश्वर ) हाच आहे [ह्म० मीच आहे ] असें जाणणारा विद्वान् फार (व्यर्थ) बोलत नाहीं. आत्म्याचे बरोबर क्रीडा करणारा, आत्म्यावर प्रीति करणारा, ( ज्ञान, वैराग्यादि ) क्रियांनीं युक्त असा तो ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ होय. ४. सत्य, तप, योग्य ज्ञान आणि सतत ब्रह्मचर्य यांचे योगानें हा आत्मा [ ईश्वर ] प्राप्त होतो. ज्योतिर्मय व शुभ्र असा

यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥ ५ ॥ सत्यमेव जयति नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः ॥ येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामा यत्र तत्सत्यस्य परमं निधानम् ॥ ६ ॥ बृहच्च तद्दिव्यमचिन्त्यरूपं सूक्ष्माच्च तत्सूक्ष्मतरं विभाति ॥ दूरात्सुदूरे तदिहान्तिके च पश्यत्स्विहैव निहितं गुहा-

याला ज्यांचे दोष नाश पावले आहेत असे यति आपल्या शरीरामध्येंच स्थित असा पहातात. ५. सत्याचाच जय होतो, असत्याचा नाहीं. देवयान [ देवांकडे जाणारा ] नामक विस्तीर्ण मार्ग सत्यानेंच युक्त आहे. तृष्णारहित [ आप्तकामाः ] ऋषि जो मार्ग आक्रमण करतात व जेथें त्या सत्याचें प्राप्तव्य आहे तो विस्तीर्ण मार्ग सत्यानेंच युक्त आहे. ६. तें ( ब्रह्म ) मोठें व स्वयंप्रभ आहे, त्याच्या स्वरूपाची कल्पना करणें शक्य नाहीं, सूक्ष्माहून देखील सूक्ष्म असून ( सूर्यचंद्रादि नाना प्रकारांनीं ) तें प्रकाशित आहे. दूराहून देखील दूर ठिकाणीं तें आहे, समीप आहे, त्याला पहाणारांना [ योगी, ज्ञानी वगैरेंना ] तें ( बुद्धिरूपी ) गुहेमध्यें स्थित आहे ( असें दिसतें ). ७.

याम् ॥ ७ ॥ न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्त-
पसा कर्मणा वा ॥ ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं
पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥ ८ ॥ एषोऽणुरात्मा चेतसा
वेदितव्यो यस्मिन्प्राणः पञ्चधा संविवेश ॥ प्राणैश्चित्तं
सर्वमोतं प्रजानां यस्मिन्विशुद्धे विभवत्येष आत्मा ॥ ९ ॥
यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्धसत्त्वः कामयते

चक्षूंनीं त्याचें ग्रहण होत नाहीं, वाणीनें होत नाहीं, इतर
इंद्रियांनीं [ देवैः ] होत नाहीं, तप अथवा कर्म यांनीं होत
नाहीं. ज्ञानप्रसादानें जेव्हां अंतःकरण शुद्ध होईल तेव्हां त्या
अवयवरहित ब्रह्माचें ध्यान केलें असतां तें दिसतें. ८. ज्या-
मध्यें प्राण ( प्राणापानादि ) पांच भेदांनीं वास करीत आहे
अशा शरीरामध्यें हा अणुस्वरूप आत्मा अंतःकरणानें जाणला
पाहिजे. जनांचें अंतःकरण ( इंद्रियांसहवर्तमान प्राणांनीं )
व्यापलें आहे. हें अंतःकरण शुद्ध झालें ह्मणजे [ क्लेशादि
मलांनीं रहित झालें ह्मणजे ] हा आत्मा स्वतः प्रकाशमान
होतो. ९. ज्या ज्या ( पितृलोक आदि ) लोकाचा मनानें

यांश्च कामान् ॥ तं तं लोकं जयते तांश्च कामांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद्भूतिकामः ॥ १० ॥ इति तृतीयमुण्डके प्रथमः खण्डः ॥ १ ॥

स वेदैतत्परमं ब्रह्म धाम यत्र विश्वं निहितं भाति शुभ्रम् ॥ उपासते पुरुषं ये ह्यकामास्ते शुक्रमेतदतिवर्तन्ति

संकल्प करतो, विशुद्धान्तःकरण होत्साता ज्या ज्या भोगांची इच्छा करतो, तो तो लोक त्याला प्राप्त होतो आणि ते ते भोग प्राप्त होतात. ह्मणून ( आपली ) उन्नति इच्छिणाऱ्या मनुष्यानें आत्मज्ञानी मनुष्याची पूजा करावी ( व त्यापासून आत्मज्ञान प्राप्त करून घ्यावें ). १०. इति तृतीयमुंडके प्रथमः खंडः ॥ १ ॥

( कारण ) अत्यंत श्रेष्ठ असें स्थान, ज्याच्यामध्यें ( सर्व ) विश्व अर्पित आहे, आणि जें ( अत्यंत ) स्वच्छ प्रकाशानें युक्त आहे असें ब्रह्म ते ( आत्मज्ञानी मनुष्य ) जाणतात. जे तृष्णारहित होत्साते अशा ( आत्मज्ञानी ) पुरुषाची सेवा करतात ते बुद्धिमान् ( जन्ममरणाला कारण अशा ) या

धीराः ॥ १ ॥ कामान्यः कामयते मन्यमानः स काम-
भिर्जायते तत्र तत्र ॥ पर्याप्तकामस्य कृतात्मनस्तु इहैव
सर्वे प्रविलीयन्ति कामाः ॥ २ ॥ नायमात्मा प्रवचनेन
लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन ॥ यमेवैष वृणुते तेन
लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥३ ॥ नायमात्मा

शुक्राच्या पलीकडे जातात. १. कामांचें चिन्तन करीत जो ते (प्राप्त होण्याची) इच्छा करतो तो त्या त्या कामांचे योगानें त्या त्या (कामप्राप्तीला निमित्त अशा) ठिकाणीं जन्म पावतो. परंतु ज्याचे सर्व काम (आत्मप्राप्तिकामामुळें) गेलेले आहेत व ज्याचें चित्त आत्म्याकडे लागलें आहे अशा मनुष्याचे सर्व काम या जन्मींच [ इहैव ] नाश पावतात. २. हा आत्मा (वेदशास्त्रादिकांच्या) अध्ययनानें प्राप्त होत नाहीं, धारणाशक्तीनें प्राप्त होत नाहीं, बहुत श्रवणानें प्राप्त होत नाहीं. (तर) ज्या आत्म्याची प्राप्ति होण्याची हा (साधक) इच्छा करतो त्या प्राप्तीच्या इच्छेनेंच हा प्राप्त होतो. (कारण) अशा मनुष्याला हा आत्मा आपलें स्वरूप प्रकट

बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाप्यलिङ्गात् ॥ एतै-रुपायैर्यतते यस्तु विद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्म धाम ॥ ४ ॥ संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीत-रागाः प्रशान्ताः ॥ ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्ता-त्मानः सर्वमेवाविशन्ति ॥ ५ ॥ वेदान्तविज्ञानसुनिश्चि-

करतें. ३. ( आत्मनिष्ठारूपी ) बल ज्याचे जवळ नाहीं, ( लौकिक विषयासक्तिरूप ) प्रमादानें जो युक्त आहे ( अथवा ) संन्यासयुक्त [ अलिंगात् ] ज्ञानानें ( अथवा तपानें ) जो युक्त नाहीं त्याला हा आत्मा प्राप्त होत नाहीं. जो विद्वान् ( बल, अप्रमाद आणि संन्यासयुक्त ज्ञान ) या उपायांनीं प्रयत्न करतो त्याचा आत्मा ब्रह्मस्थान पावतो. ४. याची प्राप्ति झालेले ऋषि त्या ज्ञानानें तृप्त होतात, परमात्मरूप होतात, विषयप्रीतिरहित होतात आणि इंद्रियतृप्तीपासून निवृत्त होतात. ते बुद्धिमान् व नित्यसमाधानस्वभावी [ युक्तात्मानः ] सर्वव्यापी ब्रह्म सर्वत्र प्राप्त होत्साते ( शरीरपातकालीं ) सर्वांमध्यें प्रवेश करतात [ मायोपाधीच्या मर्यादा टाकतात ] ( आणि अशा रीतीनें

तार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः ॥ ते ब्रह्मलोकेषु परान्तकाले परामृताः परिमुच्यन्ति सर्वे ॥ ६ ॥ गताः कलाः पञ्चदश प्रतिष्ठा देवाश्च सर्वे प्रतिदेवतासु ॥ कर्माणि विज्ञानमयश्च आत्मा परेऽव्यये सर्वे एकीभवन्ति ॥ ७ ॥ यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय ॥ तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं

ब्रह्मस्थान पावतात ). ५. वेदान्ताच्या योगानें उत्पन्न झालेल्या विज्ञानानें ज्यांनीं ( प्रासव्य ) अर्थ [ परमात्मा ] सुनिश्चित केलेला आहे, संन्यासयोगामुळें जे यमनयुक्त व शुद्ध अन्तःकरणयुक्त झाले आहेत ते सर्व देहपरित्यागकालीं ब्रह्माचे ठिकाणीं ब्रह्मस्वरूप होत्साते [ परामृताः परं अमृतं ब्रह्म येषां ते ] सर्वांपासून मुक्त होतात. ६. ( मोक्षकालीं ) पंधरा कला आपापल्या कारणाप्रत जातात. ( चक्षु आदि ) सर्व इंद्रियें आपापल्या देवतेप्रत जातात. कर्मे व विज्ञानमय आत्मा हीं सर्व अत्यंत श्रेष्ठ व व्ययरहित अशा ब्रह्माचे ठिकाणीं एकरूप होतात. ७. ज्याप्रमाणें वहाणाऱ्या नद्या ( आपलें ) नांव व

पुरुषमुपैति दिव्यम् ॥ ८ ॥ स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति ॥ तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रन्थिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति ॥ ९ ॥ तदेतदृचाऽभ्युक्तम् । क्रियावन्तः श्रोत्रिया ब्रह्मनिष्ठाः स्वयं जुह्वत एकर्षिं श्रद्धयन्तः । तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत

स्वरूप टाकून देऊन समुद्रामध्यें लय पावतात त्याप्रमाणें विद्वान् मनुष्य नांव व रूप यांपासून मुक्त होऊन श्रेष्ठाहून देखील श्रेष्ठ अशा दिव्य ( परम ) पुरुषाप्रत जातो. ८. हें परम ब्रह्म जो कोणी जाणतो तो ( प्रत्यक्ष ) ब्रह्मच होतो. त्याच्या कुळामध्यें ब्रह्म न जाणणारा कोणी होत नाहीं. तो शोकाच्या पलीकडे जातो, पापाच्या पलीकडे जातो, हृदयस्थ अविद्यारूपी ग्रंथींतून मुक्त होऊन मृत्युरहित होतो. ९. ह्या ( विद्यासंप्रदानविधि ) पुढील मंत्रानें स्पष्ट करतात— जे योग्य कर्मांचें अनुष्ठान करणारे श्रौतसंपन्न विद्वान् ( अपर ) ब्रह्माचे ठिकाणीं निष्ठा असलेले श्रद्धापूर्वक स्वतः एकर्षिनामक अग्नीचें हवन करतात आणि ज्यांनीं

शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णम् ॥ १० ॥ तदेतत्सत्यमृषिरङ्गिराः पुरोवाच नैतदचीर्णव्रतोऽधीते ॥ नमः परमऋषिभ्यो नमः परमऋषिभ्यः ॥ ११ ॥ इति तृतीयमुण्डके द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ॥ भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाꣳसस्तनूभिः ॥ व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः ॥ स्वस्ति नः

( अथर्व वेदामध्यें सांगितलेलें ) शिरोव्रत विधिपूर्वक पाळलें असेल त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी. १०. तें हें ( परम) पुरुषाचें यथार्थ ज्ञान पूर्वी अंगिरा मुनींनीं सांगितलें. ज्यानें व्रत आचरण केलें नसेल तो याचें अध्ययन करूं शकत नाहीं [ ह्मणजे त्याला हें ज्ञान प्राप्त होत नाहीं ]. ( ही ब्रह्मविद्या परंपरेनें प्राप्त करून देणाऱ्या) थोर ऋषींना (आदरपूर्वक ) नमस्कार असो. इति तृतीयमुंडके द्वितीयः खंडः २

इति तृतीयमुंडकम् ॥ ३ ॥

॥ इति मुण्डकोपनिषत्समाप्ता ॥

पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः ॥ स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति मुण्डकोपनिषत्समाप्ता ॥ ५ ॥

॥ ॐतत्सत् ॥

---

## माण्डूक्योपनिषत् ॥ ६ ॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ॥ भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तष्टुवाꣳसस्तनूभिः ॥ व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः ॥ स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः ॥ स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

ओमित्येतदक्षरमिदꣳ सर्वं तस्योपव्याख्यानंभूतं भवद्भविष्यदिति सर्वमोङ्कार एव ॥ यच्चान्यत्त्रिकालातीतं तद-

**मांडूक्योपनिषत् ॥ ६ ॥**

हें सर्व ( विश्व ) ओंकार आहे, ओंकाराचें उपव्याख्यान होय. भूत, वर्तमान आणि भविष्य सर्व ओंकारच होय. त्रिकालातीत जें कांहीं इतर असेल तेंहि ओंकारच होय. १.

प्योङ्कार एव ॥ १ ॥ सर्वं ह्येतद्ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पात् ॥ २ ॥ जागरितस्थानो बहिष्प्रज्ञः सप्ताङ्ग एकोनविंशतिमुखः स्थूलभुग्वैश्वानरः प्रथमः पादः ॥ ३ ॥ स्वप्नस्थानोऽन्तःप्रज्ञः सप्ताङ्ग एकोनविंशतिमुखः प्रविविक्तभुक् तैजसो द्वितीयः पादः ॥ ४ ॥ यत्र सुप्तो न

हें सर्व ब्रह्म आहे. हा आत्मा ब्रह्म आहे, हा ( विश्व, तैजस, प्राज्ञ आणि तुरीय अशा ) चार प्रकारचा आत्मा. २. जागृति हें ज्याचें स्थान आहे, स्वतःहून इतर पदार्थ ज्याच्या ज्ञानाचे विषय आहेत, ( द्युलोक हें शिर, अग्नि हें मुख, सूर्य हा चक्षु, वायु हा प्राण, आकाश हा देहाचा मध्यभाग, उदक हें मूत्रस्थान आणि पृथिवी हें गुद असे ) सात ज्याचे अवयव आहेत, ( पांच ज्ञानेन्द्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण आणि मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं ) एकोणीस ज्याचीं मुखें आहेत, असा स्थूल विषयांचा भोक्ता वैश्वानर [ सर्वपिंडात्मा ] हा प्रथम प्रकार. ३. स्वप्न हें ज्याचें स्थान, अंतर्विषय ज्याच्या ज्ञानाचा विषय, सात अवयव, एकोणीस मुखें, विषय-

कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति तत्सुषुप्तम् ॥ सुषुप्तस्थान एकीभूतः प्रज्ञानघन एवानन्दमयो ह्यानन्दभुक् चेतोमुखः प्राज्ञस्तृतीयः पादः ॥ ५ ॥ एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ एषोऽन्तर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभावाप्ययौ हि भूतानाम् ॥ ६ ॥ नान्तःप्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतःप्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम् ॥ अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमल-

स्पर्शरहित केवळ वासना हा ज्याचा भोग आहे असा तेजोरूप दुसरा प्रकार. ४. निद्रा प्राप्त झाल्यामुळें जेव्हां कोणतीहि इच्छा होत नाहीं, कोणतेंहि स्वप्न दिसत नाहीं त्याला सुषुप्ति म्हणतात. सुषुप्तिस्थानाचे ठिकाणीं एकत्र झालेला, प्रज्ञानपूर्ण व आनंदपूर्ण, आनंदाचा भोक्ता, चैतन्य हें ज्याचें मुख असा प्राज्ञ हा तिसरा प्रकार. ५. हाच सर्वांचा ईश्वर, सर्वांचा ज्ञाता, हा ( सर्वांचा ) अंतर्यामी, हा सर्वांचें उत्पत्तिकारण, भूतांची उत्पत्ति व विनाश हाच होय. ६. अंतःप्रज्ञ नव्हे, बहिष्प्रज्ञ नव्हे, उभयप्रज्ञ नव्हे, प्रज्ञानपूर्ण नव्हे, प्रज्ञ नव्हे, अप्रज्ञ नव्हे. अदृष्ट, अव्यवहार्य, अग्राह्य, अलक्षण, अचिंत्य, अव्यपदेश्य,

क्षणमचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपञ्चोपशमं शान्तं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥ ७ ॥ सोऽयमात्माऽध्यक्षरमोङ्कारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥ ८ ॥ जागरितस्थानो वैश्वानरोऽकारः प्रथमा मात्राऽऽप्तेरादिमत्त्वाद्वाप्नोति ह वै

एकात्मप्रत्यय हेंच ज्याचें सार आहे, प्रपंचविरहित, शान्त, कल्याणरूप आणि द्वैतरहित असा चवथा प्रकार होय. या आत्म्याचें ज्ञान करून घेणें योग्य आहे. ७. तो हा आत्मा अक्षराचे योगानें वर्णन करतात. तें अक्षर ॐकार होय. हा मात्रांनीं युक्त असा आहे. आत्म्याचे पाद ते ॐकाराच्या मात्रा होत व ॐकाराच्या मात्रा ते आत्म्याचे पाद होत. त्या मात्रा ह्मणजे अकार, उकार, मकार या होत. ८. जागृति हें ज्याचें स्थान आहे असा वैश्वानररूपी हा ॐकारांतील अकार होय. ही पहिली मात्रा होय. आप्ति ह्मणजे सर्व व्यापणारी, अथवा आदिमत्व ह्मणजे प्रथमत्व, अथवा आप्नोति ह्मणजे सर्व इच्छा प्राप्त करून घेणें असा या

सर्वान्कामानादिश्च भवति य एवं वेद ॥ ९ ॥ स्वप्नस्थान-स्तैजस उकारो द्वितीया मात्रोत्कर्षादुभयत्वाद्वोत्कर्षति ह वै ज्ञानसंततिं समानश्च भवति नास्याब्रह्मवित्कुले भवति य एवं वेद ॥१०॥ सुषुप्तस्थानः प्राज्ञो मकारस्तृतीया मात्रा मिते-रपीतेर्वा मिनोति ह वा इदं सर्वमपीतिश्च भवति य एवं वेद ॥ ११ ॥ अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपंचोपशमः

मात्रेचा अर्थ होय. जो हें जाणतो तो श्रेष्ठ होतो. ९. स्वप्न हें ज्याचें स्थान आहे असा तेजोरूपी हा उकार होय. ही दुसरी मात्रा. उत्+कृष् म्हणजे ज्ञानधारा वृद्धिंगत करणें होय. जो हें जाणतो तो ( शत्रुमित्रांचे ठिकाणीं ) समान होतो, त्याच्या कुळामध्यें ब्रह्माविषयीं अज्ञानी कोणी होत नाहीं. १०. सुषुप्ति हें ज्याचें स्थान आहे असा प्राज्ञरूपी मकार होय. ही तिसरी मात्रा. सर्वांचें मान करतो अथवा एकरूप होतो असा अर्थ होय. हें जो जाणतो तो एकरूप होतो. ११. मात्रारहित तो चवथा प्रकार. हा अव्यवहार्य, प्रपंचापासून निवृत्त, कल्याण-रूप, अद्वैतरूप होय. या प्रकारें ॐकार हा आत्मा होय. हें

शिवोऽद्वैत एवमोङ्कार आत्मैव संविशत्यात्मनात्मानं एवं[2] य[1] वेद य एवं वेद ॥ १२ ॥

॥ इति माण्डूक्योपनिषत् संपूर्णा ॥

ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः ॥ भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ॥ स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिः ॥ व्यशेम देवहितं यदायुः ॥ स्वस्ति न इंद्रो वृद्धश्रवाः ॥ स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥ स्वस्ति नस्ताक्ष्यों अरिष्टनेमिः ॥ स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

इति माण्डूक्योपनिषत्समाप्ता ॥ ६ ॥

ॐ तत्सत् ॥

---

जो जाणतो त्याचा आत्मा आत्म्यामध्यें प्रवेश करतो [ अद्वैतरूप होतो ]. १२.

**इति अथर्ववेदीया मांडूक्योपनिषत्समाप्ता ॥**

## तैत्तिरीयोपनिषत् ॥ ७ ॥

### ॥ शीक्षोपनिषत् ॥

ॐ शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इंद्रो बृहस्पतिः ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वदिष्यामि ॥ सत्यं वदिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥ अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

## तैत्तिरीयोपनिषत्.

### शीक्षाध्याय.

मित्र व वरुण आह्मांला कल्याणकारक होवोत. सूर्य आह्मांला कल्याणकारक होवो. इंद्र, बृहस्पति आह्मांला कल्याणकारक होवोत. विस्तीर्णगति विष्णु आह्मांला कल्याणकारक होवो. ब्रह्माला नमस्कार असो. हे वायु, तुला नमस्कार असो. तूंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. तुलाच मी प्रत्यक्ष असें ब्रह्म ह्मणतों. मी यथाशास्त्र भाषण करीन, मी सत्य भाषण करीन. तें ( ब्रह्म )

ॐ शं नो मित्रः शं वरुणः ॥ शं नो भवत्वर्यमा ॥ शं न इन्द्रो बृहस्पति ॥ शं नो विष्णुरुरुक्रमः ॥ नमो ब्रह्मणे ॥ नमस्ते वायो ॥ त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि ॥ त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ ऋतं वादिष्यामि ॥ सत्यं वादिष्यामि ॥ तन्मामवतु ॥ तद्वक्तारमवतु ॥ अवतु माम् ॥

माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो, माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो. ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

मित्र आणि वरुण आह्मांला कल्याणकारक होवोत. सूर्य आह्मांला कल्याणकारक होवो. इंद्र व बृहस्पति आह्मांला कल्याणकारक होवोत. विस्तीर्णगति विष्णु आह्मांला कल्याण कारक होवो. ब्रह्माला नमस्कार असो. हे वायु, तुला नमस्कार असो. तूंच प्रत्यक्ष ब्रह्म आहेस. तुलाच मी प्रत्यक्ष असें ब्रह्म ह्मणतों. मी यथाशास्त्र भाषण करीन. मी सत्य भाषण करीन. तें ( वायुरूपी ) ब्रह्म माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो, माझें रक्षण करो, वक्त्याचें रक्षण करो. इति प्रथमोऽनुवाकः

अवतु वक्तारम् ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ १ ॥
इति प्रथमोऽनुवाकः ॥ १ ॥

ॐ शीक्षां व्याख्यास्यामः ॥ वर्णः स्वरः ॥ मात्रा बलम् ॥ साम संतानः ॥ इत्युक्तः शीक्षाध्यायः ॥ १ ॥
इति द्वितीयोऽनुवाकः ॥ २ ॥

सह नौ यशः ॥ सह नौ ब्रह्मवर्चसम् ॥ अथातः सꣳहिताया उपनिषदं व्याख्यास्यामः ॥ पञ्चस्वधिकरणेषु

आतां शिक्षेची व्याख्या सांगतों [ जिच्या योगानें वर्णादिकांचा उच्चार करतां येतो ती शिक्षा ]. वर्ण [ अकारादि ], स्वर [ उदात्त आदि ], मात्रा [ ह्रस्व आदि ], बल [ प्रयत्नविशेष ], साम [ उच्चाराची समता ] आणि संतान [संहिता]. ( यांचें अध्ययन करावयाचें ). याप्रमाणें शीक्षाध्याय सांगितला. इति द्वितीयोऽनुवाकः

आह्मां दोघांना समान यश प्राप्त होवो. आमचें ब्रह्मचर्यतेज समान असो. आतां आह्मी संहिताविषय [ संहिता=वर्णांचा समुच्चय, हा ज्याचा विषय आहे तें ] उपनिषत् सांगतों. तें

अधिलोकमधिज्यौतिषमधिविद्यमधिप्रजमध्यात्मम् ॥ ता महासꣳहिता इत्याचक्षते ॥ अथाधिलोकम् ॥ पृथिवी पूर्वरूपम् ॥ द्यौरुत्तररूपम् ॥ आकाशः संधिः ॥ १ ॥ वायुः संधानम् ॥ इत्यधिलोकम् ॥ अथाधिज्यौतिषम् ॥ अग्निः पूर्वरूपम् ॥ आदित्य उत्तररूपम् ॥ आपः संधिः ॥ वैद्युतः संधानम् ॥ इत्याधिज्यौतिषम् ॥ अथाधिविद्यम् ॥ आचार्यः पूर्वरूपम् ॥ २ ॥ अन्तेवास्युत्तररूपम् विद्या

पांच विषयांनीं सांगतों. लोकांसंबंधानें, ज्योतिषांसंबंधानें, विद्येसंबंधानें, प्रजेसंबंधानें आणि आत्म्यासंबंधानें. असे उपनिषदांचे पांच विषय आहेत. यांना महासंहिता असें ह्मणतात. आतां अधिलोकाची व्याख्या सांगतों. पृथिवी ही पूर्वरूप, अंतरिक्षलोक हा उत्तररूप, आकाश हा संधि [ मध्य ]. १. वायु हा संधान [ जोडणारा ]. याप्रमाणें अधिलोक झाला. आतां अधिज्यौतिष सांगतों. अग्नि हा पूर्वरूप, आदित्य हा उत्तररूप, उदक हें संधि, विद्युत् ही संधान. याप्रमाणें अधिज्यौतिष झाला. आतां अधिविद्य आचार्य हा पूर्वरूप, २. शिष्य हा

संधिः ॥ प्रवचनꣳ संधानम् ॥ इत्यधिविद्यम् ॥ अथाधिप्रजम् ॥ माता पूर्वरूपम् ॥ पितोत्तररूपम् ॥ प्रजा संधिः ॥ प्रजननꣳ संधानम् ॥ इत्यधिप्रजम् ॥ ३ ॥ अथाध्यात्मम् ॥ अधरा हनुः पूर्वरूपम् ॥ उत्तरा हनुरुत्तररूपम् ॥ वाक् संधिः ॥ जिह्वा संधानम् ॥ इत्यध्यात्मम् ॥ इतीमा महासꣳहिताः ॥ य एवमेता महासꣳहिता व्याख्याता वेद संधीयते प्रजया पशुभिः ॥ ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन सुवर्ग्येण लोकेन ॥ ४ ॥ ( संधिराचार्यः पूर्वरूपमित्याधिप्रजं लोकेन )
॥ इति तृतीयोऽनुवाकः ॥ ३ ॥

उत्तररूप, विद्या ही संधि, प्रवचन हें संधान. याप्रमाणें अधिविद्य झाला. आतां अधिप्रज–माता ही पूर्वरूप, पिता हा उत्तररूप, प्रजा ही संधी, प्रजनन हें संधान. याप्रमाणें अधिप्रज झाला. ३. आतां अध्यात्म–खालची हनुवटी ही पूर्वरूप, वरची हनुवटी ही उत्तररूप, वाणी ही संधी, जिह्वा ही संधान. याप्रमाणें अध्यात्म झाला. याप्रमाणें या महासंहिता होत. जो या महासंहिता या प्रकारें जाणतो तो प्रजा, पशु,

यश्छन्दसामृषभो विश्वरूपः ॥ छन्दोभ्योऽध्यमृतात्संब-भूव ॥ स मेन्द्रो मेधया स्पृणोतु ॥ अमृतस्य देव धारणो भूयासम् ॥ शरीरं मे विचर्षणम् ॥ जिह्वा मे मधुमत्तमा॥ कर्णाभ्यां भूरि विश्रुवम् ॥ ब्रह्मणः कोशोऽसि मेधया पिहितः ॥ श्रुतं मे गोपाय ॥ आवहन्ती वितन्वाना ॥ १ ॥

ब्रह्मतेज, अन्नादि, ( कर्मांचें फल असा ) स्वर्ग लोक यांनी युक्त होतो. ४. इति तृतीयोऽनुवाकः

जो वेदांमध्यें प्रधान आहे, जो सर्वरूप आहे, जो वेदो-रूपी अमृतापासून उत्पन्न झाला, असा (ओंकाररूपी) इंद्र मला ज्ञानानें समृद्ध करो. हे देवा, मला अमृताचा [ अर्थात् अमृतसाधक ब्रह्मज्ञानाचा ] धारणकर्ता होऊं दे. माझें शरीर योग्य होऊं दे. माझी जिह्वा अत्यंत मधुरभाषणी होऊं दे. कर्णांनीं मला पुष्कळ श्रवण करूं दे. तूं परमात्म्याचा कोश लौकिकज्ञानानें आच्छादित आहेस [ = लौकिक ज्ञानाला समजत नाहींस ]. माझें श्रवण ( वगैरे आत्मज्ञान ) रक्षण कर. [ श्रीची इच्छा करणारानें ह्मणण्याचे मंत्र— ] आणणारी,

कुर्वाणा चीरमात्मनः ॥ वासांसि मम गावश्च ॥ अन्नपाने च सर्वदा ॥ ततो मे श्रियमावह ॥ लोमशां पशुभिः सह स्वाहा ॥ आ मा यन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ वि मायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ प्र मायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ दमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ २ ॥ यशो जनेऽसानि स्वाहा ॥ श्रेयान् वस्यसोऽसानि स्वाहा ॥ तं त्वा भग प्रविशानि स्वाहा ॥ स मा भग प्रविश स्वाहा ॥ तस्मिन्सहस्रशाखे ॥ नि भगाहं

विस्तार करणारी व अनेक कालपर्यंत माझीं वस्त्रें, माझ्या गाई यांचें रक्षण करणारी, सर्वकाल अन्न व पाणी देणारी, अजा व इतर पशु देणारी अशी श्री मला प्राप्त करून दे. [ स्वाहा. आहुति ]. माझ्याकडे ब्रह्मचारी [ शिष्य ] येवोत [ त्रिवार ]. ते शिष्य दमानें युक्त होवोत. शमानें युक्त होवोत. १. २. जनांमध्यें मी यशस्वी व्हावें, मी श्रेयस्कर व्हावें, द्रव्यानें युक्त व्हावें. हे सुभगा ( ओंकारा ), मी तुजमध्यें प्रवेश करावा, सहस्रावयवयुक्त अशा तुजमध्यें प्रवेश करून

त्वयि मृजे स्वाहा ॥ यथापः प्रवतायन्ति ॥ यथा मासा अहर्जरम् ॥ एवं मां ब्रह्मचारिणः ॥ धातरायन्तु सर्वतः स्वाहा ॥ प्रतिवेशोऽसि प्र मा भाहि प्र मा पद्यस्व ॥३॥ ( वितन्वाना शमायन्तु ब्रह्मचारिणः स्वाहा ॥ धातरायन्तु सर्वतः स्वाहैकं च ) इति चतुर्थोऽनुवाकः ॥ ४ ॥

भूर्भुवः सुवरिति वा एतास्तिस्रो व्याहृतयः । तासामु ह स्मैतां चतुर्थीम् ॥ माहाचमस्यः प्रवेदयते ॥ मह

मी तुला शोधीन. ज्याप्रमाणें उदक निम्नग प्रदेशाच्या अनुरोधानें जातें, ज्याप्रमाणें महिने संवत्सराच्या अनुरोधानें जातात, तसे शिष्य, हे सर्वविधात्या, माझ्या अनुरोधानें येवोत. तूं श्रमपरिहाराचें स्थान आहेस. मला आपलें स्वरूप प्रकट कर. मजप्रत ये [ तूं व मी एकरूप व्हावें ]. ३.
इति चतुर्थोऽनुवाकः

( याप्रमाणें मेधा, श्री आदि इच्छिणाराकरितां मंत्र सांगितले. आतां व्याहृतिरूप ब्रह्माची अंतरुपासना सांगतात--) भूः, भुवः आणि सुवः अशा तीन प्रकारच्या व्याहृति आहेत,

इति ॥ तद्ब्रह्म॥ स आत्मा ॥ अङ्गान्यन्या देवताः ॥ भूरिति वा अयं लोकः ॥ भुव इत्यंतरिक्षम् ॥ सुवरित्यसौ लोकः ॥ १ ॥ मह इत्यादित्यः ॥ आदित्येन वाव सर्वे लोका महीयन्ते ॥ भूरिति वा अग्निः ॥ भुव इति वायुः ॥ सुवरित्यादित्यः ॥ मह इति चन्द्रमाः ॥ चन्द्रमसा वाव सर्वाणि ज्योतीꣳषि महीयन्ते ॥ भूरिति वा ऋचः ॥ भुव इति सामानि ॥ सुवरिति यजूꣳषि ॥ २ ॥ मह इति

त्यांची चवथी व्याहृति महः ही आहे. ही महाचमस ऋषीचा पुत्र [ माहाचमस्य ] यानें सांगितली. हेंच ब्रह्म होय. हाच आत्मा होय. इतर ( आदित्यादि ) देवता हीं अंगें. भूः ह्मणजे हा लोक. भुवः ह्मणजे अंतरिक्ष लोक. सुवः ह्मणजे तो ( स्वर्ग ) लोक. १. महः ह्मणजे आदित्य [ सूर्यमंडलरूपी जगाचा प्राण ]. आदित्याचे योगानें सर्व लोक वृद्धि पावतात. भूः ह्मणजे अग्नि. भुवः ह्मणजे वायु. सुवः ह्मणजे आदित्य. महः ह्मणजे चंद्रमा. चंद्राचे योगानें सर्व ज्योतिर्मय पदार्थांची [ नक्षत्रें इत्यादि ] वृद्धि होते. भूः ह्मणजे ऋचा. भुवः

ब्रह्म ॥ ब्रह्मणा वाव सर्वे वेदा महीयन्ते ॥ भूरिति वै प्राणः ॥ भुव इत्यपानः ॥ सुवरिति व्यानः ॥ मह इत्यन्नम् ॥ अन्नेन वाव सर्वे प्राणा महीयन्ते ॥ ता वा एताश्चतस्रश्चतुर्धा ॥ चतस्रश्चतस्रो व्याहृतयः ॥ ता यो वेद ॥ स वेद ब्रह्म ॥ सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति ॥ ३ ॥ ( असौ लोको यजूꣳषि वेद द्वे च ) ॥ इति पञ्चमोऽनुवाकः ॥ ५ ॥

स य एषोऽन्तर्हृदय आकाशः ॥ तस्मिन्नयं पुरुषो

ह्मणजे साम. सुवः ह्मणजे यजुर्मंत्र. २. महः ह्मणजे ब्रह्म, ब्रह्माचे योगानें सर्व वेद महत्त्व पावतात. भूः ह्मणजे प्राण, भुवः ह्मणजे अपान. सुवः ह्मणजे व्यान. महः ह्मणजे अन्न. अन्नाचे योगानें सर्व प्राणांची वृद्धि होते. याप्रमाणें या चार व्याहृतींचे चार प्रकार आहेत. यांचें ज्याला ज्ञान होतें त्याला ब्रह्माचें ज्ञान होतें. त्याला सर्व देव बलि [ फल ] आणतात. ३. इति पंचमोऽनुवाकः

हृदयाचे अंतर्भागीं जें आकाश [ जागा ] आहे त्यामध्यें

मनोमयः ॥ अमृतो हिरण्मयः ॥ अन्तरेण तालुके ॥ य एष स्तन इवावलम्बते ॥ सेंद्रयोनिः ॥ यत्रासौ केशान्तो विवर्तते ॥ व्यपोह्य शीर्षकपाले ॥ भूरित्यग्नौ प्रतितिष्ठति ॥ भुव इति वायौ ॥ १ ॥ सुवरित्यादित्ये ॥ मह इति ब्रह्मणि ॥ आप्नोति स्वाराज्यम् ॥ आप्नोति मनसस्पतिम् ॥

हा मनोमय पुरुष [ = ब्रह्म. भू आदि लोकांना व्यापून रहाणारा तो पुरुष ] आहे. तो मृत्युरहित आहे, प्रकाशस्वरूप आहे. ताल्वूंच्या मध्यें [ मुखाचे आंत जिभेच्या मुळाचे वर असलेले भाग यांना तालुका ह्मणतात ] स्तनांच्या आधारानें आहे. तेंच ब्रह्माचें [ इंद्र ] ज्ञान होण्याचें द्वार होय. ( हें द्वार ) ज्या ठिकाणीं केसांचा अंत होतो [ ह्मणजे डोक्यापर्यंत ] व मस्तकाच्या कपालांचे दोन भाग होतात तेथपर्यंत हें पसरलेलें आहे. ज्ञानी मनुष्य त्या द्वारानें निघून, भूव्याहृतिरूप अग्नीचें स्वरूप पावतो. भुवव्याहृतिरूप वायूचें स्वरूप पावतो. १. सुवव्याहृतिरूप आदित्याचें स्वरूप पावतो. महव्याहृतिरूप ब्रह्माचें स्वरूप पावतो. ( त्यांमध्यें आत्मरूपानें स्थित

वाक्पतिश्चक्षुष्पतिः ॥ श्रोत्रपतिर्विज्ञानपतिः ॥ एतत्ततो भवति ॥ आकाशशरीरं ब्रह्म ॥ सत्यात्म प्राणारामं मन आनन्दम् ॥ शान्तिसमृद्धममृतम् ॥ इति प्राचीनयोग्योपास्स्व ॥ २ ॥ ( वायावमृतमेकं च ) ॥ इति षष्ठोऽनुवाकः ॥ ६ ॥

पृथिव्यन्तरिक्षं द्यौर्दिशोऽवान्तरदिशाः ॥ अग्निर्वायुरादित्यश्चन्द्रमा नक्षत्राणि ॥ आप ओषधयो वनस्पतय

होतधाता ) आधिपत्य मिळवितो. मनाचें स्वामित्व मिळवितो. वाणी, चक्षु, श्रोत्र व विज्ञान या सर्वांचा स्वामी होतो. नंतर एतद्रूप [ ब्रह्मरूप ] होतो. आकाशरूप [=सूक्ष्म ], सत्यस्वरूप, प्राणाचे ठिकाणीं रममाण होणारें, शान्तीनें पूर्ण, मृत्युरहित अशा त्या ब्रह्माची, हे पुरातन ऋषींची योग्यता इच्छिणाऱ्या शिष्या, उपासना कर. २. इति षष्ठोऽनुवाकः

( ब्रह्माची पृथिव्यादि यज्ञस्वरूपानें उपासना सांगतात— ) पृथिवी, अंतरिक्ष, द्यौ, दिशा आणि अवान्तर दिशा ( हें लोकपांक्तस्वरूप ) [ पांक्त=यज्ञ ]. अग्नि, वायु, आदित्य, चंद्र,

आकाश आत्मा ॥ इत्यधिभूतम् ॥ अथाध्यात्मम् ॥ प्राणो व्यानोऽपान उदानः समानः ॥ चक्षुः श्रोत्रं मनो वाक् त्वक् ॥ चर्म मा॰ँस॰ँ स्नावास्थि मज्जा ॥ एतदधि-विधाय ऋषिरवोचत् ॥ पाङ्क्तं वा इद॰ँ सर्वम् ॥ पाङ्क्तेनैव पाङ्क्त॰ँ स्पृणोतीति ॥ १ ॥ ( सर्वमेकं च ) ॥ इति सप्तमोऽनुवाकः ॥ ७ ॥

ओमिति ब्रह्म ॥ ओमितीद॰ँसर्वम् ॥ ओमित्येतद-

नक्षत्रें ( हें देवतापांक्तस्वरूप ). उदक, ओषधि, वनस्पति, आकाश, आत्मा ( हें भूतपांक्तस्वरूप ). याप्रमाणें अधिभूत-स्वरूप झालें. आतां अध्यात्मस्वरूप—प्राण, व्यान, अपान, उदान, समान ( हें वायुपांक्तस्वरूप ). चक्षु, श्रोत्र, मन, वाणी, त्वचा ( हें इंद्रियपांक्तस्वरूप ). चर्म, मांस, स्नायु, अस्थि, मज्जा ( हें धातुपांक्तस्वरूप ). हें सांगून ऋषि म्हणाले, हें सर्व ( जगत् ) पांक्तच आहे. पांक्तानेंच पांक्ताची तुष्टि ( अथवा पूर्तता ) होते. इति सप्तमोऽनुवाकः

( आतां ओंकाराचा उपासनाविधि सांगतात—) ॐ हें ब्रह्म

नुकृति ह स्म वा अप्यो श्रावयेत्याश्रावयन्ति ॥ ओमिति सामानि गायन्ति ॥ ओꣳशोमिति शस्त्राणि शꣳसन्ति ॥ ओमित्यध्वर्युः प्रतिगरं प्रतिगृणाति ॥ ओमिति ब्रह्मा प्रसौति ॥ ओमित्यग्निहोत्रमनुजानाति ॥ ओमिति ब्राह्मणः प्रवक्ष्यन्नाह ब्रह्मोपाप्नवानीति ॥ ब्रह्मैवोपाप्नोति ॥ १ ॥

आहे. हें सर्व ( विश्व ) ॐ आहे. ॐ अनुकृति आहे [ कांहीं सांगितलें असतां ऐकणारा ॐ ह्मणून त्याप्रमाणें करतो. ह्मणजे अनुकृति हा अर्थ ॐ अक्षराचा जाणा. ह्मणजे लौकिकव्यवहाराला कारण ॐकार होतो. त्याचप्रमाणें वैदिक व्यवहाराला देखील होतो असें पुढें सांगतात- ] ( देवांना मंत्र ) ऐकव असें सांगितलें असतां ॐ ह्मणून मंत्र ह्मणतात. ॐ ह्मणून सामांचें गायन करतात. ॐ शं असें ह्मणून शस्त्रशब्दपूर्वक ऋचा ह्मणतात. ॐ असें ह्मणून अध्वर्यु कर्म [ प्रतिगरं ] ह्मणूं लागतो. ॐ असें ह्मणून ब्रह्मा अनुज्ञा देतो. ॐ असें ह्मणून अग्निहोत्राला अनुज्ञा देतो. ॐ असा अध्ययनाला आरंभ करणारा ब्राह्मण " मला

( ॐ दश ) ॥ इत्यष्टमोऽनुवाकः ॥ ८ ॥

ऋतं च स्वाध्यायप्रवचने च ॥ सत्यं च स्वाध्यायप्रवचने च ॥ तपश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ दमश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ शमश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ अग्नयश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ अग्निहोत्रं च स्वाध्यायप्रवचने च ॥ अतिथयश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ मानुषं च स्वाध्यायप्रवचने च ॥ प्रजा च स्वाध्यायप्रवचने च ॥ प्रजनश्च स्वाध्याय-

ब्रह्माची प्राप्ति होवो " असें ह्मणतो. ( त्याप्रमाणें ) त्याला ब्रह्माची प्राप्ति होते. १. इति अष्टमोनुवाकः

यथाशास्त्र भाषण [ ऋतं ], अध्ययन [ स्वाध्याय ] आणि अध्यापन [ प्रवचन ] यांचें अनुष्ठान [ आचरण ] केलें पाहिजे. सत्य आणि स्वाध्यायप्रवचन, तप आणि स्वाध्यायप्रवचन, दम आणि स्वाध्यायप्रवचन, शम आणि स्वाध्यायप्रवचन, अग्न्याधान आणि स्वाध्यायप्रवचन, अग्निहोत्र आणि स्वाध्यायप्रवचन, आतिथ्य आणि स्वाध्यायप्रवचन, लौकिकव्यवहार आणि स्वाध्यायप्रवचन, प्रजोत्पत्ति आणि स्वाध्याय-

प्रवचने च ॥ प्रजातिश्च स्वाध्यायप्रवचने च ॥ सत्यमिति सत्यवचा राथीतरः ॥ तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः ॥ स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः ॥ तद्धि तपस्तद्धि तपः ॥ १ ॥ ( प्रजा च स्वाध्यायप्रवचने च षट् च ) ॥ इति नवमोऽनुवाकः ॥ ९ ॥

अहं वृक्षस्य रेरिवा ॥ कीर्तिः पृष्ठं गिरेरिव ॥ ऊर्ध्वप-

प्रवचन, ऋतुकालीं गमन आणि स्वाध्यायप्रवचन, पौत्रोत्पत्ति आणि स्वाध्यायप्रवचन, यांचें अनुष्ठान केलें पाहिजे. सत्याचें अनुष्ठान केलें पाहिजे असें रथीतर ऋषीचा सत्यवचा नामक पुत्र सांगतो. तपाचें अनुष्ठान केलें पाहिजे असें पुरुशिष्टि ऋषीचा तपोनित्य नामक पुत्र सांगतो. स्वाध्याय व प्रवचन यांचेंच अनुष्ठान केलें पाहिजे, कारण तेंच तप होय, असें मुद्गल ऋषीचा नाक नामक पुत्र सांगतो. १. इति नवमोऽनुवाकः

मी ( संसाररूपी ) वृक्षाचा ( अंतर्यामित्वानें ) प्रेरणा कर-णारा आहें. ( माझी ) कीर्ति पर्वताच्या पृष्ठाप्रमाणें ( उंच ) आहे. पवित्र ब्रह्म [ पवित्रं ] ज्याचें कारण [ ऊर्ध्वं ] आहे

वित्रो वाजिनीव स्वमृतमस्मि ॥ द्रविणꣳ सवर्चसम् ॥ सुमेधा अमृतोऽक्षितः ॥ इति त्रिशङ्कोर्वेदानुवचनम् ॥१॥ ( अहꣳ षट् ) इति दशमोऽनुवाकः ॥ १० ॥

वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति ॥ सत्यं वद ॥ धर्मं चर ॥ स्वाध्यायान्मा प्रमदः ॥ आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः ॥ सत्यान्न प्रम-

असा मी आहें. सूर्याचे ठिकाणीं [ वाजिनि ] ज्याप्रमाणें प्रकाशरूप अथवा शोभमान आत्मस्वरूप आहे त्याप्रमाणें माझे ठिकाणीं आहे. दीप्तियुक्त असें ब्रह्मज्ञान [द्रविणं] माझे ठिकाणीं आहे. उत्तम बुद्धीनें युक्त व अमृतत्वानें सिक्त असा मी आहें. याप्रमाणें आत्मैकत्वज्ञानानें उत्पन्न झालेलें त्रिशंकु ऋषीचें वचन आहे. १. इति दशमोऽनुवाकः

( ब्रह्मविज्ञानापूर्वी ) श्रौतस्मार्त कर्में नियमानें केलीं पाहिजेत असें सांगितल्यानंतर आचार्य शिष्याला उपदेश करतात—सत्य भाषण कर. धर्माचें अनुष्ठान कर. स्वाध्यायाविषयीं प्रमाद करूं नको. ( अध्ययन पुरें झाल्यावर ) आचार्यांकडे

दितव्यम् ॥ धर्मान्न प्रमदितव्यम् ॥ कुशलान्न प्रम-
दितव्यम् ॥ भूत्यै न प्रमदितव्यम् ॥ स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ॥ १ ॥ देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ॥ मातृदेवो भव ॥ पितृदेवो भव ॥ आचार्यदेवो भव ॥ अतिथिदेवो भव ॥ यान्यनवद्यानि कर्माणि ॥ तानि सेवितव्यानि ॥ नो इतराणि ॥ यान्यस्माकꣳ सुचरितानि ॥ तानि त्वयोपास्यानि ॥ २ ॥ नो इतराणि ॥ ये के चास्म-

प्रिय असें धन आणून (नंतर गृहस्थाश्रमी हो व) प्रजातंतूचा छेद करूं नको. सत्याविषयीं प्रमाद करूं नको. धर्माविषयीं प्रमाद करूं नको. आत्मसंरक्षणार्थ कर्माविषयीं [ कुशलात् ] प्रमाद करूं नको. भूत्यर्थ मंगलकर्माविषयीं प्रमाद करूं नको. स्वाध्याय व प्रवचन यांविषयीं प्रमाद करूं नको. १. देवकार्य व पितृकार्य यांविषयीं प्रमाद करूं नको. मातृदेव [ माता हाच ज्याचा देव आहे असा] हो. पितृदेव हो. आचार्यदेव हो. अतिथिदेव हो. जीं अनिंद्य कर्में आहेत त्यांचेच आचरण करावें. इतर कर्मांचें आचरण करूं नये. आमचीं जीं सत्कर्में

च्छिष्टं प्रयच्छेदात्मनि हैवास्य तद्वैश्वानरे हुतꣳ स्यादिति तदेष श्लोकः ॥ ४ ॥ यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासते॥ एवꣳसर्वाणि भूतान्यग्निहोत्रमुपासत इत्यग्निहोत्रमुपासत इति ॥५॥ इति चतुर्विंशः खण्डः॥२४॥ इति पंचमोऽध्यायः

षष्ठोऽध्यायः

ॐ श्वेतकेतुर्हारुणेय आस तꣳ ह पितोवाच श्वेतकेतो

( उच्छिष्ट देण्याला अपात्र असा जो ) चंडाल त्याला उच्छिष्ट दिलें तरी तें वैश्वानर आत्म्यामध्येंच हवन केल्याप्रमाणें होय. याविषयीं पुढील श्लोक आहे. ४. ज्याप्रमाणें क्षुधित बालक मातेची उपासना करतात त्याप्रमाणें सर्व भूतमात्र अग्निहोत्राची उपासना करतात; [ ह्म० सर्व जग भोजनानें तृप्त होतें ]. ५. इति चतुर्विंशः खंडः ॥ २४ ॥

इति पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

अध्याय सहावा.

आरुणीचा [ अरुणपुत्राचा ] श्वेतकेतु नामें पुत्र होता. त्याला [ श्वेतकेतूला ] पिता ह्मणाला, श्वेतकेतु, ( आपल्या

वस ब्रह्मचर्यं न वै सोम्यास्मत्कुलीनोऽननूच्य ब्रह्मबन्धुरिव भवतीति ॥ १ ॥ स ह द्वादशवर्ष उपेत्य चतुर्विंꣳशतिवर्षः सर्वान्वेदानधीत्य महामना अनूचानमानी स्तब्ध एयाय तꣳ ह पितोवाच श्वेतकेतो यन्नु सोम्येदं महामना

कुलगुरूकडे जाऊन अध्ययन करीत ) ब्रह्मचर्यानें रहा. नाहींतर बाळा, आमच्या कुळांत जन्माला येऊन अध्ययन न केल्यामुळें ब्रह्मबंधु [ ब्राह्मणाचा बंधु=स्वतः ब्राह्मणगुणांनीं युक्त नाहीं असा ] होणें हें योग्य नाहीं. १. ( त्याप्रमाणें ) बारा वर्षांचा श्वेतकेतु आचार्याकडे आला. चोवीस वर्षांचा होईपर्यंत त्यानें सर्व वेदांचें अध्ययन केलें. तेव्हां आपल्या समान ( ज्ञाता ) कोणी नाहीं असें त्याला वाटूं लागलें [ महामनाः ], आपण कोणत्याहि प्रश्नाचें उत्तर देण्यास समर्थ आहोंत असें तो समजूं लागला [ अनूचानमानी = अनुवचनसमर्थः ] व त्याचा स्वभाव विनयरहित [ स्तब्धः ] झाला. तो परत आला तेव्हां पित्यानें त्याला विचारलें, बाळा, श्वेतकेतु, तूं महामना, अनूचानमानी व स्तब्ध झाला आहेस; तर

अनूचानमानी स्तब्धोऽस्युत तमादेशमप्राक्ष्यः ॥ २ ॥
येनाश्रुतꣳ श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातमिति कथं
नु भगवः स आदेशो भवतीति ॥ ३ ॥ यथा सोम्यैके-
न मृत्पिण्डेन सर्वं मृन्मयं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो
नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥ ४ ॥ यथा सोम्यैकेन
लोहमणिना सर्वं लोहमयं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो

( ज्याचे योगानें परब्रह्म दर्शविलें जातें ) तो आदेश [ ज्ञान अथवा तत्त्व ] तूं गुरूला विचारलास काय ? २. ज्या आदेशाचे ज्ञानानें अश्रुत गोष्टी श्रुत होतात, अतर्कित गोष्टी तर्कित होतात आणि अज्ञात गोष्टी ज्ञात होतात तो आदेश. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, असा आदेश कोणता ? ३. पिता ह्मणाला, बाळा, ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या एका भांड्यानें इतर सर्व मृत्तिकाविकार जाणतां येतो, कारण विकार हें नुसतें वाणीचें अवलंबन आहे, मृत्तिका हेंच केवळ सत्य आहे; ४. बाळा, ज्याप्रमाणें सुवर्णाच्या एका वस्तूनें इतर सर्व ( कटककेयूरादि ) सुवर्णविकार जाणतां येतो, कारण विकार हें नुसतें

नामधेयं लोहमित्येव सत्यम् ॥ ५ ॥ यथा सोम्यैकेन नखनिकृन्तनेन सर्वं कार्ष्णायसं विज्ञातꣳ स्याद्वाचारम्भणं विकारो नामधेयं कृष्णायसमित्येव सत्यमेवꣳ सोम्य स आदेशो भवतीति ॥ ६ ॥ नवै नूनं भगवन्तस्त एतद–वेदिषुर्यद्ध्येतदवेदिष्यन् कथं मे नावक्ष्यन्निति भगवाꣳस्त्वेव मे तद्ब्रवीत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ७ ॥ इति प्रथमः खण्डः ॥ १ ॥

वाणीचें अवलंबन आहे, सुवर्ण हेंच केवळ सत्य आहे; ५. बाळा, ज्याप्रमाणें एकदां नख ओरखडून कळलेल्या लोह-पिंडानें इतर सर्व लोहविकार जाणतां येतो, कारण विकार हें नुसतें वाणीचें अवलंबन आहे, लोह हेंच केवळ सत्य आहे; त्याप्रमाणें मी ह्मणतों हा आदेश आहे. ६. श्वेतकेतु ह्मणाला, त्या माझ्या गुरूला हें तत्त्व ( अथवा हा आदेश ) माहीत नाहीं. कारण, जर मला सांगितला असता तर त्यांनीं मला कां बरें सांगितला नसता ? तेव्हां ( हें तत्त्व ) आपणच मला सांगा. पिता ह्मणाला, बाळा ठीक आहे, सांगतों. ७. इति

सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तद्धैक आहु-
रसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तस्मादसतः सज्जायत
॥ १ ॥ कुतस्तु खलु सोम्यैवꣳ स्यादिति होवाच कथम-
सतः सज्जायेतेति सत्त्वेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वि-
तीयम् ॥ २ ॥ तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजोऽसृ-
जत तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत।

प्रथमः खंडः ॥ १ ॥

बाळा, जगाच्या उत्पत्तीचे पूर्वीं [ अग्रे ] एक, अद्वितीय असें सत् मात्र होतें. ( तें न समजल्यामुळें ) कोणी ( वैनाशिक ) ह्मणतात, पूर्वीं एक, अद्वितीय असें असत् होतें व त्या असतापासून सत् उत्पन्न झालें. १. पण बाळा, असें असतापासून सत् उत्पन्न होणें कसें शक्य होईल ? ( होणें शक्य नाहीं ). ह्मणून पूर्वीं सत्च—एक व अद्वितीय असेंच—होतें. २. त्यानें पाहिलें कीं, मीं बहुत व्हावें आणि मीं अधिक उत्पन्न व्हावें. ( तेव्हां ) त्यानें तेज उत्पन्न केलें. त्या तेजानें [ तेजोरूपी सतानें ] पाहिलें कीं, मीं बहुत व्हावें

तस्माद्यत्र क्व च शोचति स्वेदते वा पुरुषस्तेजस एव तदध्यापो जायन्ते ॥ ३ ॥ ता आप ऐक्षन्त बह्व्यः स्याम प्रजायेमहीति ता अन्नमसृजन्त तस्माद्यत्र क्व च वर्षति तदेव भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नाद्यं जायते ॥ ४ ॥ इति द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

तेषां खल्वेषां भूतानां त्रीण्येव बीजानि भवन्त्याण्डजं

आणि अधिक उत्पन्न व्हावें. (तेव्हां) त्यानें उदक उत्पन्न केलें. ह्मणून जेव्हां कोणी मनुष्य तप्त होतो [शोचति] अथवा स्वेद पावतो तेव्हां तेजापासूनच उदक उत्पन्न होतें (असें आपण पहातों) ३. त्या उदकानें [उदकरूपी तेजानें] पाहिलें कीं, आपण बहुत व्हावें आणि अधिक उत्पन्न करावें. (तेव्हां) त्यानें अन्न उत्पन्न केलें. ह्मणून ज्या कोठें वृष्टि होते तेथेंच पुष्कळ अन्न उत्पन्न होतें. ह्मणून उदकापासूनच आद्य असें अन्न उत्पन्न होतें. ४. इति द्वितीयः खंडः ॥ २ ॥

या (पक्षी, मनुष्य, पशु आदि) भूतांच्या उत्पत्तीचीं

जीवजमुद्भिज्जमिति ॥ १ ॥ सेयं देवतैक्षत हन्ताहमिमास्तिस्रो देवता अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति ॥ २ ॥ तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकां करवाणीति सेयं देवतेमास्तिस्रो देवता अनेनैव जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरोत् ॥ ३ ॥ तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकामकरोद्यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो

तीन बीजें आहेत--अंडज, जीवज आणि उद्भिज्ज. १. ती (सत्) देवता पहाती झाली कीं, या तीन (तेज, उदक व अन्न) देवतारूपी मीं या (स्वबुद्धिस्थ) जीव [=प्राणधारण कर्ता] आत्म्यामध्यें प्रवेश करून नाम व रूप हीं स्पष्ट करावीं. २. त्यांपैकीं प्रत्येकाचें त्रिवृत करावें [म्हणजे प्रत्येकामध्यें तीन गुण त्यांपैकीं एकाचें प्राधान्य आणि बाकी दोहोंचे अंश]. त्याप्रमाणें याच (सद्रूपी) देवतेनें याच जीव आत्म्यामध्यें या तीन देवतांचा प्रवेश करवून प्रत्येकाचीं नामें व रूपें स्पष्ट केलीं. ३. त्यांपैकीं प्रत्येकीचें तिनें त्रिवृत केलें. बाळा, या त्रिवृत अशा (तेज, उदक व अन्न) देवता त्रि-

देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥४॥
इति तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

यदग्ने रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादग्नेरग्नित्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ १ ॥ यदादित्यस्य रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादादित्यादादित्यत्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि

वृत होऊन प्रत्येक एकेक कशा झाल्या तें ( मी तुला सांगतों) श्रवण कर. ४. इति तृतीयः खंडः ॥ ३ ॥

अग्नीचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप होय, जें शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें अग्नीचें अग्नित्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय. १. आदित्याचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें आदित्याचें आदित्यत्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच

रूपाणीत्येव सत्यम् ॥ २ ॥ यच्चन्द्रमसो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाच्चन्द्राच्चन्द्रत्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ३ ॥ यद्विद्युतो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाद्विद्युतो विद्युत्त्वं वाचारम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ४ ॥ एतद्ध स्म वै तद्विद्वाꣳस आहुः पूर्वे महाशाला महाश्रोत्रिया न नोऽद्य कश्चनाश्रुतममतमविज्ञातमुदाह-

सत्य होय. २. चंद्राचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें चंद्राचें चंद्रत्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय. ३. विजेचें जें तांबडें रूप तें तेजाचें रूप, शुक्ल रूप तें उदकाचें आणि कृष्ण रूप तें अन्नाचें. याप्रमाणें विजेचें विद्युत्त्व गेलें. जो ह्मणून विकार तो केवळ वाचेचा अवलंब होय. हीं तीन रूपें हेंच सत्य होय. ४. हें जाणणारे पूर्वींचे महाशाल व महाश्रोत्रिय विद्वा-

रिष्यतीति ह्येभ्यो विदांचक्रुः ॥ ५ ॥ यदु रोहितमिवाभूदिति तेजसस्तद्रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु शुक्लमिवाभूदित्यपाᳪ रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु कृष्णमिवाभूदित्यन्नस्य रूपमिति तद्विदांचक्रुः ॥ ६ ॥ यद्वविज्ञातमिवाभूदित्येतासामेव देवतानाᳪ समास इति तद्विदांचक्रुर्यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृ-

नांनीं ह्मटलें आहे कीं, "आमच्या कुळांतला कोणीहि मनुष्य आपणांला अश्रुत, अमत अथवा अविज्ञात कांहीं आहे असें ह्मणणार नाहीं." या ( त्रिवृत्कृत ) तीन रूपांपासूनच त्यांना हें ज्ञान झालें. ५. जें ह्मणून रोहित ( तांबडें ) झालें तें तेजाचें रूप होय असें त्यांनीं जाणलें. जें शुक्ल झालें तें उदकाचें रूप असें त्यांनीं जाणलें. जें कृष्ण झालें तें अन्नाचें रूप असें त्यांनीं जाणलें. ६. जें अविज्ञात असें राहिलें तें याच देवतांचें समुदायरूप असें त्यांनीं जाणलें. बाळा, आतां या तीन देवता ( शिर, हस्त आदि लक्षणयुक्त ) पुरुषाप्रत येऊन प्रत्येक त्रिवृत कशी होते तें मजपासून श्रवण कर. ७. इति

द्केका भवति तन्मे विजानीहीति ॥ ७ ॥ इति चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

अन्नमशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मांसं योऽणिष्ठस्तन्मनः॥१॥ आपः पीतास्त्रेधा विधीयन्ते तासां यः स्थविष्ठो धातुस्तन्मूत्रं भवति यो मध्यमस्तल्लोहितं योऽणिष्ठः स प्राणः ॥ २ ॥ तेजोऽशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तदस्थि भवति यो मध्यमः स मज्जा योऽणिष्ठः

चतुर्थः खंडः ॥ ४ ॥

भक्षण केलेलें अन्न तीन प्रकारांनीं विभाग पावतें. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो पुरीष होतो; जो मध्यम तो मांस होतो; आणि जो अत्यंत लहान तो मन होतो. १. प्राशन केलेलें उदक तीन प्रकारांनीं विभाग पावतें. त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो मूत्र होतो; जो मध्यम तो रक्त होतो; आणि जो अत्यंत लहान तो प्राण होतो. २. भक्षण केलेलें तेज [ तेल, घृत इत्यादि ] तीन प्रकारांनीं विभाग पावतें.

सा वाक् ॥ ३ ॥ अन्नमयꣳ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ४ ॥ इति पंचमः खण्डः ॥ ५ ॥

दध्नः सोम्य मथ्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति तत्सर्पिर्भवति ॥१॥ एवमेव खलु सोम्यान्नस्याश्य-

त्याचा जो अत्यंत स्थूल भाग तो अस्थि होतो; जो मध्यम तो मज्जा होतो; आणि जो अत्यंत लहान तो वाणी होतो. ३. ( याप्रमाणें ) हे बाळा, मन हें अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय आहे. तो श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् , आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे, बाळा, सांगतो. ४ इति पंचमः खंडः ॥ ५ ॥

बाळा, दहीं मंथन केलें ह्मणजे त्याचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो (लोण्याच्या रूपानें) वर येतो. त्याचें तूप होतें. १. त्याप्रमाणेंच बाळा, भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नाचा जो

मानस्य योऽणिमा स ऊर्ध्वं समुदीषति तन्मनो भवति ॥ २ ॥ अपा᳸ सोम्य पीयमानानां योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति स प्राणो भवति ॥ ३ ॥ तेजसः सोम्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति सा वाग्भवति ॥४॥ अन्नमय᳸ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ५ ॥ इति षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

षोडशकलः सोम्य पुरुषः पञ्चदशाहानि माशीः काम-

अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. तो मन होतो. २. बाळा, प्राशन केल्या जाणाऱ्या उदकाचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. तो प्राण होतो. ३. बाळा, भक्षण केल्या जाणाऱ्या तेजाचा जो अत्यंत सूक्ष्म भाग तो वर येतो. त्याची वाणी होते. ४. ( याप्रमाणें ) बाळा, मन अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय आहे. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ५. इति षष्ठः खंडः ॥ ६ ॥

मपः पिबापोमयः प्राणो नपिबतो विच्छेत्स्यत इति ॥ १॥ स ह पञ्चदशाहानि नाशाथ हैनमुपससाद किं ब्रवीमि भो इत्यृचः सोम्य यजूꣳषि सामानीति स होवाच न वै मा प्रतिभान्ति भो इति ॥ २ ॥ तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकोऽङ्गारः खद्योतमात्रः परिशिष्टः स्यात्तेन ततोऽपि न बहु देहेदेवꣳ सोम्य ते षोडशानां कलाना-

बाळा, पुरुषाच्या सोळा कला आहेत. तूं पंधरा दिवस (कांहीं) भक्षण करूं नकोस. वाटेल तितकें उदक प्राशन कर. कारण, प्राण उदकमय आहे. उदक न पिणाऱ्या मनुष्याचा प्राण नाश पावतो. १. तेव्हां त्या श्वेतकेतूनें पंधरा दिवस कांहीं भक्षण केलें नाहीं. नंतर तो पित्याकडे आला आणि ह्मणाला, भगवन् आतां मी काय करूं ? पिता ह्मणाला, ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद यांचें अध्ययन कर. तो ह्मणाला, ऋगादि मला भासमान होत नाहींत. २. पिता ह्मणाला, बाळा, ज्याप्रमाणें मोठ्या पेटविलेल्या अग्नीपैकीं खद्योताएवढी एक ठिणगी उरली असतां तिच्यानें तिच्या-

मेका कलातिशिष्टा स्यात्तयैतर्हि वेदान्नानुभवस्यशानाथ मे विज्ञास्यसीति ॥ ३ ॥ स हाशाथ हैनमुपससाद तꣳ ह यत्किंच पप्रच्छ सर्वꣳह प्रतिपेदे ॥ ४ ॥ तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकमङ्गारं खद्योतमात्रं परिशिष्टं तं तृणैरुपसमाधाय प्राज्वलयेत्तेन ततोऽपि बहु दहेत् ॥ ५ ॥ एवꣳ सोम्य ते षोडशानां कलानामेका कलाति-

पेक्षां लहान वस्तु देखील दहन होत नाहीं—अर्थात् मोठी तर नाहींच—त्याप्रमाणें तुझ्या सोळा कलांपैकीं एक कला अवशिष्ट राहिली आहे त्यामुळें तुला वेदांचा अनुभव घेतां येत नाहीं. आतां अन्न भक्षण कर. ह्मणजे मी तुला सांगेन व तूं जागशील. ३. नंतर त्यानें भोजन केलें व तो पित्याकडे गेला. पित्यानें त्याला जे जे (प्रश्न) विचारले त्या त्या सर्वांचें त्याला ज्ञान झालें. ४. तेव्हां पिता त्याला ह्मणाला, बाळा, ज्याप्रमाणें मोठ्या पेटविलेल्या अग्नीपैकीं उरलेली खद्योताएवढी ठिणगी सभोंवतीं गवत घालून प्रज्वलित केली असतां पुष्कळ दहन करूं शकते, त्याप्रमाणें तुझ्या सोळा कलापैकीं

शिष्टाभूत्साऽन्नेनोपसमाहिता प्राज्वालीत्तयैतर्हि वेदाननुभवस्यन्नमयꣳहि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ६ ॥ इति सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

उद्दालको हारुणिः श्वेतकेतुं पुत्रमुवाच स्वप्नान्तं मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषः स्वपिति नाम सता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति तस्मादेनꣳ

एक कला शिल्लक राहिली होती ती अन्नाचे योगानें वाढवून प्रज्वलित केली तेव्हां तिच्या योगानें वेदांचें ज्ञान अनुभवण्यास तूं समर्थ झालास. ह्मणून बाळा, मन अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय आहे. याप्रमाणें पित्यानें सांगितलेलें ज्ञान श्वेतकेतूला समजलें. ५. ६. इति सप्तमः खंडः ॥ ७ ॥

अरुणपुत्र उद्दालक आपल्या श्वेतकेतुनामक पुत्राला ह्मणाला, बाळा, स्वप्नाचा मध्य [ अन्त = मध्य ] ( कसा असतो तो ) मजपासून श्रवण कर. जेव्हां पुरुष स्वपिति [ झोंप

स्वपितीत्याचक्षते स्वꣳ ह्यपीतो भवति ॥ १ ॥ स यथा शकुनिः सूत्रेण प्रबद्धो दिशं दिशं पतित्वान्यत्रायतनमलब्ध्वा बन्धनमेवोपश्रयत एवमेव खलु सोम्य तन्मनो दिशं दिशं पतित्वान्यत्रायतनमलब्ध्वा प्राणमेवोपश्रयते प्राणबन्धनꣳ हि सोम्य मन इति ॥ २ ॥ अशनापिपासे मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषोऽशिशिषति नामाप

घेतो ] असें ह्मणतात तेव्हां तो सत्संपन्न झालेला असतो [ =सत् शब्दवाची देवतेशीं एकरूप झालेला असतो ]. आपलें ( जीव-रूपाहून भिन्न असें ) खरें स्वरूप जाणणारा [ स्वं अपीतः ] असा तो होतो ह्मणून त्याला ( लौकिकामध्यें ) स्वपिति असें ह्मणतात. १. बाळा, ज्याप्रमाणें ( पारध्याच्या ) दोरीनें बद्ध झालेला पक्षी निरनिराळ्या दिशांकडे उडून जाऊं लागला तरी आश्रय न मिळतां अखेरीस बंधनाकडेच येतो, त्याप्रमाणें हें मन निरनिराळ्या दिशांकडे जाऊन इतरत्र आश्रय न मिळाल्यानें प्राणाचाच आश्रय करतें. कारण, बाळा, प्राण हा मनाचें बंधन आहे. २. बाळा, आतां अशना [ खाण्याची

एव तदशितं नयन्ते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तदप आचक्षतेऽशनायेति तत्रैतच्छुङ्गमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥ ३ ॥ तस्य क मूलꣳ स्यादन्यत्रान्नादेवमेव खलु सोम्यान्नेन शुङ्गेनापो मूलमन्विच्छाद्भिः सोम्य शुङ्गेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा

इच्छा ] व पिपासा [ पिण्याची इच्छा ] हीं मजपासून श्रवण कर. पुरुष जें अशिशिषति ह्मणजे भक्षण करण्याची इच्छा करतो त्याचें कारण ( पूर्वीं ) भक्षण केलेलें अन्न उदकच त्याचा परिणाम करून जिरवितें [ नयन्ते ] ह्मणून उदकालाच 'अशनाया' [ = अन्नाचा नेता ] असें नांव आहे; ज्याप्रमाणें गोनाय [ = गुराखी ], अश्वनाय [ = घोडेस्वार ], पुरुषनाय [ = राजा किंवा सेनापति ] हीं नांवें असतात तद्वत्. जसा वटवृक्षाचा अंकुर उत्पन्न होतो तसें हें शरीर त्या अन्नापासून अंकुराप्रमाणें उत्पन्न झालें आहे असें जाण. हें कांहीं मूलरहित नाहीं. ३. त्याचें मूळ अन्नाखेरीज इतर कोणतें असणार ? ( अर्थात् अन्न हें पुरुषरूपी अंकुराचें मूळ

सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ॥ ४ ॥ अथ यत्रैतत्पुरुषः पिपासति नाम तेज एव तत्पीतं नयते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तत्तेज आचष्ट उदन्येति तत्रैतदेव शुङ्गमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥ ५ ॥ तस्य क्व मूलꣳ स्यादन्यत्राद्भ्योऽद्भिः सोम्य शुङ्गेन

आहे ). बाळा, याप्रमाणेंच अन्नरूपी अंकुराचें मूळ उदक आहे असें जाण. उदकरूपी अंकुराचें मूळ तेज आहे. तेजोरूपी अंकुराचें मूळ सत् आहे. बाळा, सत् हेंच या सर्व प्रजांचें मूळ आहे, आयतन [ आश्रय ] आहे आणि प्रतिष्ठा [ लय ] आहे. ४. जेव्हां हा पुरुष ( उदक ) प्राशन करण्याची इच्छा करतो तेव्हां त्यानें प्राशन केलेलें उदक तेज नेतें [ = शोषण करतें ] ह्मणून गोनाय, अश्वनाय, पुरुषनाय यांच्याप्रमाणें तेजालाच उदन्य असें नांव आहे. ह्मणून बाळा, उदकापासून हें शरीर अंकुराप्रमाणें उत्पन्न झालें आहे असें जाण. हें कांहीं मूलरहित नाहीं. ५. याचें उदकाशिवाय दुसरें कोणतें मूळ

तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठा यथा नु खलु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तदुक्तं पुरस्तादेव भवत्यस्य सोम्य पुरुषस्य प्रयतो वाङ् मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायाम् ॥ ६ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो

असणार ? बाळा, याप्रमाणेंच उदकरूपी अंकुराचें मूळ तेज आहे असें जाण. तेजोरूपी अंकुराचें मूळ सत् आहे. बाळा, सत् हेंच या सर्व प्रजांचें मूळ आहे, आयतन आहे आणि प्रतिष्ठा आहे. बाळा, या ( तेज, उदक व अन्न अशा ) तीन देवता पुरुषाप्रत येऊन प्रत्येक त्रिवृत कशी होते हें पूर्वी सांगितलेंच आहे. हा पुरुष मरूं लागला [ प्रयतः ] ह्मणजे याची वाणी मनामध्यें लय पावते, मन प्राणामध्यें लय पावतें, प्राण तेजामध्यें लय पावतो आणि तेज ( सर्वांचें मूळ जी ) परदेवता तिच्यामध्यें लय पावतें. ६. ती देवता ह्मणजे सत्.

इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ७ ॥ इत्यष्टमः खण्डः ॥ ८ ॥

यथा सोम्य मधु मधुकृतो निस्तिष्ठन्ति नानात्ययानां वृक्षाणाꣳ रसान्समवहारमेकताꣳ रसं गमयन्ति ॥ १ ॥ ते यथा तत्र न विवेकं लभन्तेऽमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्म्यमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्मीत्येवमेव खलु सोम्येमाः

तें अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तें आत्मा आहे. श्वेतकेतो, तो आत्मा तूंच आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे, बाळा, सांगतों. ७. इति अष्टमः खंडः ॥ ८ ॥

बाळा, ज्याप्रमाणें मधुमक्षिका मध तयार करतात, नानाप्रकारच्या दिशांना असलेल्या वृक्षांचे रस आणून त्यांचा एक मध असा रस तयार करतात, ते रस ज्याप्रमाणें मी या वृक्षाचा रस आहें, मी त्या वृक्षाचा रस आहें इत्यादि विशिष्ट ज्ञान जाणत नाहींत, त्याप्रमाणें बाळा, या सर्व प्रजा (प्रत्यहीं

सर्वाः प्रजाः सति संपद्य न विदुः सति संपद्यामह इति ॥ २ ॥ त इह व्याघ्रो वा सिꣳहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतंगो वा दꣳशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ ३ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥४॥ इति नवमः खण्डः ॥ ९ ॥

सुषुप्तिकालीं अथवा अखेरीस मरणकालीं ) सत्‌चे ठिकाणीं लय पावतात तरी सत्‌चे ठिकाणीं आपण लय पावलों हें जाणत नाहींत. १. २. ह्मणून ते ( सत्‌मध्यें लय पावल्यानंतर ) पुन्हां या लोकीं आले ह्मणजे वाघ, सिंह, लांडगा, डुकर, कीटक, पतंग, दंश करणारा प्राणी, अथवा मशक जसे ( पूर्वकालीं अथवा पूर्वजन्मीं ) असतात तसेच होतात. ३. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु

इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यन्दन्ते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियन्ति स समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहमस्मीयमहमस्मीति ॥१॥ एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सत आगम्य न विदुः सत आगच्छामह इति त इह व्याघ्रो वा सिꣳहो वा वृको वा

ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ४. इति नवमः खंडः ॥ ९ ॥

बाळा, ज्याप्रमाणें पूर्वगामी नद्या पूर्वेकडे जातात आणि पश्चिमगामी नद्या पश्चिमेकडे जातात (आणि सर्व समुद्राला मिळतात) आणि त्या पुन्हां समुद्रांतून (बाष्परूपानें वर जाऊन मेघांतून खालीं येतात व) समुद्रालाच प्राप्त होतात व त्या सर्व मिळून समुद्रच होतात; तेव्हां त्या जशा मी अमुक नदी आहें, मी तमुक नदी आहें असें जाणत नाहींत; त्याप्रमाणें बाळा, या सर्व प्रजा सत्पासून उत्पन्न झाल्या तरी आपण सत्पासून आलों हें जाणत नाहींत. ते (सत्मध्यें

वराहो वा कीटो वा पतंगो वा दꣳशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ २ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥ इति दशमः खण्डः ॥ १० ॥

अस्य सोम्य महतो वृक्षस्य यो मूलेऽभ्याहन्याज्जीवन्

लय पावल्यानंतर ) पुन्हां या लोकीं आले ह्मणजे वाघ, सिंह, लांडगा, डुकर, कीटक, पतंग, दंश अथवा मशक जसे ( पूर्वी ) असतात तसेच होतात. १. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति दशमः खंडः ॥ १० ॥

बाळा, या ( समोर दिसणाऱ्या ) मोठ्या वृक्षाच्या मूळभागीं कोणी प्रहार केला तर तो वृक्ष जिवंत आहे ह्मणून त्यांतून

स्रवेद्यो मध्येऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्योऽग्रेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्स एष जीवेनात्मनानुप्रभूतः पेपीयमानो मोदमानस्तिष्ठति ॥ १ ॥ अस्य यदेकाꣳ शाखां जीवो जहात्यथ सा शुष्यति द्वितीयां जहात्यथ सा शुष्यति तृतीयां जहात्यथ सा शुष्यति सर्वं जहाति सर्वः शुष्यति ॥ २ ॥ एवमेव खलु सोम्य विद्धीति होवाच जीवापेतं वाव

रस गळूं लागेल; मध्यभागीं प्रहार केला तर तो जिवंत आहे ह्मणून त्यांतून रस गळूं लागेल; अग्रभागीं प्रहार केला तर तो जिवंत आहे ह्मणून त्यांतून रस गळूं लागेल. ह्मणून (याप्रमाणें रस गळत असेल तर ) तो वृक्ष जीवरूपी आत्म्यानें व्याप्त आहे, तो ( उदक व भूमिसंबंधीं रस यांचें ) प्राशन करतो व ( तेणेंकरून ) आनंदित असा रहातो. १. जेव्हां वृक्ष आपली ( कुजलेली अथवा तोडलेली ) एक शाखा टाकून देतो तेव्हां ती शुष्क होते; दुसरी टाकतो तेव्हां ती शुष्क होते; तिसरी टाकतो तेव्हां ती शुष्क होते. सर्व शाखा टाकतो तेव्हां (तो) सर्व वृक्ष शुष्क होतो. २. ह्मणून बाळा तूं असें जाण कीं, हें

किलेदं म्रियते न जीवो म्रियत इति स य एषोऽणि-मैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥ इत्येकादशः खण्डः ॥ ११ ॥

न्यग्रोधफलमत आहरेतीदं भगव इति भिन्धीति भिन्नं भगव इति किमत्र पश्यसीत्यण्व्य इवेमा धाना भगव

( शरीर ) जीवरहित झालें ह्मणजे मरण पावतें. जीव मरण पावत नाहीं. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति एकादशः खंडः ॥ ११ ॥

पिता ह्मणाला, या वट वृक्षाचें एक फळ आण. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन् हें आणलें. पिता ह्मणाला, तें फोड. श्वेत केतु ह्मणाला, भगवन् हें फोडलें. पिता ह्मणाला, त्यांत तुला

इत्यासामङ्गैकां भिन्धीति भिन्ना भगव इति किमत्र पश्यसीति न किंचन भगव इति ॥ १ ॥ तꣳ होवाच यं वै सोम्यैतमणिमानं न निभालयस एतस्य वै सोम्यैषोऽणिम्न एवं महान्न्यग्रोधस्तिष्ठति श्रद्धत्स्व सोम्येति ॥ २ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्

काय दिसतें ? पुत्र ह्मणाला, भगवन्, अणुप्रमाण अशीं बीजें दिसतात. पिता ह्मणाला, यांतली एक बी फोड. पुत्र ह्मणाला, भगवन्, फोडली. पिता ह्मणाला, त्यांत तुला काय दिसतें ? पुत्र ह्मणाला, भगवन्, कांहीं दिसत नाहीं. १. पिता त्याला ह्मणाला, बाळा, या वटबीजांतलें सूक्ष्म प्रमाण तुला दिसत नाहीं. तथापि या सूक्ष्म प्रमाणापासूनच उत्पन्न झालेला हा मोठा वटवृक्ष येथें उभा आहे हें लक्षांत आण. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हा प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु

विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३॥ इति द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

लवणमेतदुदकेऽवधायाथ मा प्रातरुपसीदथा इति स ह तथा चकार तꣳहोवाच यद्दोषा लवणमुदकेऽवाधा अङ्ग तदाहरेति तद्धावमृश्य न विवेद ॥ १ ॥ यथा विलीनमेवाङ्गास्यान्तादाचामेति कथमिति लवणमिति मध्यादाचामेति कथमिति लवणमित्यन्तादाचामेति कथमिति

ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति द्वादश खंडः ॥ १२॥

हें मीठ (आज) पाण्यांत टाकून ठेव आणि (उद्यां) सकाळीं माझ्याकडे ये. श्वेतकेतूनें त्याप्रमाणें केलें. पिता त्याला ह्मणाला, रात्रीं जें मीठ तूं उदकांत टाकलेंस तें काढ. श्वेतकेतु हात घालून पाहूं लागला पण तें त्याला सांपडलें नाहीं. १. कारण तें उदकांत लुप्त झालें होतें. पिता ह्मणाला, आतां त्या उदकापैकीं वरच्या भागांतलें थोडें घेऊन आचमन कर. (पुत्रानें त्याप्रमाणें केलें). “कसें आहे?” “खारट

लवणमित्यभिप्राश्यैनदथ मोपसीदथा इति तद्ध तथा चकार तच्छश्वत्संवर्तते तꣳ होवाचात्र वाव किल सत्सोम्य न निभालयसेऽत्रैव किलेति ॥ २ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो

आहे." "मध्य भागांतलें घेऊन आचमन कर. कसें आहे?" "खारट आहे." "खालच्या भागांतलें घेऊन आचमन कर. कसें आहे?" "खारट आहे." "आतां तें उदक टाकून दे आणि मजकडे ये." श्वेतकेतु तें उदक टाकून "तें लवण उदकांत टाकलें ह्मणजे नेहमीं रहातें" असें ह्मणत पित्याकडे आला. पिता त्याला ह्मणाला, बाळा, याच (तेज, उदक, अन्न इत्यादिकांच्या कार्यरूपी) शरीरामध्यें सत् आहे. (पण) तें तुला दिसत नाहीं तरी तें येथेंच आहे. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा.

इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

यथा सोम्य पुरुषं गन्धारेभ्योऽभिनद्धाक्षमानीय तं ततोऽतिजने विसृजेत्स यथा तत्र प्राङ्वोदङ्वाऽधराङ्वा प्रत्यङ्वा प्रध्मायीताभिनद्धाक्ष आनीतोऽभिनद्धाक्षो विसृष्टः ॥ १ ॥ तस्य यथाभिनहनं प्रमुच्य प्रब्रूयादेतां दिशं गन्धारा एतां दिशं व्रजेति स ग्रामाद्ग्रामं पृच्छन् पण्डितो मेधावी

पिता म्हणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति त्रयोदशः खंडः ॥ १३ ॥

बाळा, ज्याप्रमाणें गंधार देशांतून ( तस्करांनीं ) एखाद्या मनुष्याचे डोळे बांधून त्याला अरण्यांत आणलें व अत्यंत निर्जन प्रदेशामध्यें सोडून दिलें असतां तो पूर्वेकडे, उत्तरेकडे, दक्षिणेकडे अथवा पश्चिमेकडे तोंड करून " माझे डोळे बांधून मला येथें आणलें व तसेंच सोडून दिलें " असें ओरडतो, आणि त्याला कोणी कारुणिक मनुष्य भेटून त्यानें त्याचे डोळे सोडल्यावर आणि अमुक दिशेला गंधार देश

गन्धारानेवोपसंपद्येतैवमेवेहाचार्यवान् पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य इति ॥ २ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भग-

आहे, तिकडे जा, असें सांगितलें ह्मणजे, तो जर विद्वान् व बुद्धिमान असेल तर एका गांवाहून दुसऱ्या गांवीं रस्ता विचारीत गंधार देशालाच परत जातो; त्याप्रमाणेंच (मी मूळचा आत्मस्वरूपापासून पापपुण्यादि तस्करांनीं या संसारामध्यें आणलेला आहें असें) (दयाळु) आचार्यानें युक्त असा पुरुष जाणतो. (हें जाणलें ह्मणजे त्या पुरुषाची कर्मक्षयापासून) सुटका होईपर्यंतच त्याचें (संसारांत) रहाणें होतें. सुटका झाली कीं, तो (पुन्हां) सत्स्वरूप होतो. १. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान

वान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥ इति चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

पुरुषꣳ सोम्योतोपतापिनं ज्ञातयः पर्युपासते जानासि मां जानासि मामिति तस्य यावन्न वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायां तावज्जानाति ॥ १ ॥ अथ यदास्य वाङ्मनसि संपद्यते मनः

सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति चतुर्दशः खंडः ॥ १४ ॥

बाळा, ( मरणकालीं ज्वरादिकांनीं ) तप्त झालेल्या मनुष्याच्या भोंवतीं त्याच्या गोतांतली मंडळी जमून " मला ओळखतोस का ? " " मला ओळखतोस का ? " असें विचारतात. जोंपर्यंत वाणी मनामध्यें लुप्त झालेली नसते, मन प्राणामध्यें लुप्त झालेलें नसतें, प्राण तेजामध्यें लुप्त झालेला नसतो आणि तेज ( सद्रूपी ) परमेश्वरामध्यें लुप्त झालेलें नसतें तोंपर्यंत तो ( आपल्या मंडळीला ) ओळखतो. १. पण जेव्हां वाणी मनामध्यें लोप पावते, मन प्राणामध्यें लोप

प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायामथ न जानाति ॥ २ ॥ स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान् विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥ इति पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥

पुरुषꣳ सोम्योत हस्तगृहीतमानयन्त्यपहार्षीत्स्तेयमकार्षीत्परशुमस्मै तपतेति स यदि तस्य कर्ता भवति तत

पावते, प्राण तेजामध्यें लोप पावतो आणि तेज (सद्रूपी) परमेश्वरामध्यें लोप पावत तेव्हां तो मनुष्य (आपल्या मंडळीला) ओळखीत नाहीं. २. या प्रजा ज्याच्यामध्यें प्रवेश करून पुन्हां प्रकट होतात तें सत् अणुप्रमाण आहे. तें या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. श्वेतकेतु ह्मणाला, भगवन्, आपण मला आणखी ज्ञान सांगा. पिता ह्मणाला, बरें आहे बाळा, सांगतों. ३. इति पंचदशः खंडः ॥ १५ ॥

बाळा, (राजसेवक) (चोर) मनुष्याचे हात बांधून

एवानृतमात्मानं कुरुते सोऽनृताभिसन्धोऽनृतेनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते ॥ १ ॥ अथ यदि तस्याकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्याभिसन्धः सत्येनात्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स न दह्यतेऽथ मुच्यते ॥ २ ॥ स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा

( अधिकाऱ्यापुढें ) आणतात. ते ह्मणतात, यानें ( धनाचा ) अपहार केला, चोरी केली. ( तो ह्मणतो, मीं चोरी केली नाहीं ). ( तो अधिकारी ह्मणतो, ) हा परशु तापवा. त्या मनुष्यानें जर चोरी केली असेल तर तो स्वतःच स्वतःला खोटा करतो. अंतरामध्यें असत्य धारण करणारा तो असत्यभाषी तप्त परशु हातांत घेतो; ( पण ) त्याचा हात भाजतो आणि मग त्याला मारतात. १. त्यानें जर तें चौर्यकर्म केलें नसेल तर तो स्वतःला खरा करतो. अंतरामध्यें सत्य धारण करणारा तो सत्यप्रतिज्ञ तप्त परशु हातांत घेतो; त्याचा हात भाजत नाहीं आणि मग त्याला सोडून देतात. २. त्याचा

तत्त्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ३ ॥ इति षोडशः खण्डः ॥ १६ ॥ इति षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

## अथ सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

ॐ ॥ अधीहि भगव इति होपससाद सनत्कुमारं नारदस्तꣳ होवाच यद्वेत्थ तेन मोपसीद ततस्त ऊर्ध्वं

सत्स्वरूप होत ज्याप्रमाणें भाजत नाहीं त्याप्रमाणें सत्स्वरूपा मनुष्य मरणानंतर ( पुन्हां जन्म न पावतां ) सत्स्वरूप होतो. तें सत् या सर्वांचा आत्मा आहे. तें सत्य आहे. तोच आत्मा आहे. श्वेतकेतो, तो तूं आहेस. ( याप्रमाणें ) पित्यानें सांगितलेलें सत्स्वरूपाचें ज्ञान श्वेतकेतु जाणता झाला. ३. इति षोडशः खंडः ॥ १६ ॥

इति षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

## अध्याय सातवा.

" हे भगवन्, मला ज्ञान सांगा " असें ( देवर्षि ) नारद सनत्कुमाराकडे येऊन ह्मणाला. सनत्कुमार ह्मणाले, तुला

वक्ष्यामीति स होवाच ॥१॥ ऋग्वेदं भगवोऽध्येमि यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यामेतद्भगवोऽध्येमि ॥ २ ॥ सोऽहं भगवो मन्त्रविदेवास्मि नाऽत्मविच्छ्रुतꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्यस्त-

अगोदर किती ज्ञान प्राप्त झालेलें आहे तें मला सांग. ह्मणजे त्याच्या पुढचें मी तुला सांगेन. १. नारद ह्मणाला, हे भगवन्, मीं ऋग्वेदाचें अध्ययन केलें आहे. तसेंच यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा (भारतादि) इतिहासपुराण, व्याकरण [=वेदांचा वेद ], श्राद्धकल्प, गणित [ राशिं ], उत्पादकांचें ज्ञान [ दैवं ], महाकालादिशास्त्र [ निधिं ], तर्कशास्त्र [ वाकोवाक्यं ], नीतिशास्त्र [ एकायनं ], निरुक्त [ देवविद्या], ऋग्वेदादि वेदविद्या [ ब्रह्मविद्या ], भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या आणि नृत्यगीतवाद्यशिल्पादि विद्या यांचें मीं अध्ययन केलें आहे. २. भगवन्, तथापि मी केवळ

राति शोकमात्मविदिति सोऽहं भगवः शोचामि तं मा भगवाञ्छोकस्य पारं तारयत्विति तꣳ होवाच यद्वै किंचै-तदध्यगीष्ठा नामैवैतत् ॥ ३ ॥ नाम वा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेद आथर्वणश्चतुर्थ इतिहासपुराणः पञ्चमो वेदानां वेदः पित्र्यो राशिर्दैवो निधिर्वाकोवाक्यमेकायनं देव-विद्या ब्रह्मविद्या भूतविद्या क्षत्रविद्या नक्षत्रविद्या सर्पदे-वजनविद्या नामैवैतन्नामोपास्स्वेति ॥ ४ ॥ स यो नाम

शब्दार्थ मात्र जाणणारा आहें; मला आत्मज्ञान झालें नाहीं. "आत्मज्ञानी मनस्तापाच्या [ शोकाच्या ] पलीकडे जातो " असें मीं आपणांसारख्या थोर पुरुषांकडून ऐकलें आहे. हे भगवन्, पण माझें मन ताप पावत आहे. करितां आपण मला शोकाच्या पैलतीरीं न्या. सनत्कुमार ह्मणाले, तुला जें ज्ञान झालें आहे तें केवळ नाममात्र आहे. ३. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण श्राद्धकल्प, गणित, उत्पातादि ज्ञान, निधि, तर्कशास्त्र, नीति-शास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्प-

ब्रह्मेत्युपास्ते यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो नाम ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो नाम्नो भूय इति नाम्नो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ५ ॥ इति प्रथमः खण्डः ॥ १ ॥

वाग्वाव नाम्नो भूयसी वाग्वा ऋग्वेदं विज्ञापयति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं

विद्या, ललितविद्या हें सर्व ज्ञान नाममात्र आहे. या सर्व नामाची ब्रह्मबुद्धीनें उपासना कर. ४. जो या नामब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत या नामाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, नामाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, नामाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. ५. इति प्रथमः खंडः ॥ १ ॥

नामाहून अधिक वाणी आहे. वाणी ऋग्वेदाचें ज्ञान करून देते. यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्व, पांचवा इतिहासपुराण,

देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवाꣳश्च मनुष्याꣳश्च पशूꣳश्च वयाꣳसि च तृणवनस्पतीञ्छ्वापदान्याकीटपतङ्गपिपीलकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं च यद्वै वाङ्नाभविष्यन्न धर्मो नाधर्मो व्यज्ञापयिष्यन्न सत्यं नानृतं न साधु नासाधु न हृदयज्ञो नाहृदयज्ञो वागेवैतत्सर्वं वि-

व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, दैव, निधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या, ललितविद्या, स्वर्ग, पृथिवी, वायु, आकाश, उदक, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पती, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें, धर्म, अधर्म, सत्य, असत्य, साधु, असाधु, हृदयाला प्रिय, हृदयाला अप्रिय, इत्यादि या सर्वांचें वाणी ज्ञान करून देते. जर वाणी नसती तर धर्म- अधर्म, सत्य–असत्य साधु–असाधु, हृदयप्रिय--हृदयाप्रिय यांचें ज्ञान झालें नसतें. या सर्वांचें ज्ञान वाणीच करून देते. ह्मणून वाणीची उपासना

ज्ञापयति वाचमुपास्स्वेति ॥ १ ॥ स यो वाचं ब्रह्मेत्युपास्ते यावद्वाचो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो वाचं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो वाचो भूय इति वाचो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

मनो वाव वाचो भूयो यथा वै द्वे वामलके द्वे वा कोले द्वौ वाक्षौ मुष्टिरनुभवत्येवं वाचं च नाम च मनोऽनुभवति स यदा मनसा मनस्यति मन्त्रानधीयीयेत्यथाधीते

कर. १. जो या वाणीरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत वाणीची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, वाणीहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, वाणीहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति द्वितीयः खंडः ॥ २ ॥

वाणीहून अधिक मन आहे. ज्याप्रमाणें दोन आंवळे, दोन बोरें अथवा दोन मणी मुठीमध्यें रहातात त्याप्रमाणें

कर्माणि कुर्वीयेत्यथ कुरुते पुत्राꣳश्च पशूꣳश्चेच्छेयेत्यथेच्छत इमं च लोकममुं चेच्छेयेत्यथेच्छते मनो ह्यात्मा मनो हि लोको मनो हि ब्रह्म मन उपास्स्वेति ॥ १ ॥ स यो मनो ब्रह्मेत्युपास्ते यावन्मनसो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो मनो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो

वाणी आणि मन हीं दोन्ही मनामध्यें रहातात. "मी मंत्रांचा उच्चार करतों" असें जेव्हां मनुष्याच्या मनांत येतें तेव्हां तो मंत्रांचा उच्चार करूं लागतो. "मी कर्में करतों" असें मनांत येतें तेव्हां तो कर्में करूं लागतो. "मला पुत्र, पशु, इत्यादि प्राप्त व्हावे" अशी मनानें इच्छा करतो तेव्हां तो त्यांच्या प्राप्तीचा उद्योग करतो व त्यांची त्याला प्राप्ति होते. "हा लोक आणि परलोक प्राप्त व्हावे" अशी मनानें इच्छा करतो तेव्हां त्याला ते प्राप्त होतात. (सारांश,) मन हाच आत्मा आहे, मन लोक आहे, मन ब्रह्म आहे. ह्मणून मनाची उपासना कर. १. जो या मनोरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत

मनसो भूय इति मनसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्र-वीत्विति ॥ २ ॥ इति तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

संकल्पो वाव मनसो भूयान्यदा वै संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि मन्त्रा एकं भवन्ति मन्त्रेषु कर्माणि ॥ १ ॥ तानि ह वा एतानि संकल्पैकायनानि संकल्पात्मकानि संकल्पे प्रतिष्ठितानि सम-

मनाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, मनाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, मनाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति तृतीयः खंडः ॥३॥

मनाहून अधिक संकल्प आहे. जेव्हां मनुष्य संकल्प करतो तेव्हां त्याच्या मनांत जे विचार येतात, ते विचार तो वाणीनें प्रकट करतो, त्यांना नांव देतो, त्या नांवामध्यें मंत्र [ शब्द ] एकत्र होतात. मंत्रांमध्यें [ = शब्दांमध्यें ] कर्मांचा अंतर्भाव होतो ( ह्मणजे मंत्रांचे योगानें कर्में होतात ). १. या ( मन आदि ) सर्वांचा संकल्पामध्यें अंतर्भाव होतो. हीं सर्व

क्लृप्तां द्यावापृथिवी समकल्पेतां वायुश्चाकाशं च समकल्पन्तापश्च तेजश्च तेषाꣳ संक्लृप्त्यै वर्षꣳ संकल्पते वर्षस्य संक्लृप्त्या अन्नꣳ संकल्पतेऽन्नस्य संक्लृप्त्यै प्राणाः संकल्पन्ते प्राणानाꣳ संक्लृप्त्यै मन्त्राः संकल्पन्ते मन्त्राणाꣳ संक्लृप्त्यै कर्माणि संकल्पन्ते कर्मणाꣳ संक्लृप्त्यै लोकः संकल्पते लोकस्य संक्लृप्त्यै सर्वꣳ संकल्पते स एष संकल्पः संकल्पमुपास्स्वेति ॥ २ ॥ स यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्ते

संकल्परूप आहेत. संकल्पामध्यें स्थित आहेत. स्वर्ग व पृथिवी यांनीं जणूं काय संकल्पच केला आहे. वायु व आकाश यांनीं संकल्प केला आहे. उदक व तेज यांनीं संकल्प केला आहे. त्यांच्या संकल्पामुळेंच वृष्टि उत्पन्न होते. वृष्टीमुळें अन्न होतें. अन्नामुळें प्राण होतात. प्राणांमुळें मंत्र होतात. मंत्रांमुळें कर्मे होतात. कर्मांमुळें कर्मफल [ =लोक ] होतें. कर्मफलामुळें सर्व होतें. अशा प्रकारचा हा संकल्प आहे. ह्मणून संकल्पाची उपासना कर. २. जो या संकल्परूपी ब्रह्माची उपासना करतो तो स्वतः ध्रुव [ शाश्वत ],

क्लृप्तान्वै स लोकान् ध्रुवान् ध्रुवः प्रतिष्ठितान् प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिध्यति यावत्संकल्पस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवः संकल्पाद्भूय इति संकल्पाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ३ ॥ इति चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

चित्तं वाव संकल्पाद्भूयो यदा वै चेतयतेऽथ संकल्पयतेऽथ मनस्यत्यथ वाचमीरयति तामु नाम्नीरयति नाम्नि

प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित असे लोक पावतो. जेथपर्यंत संकल्पाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, संकल्पाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, संकल्पाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. ३. इति चतुर्थः खंडः ॥४॥

संकल्पाहून अधिक चित्त आहे. जेव्हां मनुष्याला चैतन्य उत्पन्न होतें तेव्हां तो संकल्प करतो, त्याच्या मनांत विचार

मन्त्रा एकं भवन्ति मन्त्रेषु कर्माणि ॥ १ ॥ तानि ह वा एतानि चित्तैकायनानि चित्तात्मानि चित्ते प्रतिष्ठितानि तस्माद्यद्यपि बहुविदचित्तो भवति नायमस्तीत्येवैनमाहुर्यदयं वेद यद्वा अयं विद्वान्नेत्थमचित्तः स्यादित्यथ यद्यल्पविच्चित्तवान्भवति तस्मा एवोत शुश्रूषन्ते चित्तꣳ ह्येवैषामेकायनं चित्तमात्मा चित्तं प्रतिष्ठा चित्तमुपास्स्वेति

येतात. ते विचार तो वाणीनें प्रकट करतो, त्यांना नांव देतो, त्या नांवामध्यें मंत्र एकत्र होतात. मंत्रांमध्यें कर्मांचा अंतर्भाव होतो. १. या ( मन आदि ) सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव होतो. हीं सर्व चित्तरूप आहेत. चित्तामध्यें स्थित आहेत. ह्मणून कोणी मनुष्य पुष्कळ ज्ञानी असला तरी तो जर चित्तरहित असेल तर त्याचें तें सर्व ज्ञान नाहीं असें ह्मणतात. कारण, जर याला ज्ञान असतें तर हा चित्तरहित कसा असता ? पण अल्पज्ञ असून चित्तयुक्त असेल तर त्याजपासून त्याचें ज्ञान श्रवण करण्याची लोक इच्छा करतात. ह्मणून या ( मन आदि ) सर्वांचा चित्तामध्यें अंतर्भाव आहे. चित्त हा

॥ २ ॥ स यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्ते चित्तान्वै स लोकान् ध्रुवान् ध्रुवः प्रतिष्ठितान् प्रतिष्ठितोऽव्यथमानानव्यथमानोऽभिसिद्ध्यति यावच्चित्तस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यश्चित्तं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवश्चित्ताद्भूय इति चित्ताद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ ३ ॥ इति पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

ध्यानं वाव चित्ताद्भूयो ध्यायतीव पृथिवी ध्यायती-

आत्मा आहे, चित्त स्थान आहे. चित्ताची उपासना कर. २. जो या चित्तरूपी ब्रह्माची उपासना करतो तो स्वतः ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित होत्साता ध्रुव, प्रतिष्ठायुक्त व व्यथारहित असे लोक पावतो. जेथपर्यंत चित्ताची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, चित्ताहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, चित्ताहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. ३. इति पंचमः खंडः ॥ ५ ॥

चित्ताहून अधिक ध्यान आहे. पृथिवी जणूं काय ध्यान करते.

वान्तरिक्षं ध्यायतीव द्यौर्ध्यायन्तीवापो ध्यायन्तीव पर्वता ध्यायन्तीव देवमनुष्यास्तस्माद्य इह मनुष्याणां महत्तां प्राप्नुवन्ति ध्यानापादांशा इवैव ते भवन्त्यथ येऽल्पाः कलहिनः पिशुना उपवादिनस्तेऽथ ये प्रभवो ध्यानापादांशा इवैव ते भवन्ति ध्यानमुपास्स्वेति ॥ १ ॥ स यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्ते यावद्ध्यानस्य गतं तत्रास्य यथा-

अंतरिक्ष जणूं काय ध्यान करतें. स्वर्ग जणूं काय ध्यान करतो. उदक जणूं काय ध्यान करतें. पर्वत जणूं काय ध्यान करतात. देव व मनुष्य जणूं काय ध्यान करतात. ह्मणून या लोकीं जे मनुष्यांमध्यें महत्त्व पावतात ते आपल्या ध्यानाच्या फलाचाच अंश उपभोगीत आहेत असें समजावें. ज्यांना ध्यान नसतें ते कलहप्रिय, परदोष परोक्ष आणि प्रत्यक्ष सांगणारे असे ( क्षुद्र ) होतात. जे ऐश्वर्ययुक्त असतात ते आपल्या ध्यानाच्या फलाचा अंश उपभोगतात. ह्मणून ध्यानाची उपासना कर. १. जो या ध्यानरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत ध्यानाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां

कामचारो भवति यो ध्यानं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो ध्यानाद्भूय इति ध्यानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

विज्ञानं वाव ध्यानाद्भूयो विज्ञानेन वा ऋग्वेदं विजानाति यजुर्वेदꣳ सामवेदमाथर्वणं चतुर्थमितिहासपुराणं पञ्चमं वेदानां वेदं पित्र्यꣳ राशिं दैवं निधिं वाकोवाक्यमेकायनं देवविद्यां ब्रह्मविद्यां भूतविद्यां क्षत्रविद्यां नक्षत्रविद्याꣳ

येतो. नारद ह्मणाला, भगवन्, ध्यानाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, ध्यानाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, ते आपण मला सांगा. २. इति षष्ठः खंडः ॥ ६ ॥

ध्यानाहून अधिक विज्ञान [ =शास्त्रार्थविषयज्ञान ] आहे. विज्ञानाचे योगानें मनुष्याला ऋग्वेदाचें ज्ञान होतें. यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्व, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, दैव, निधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या,

सर्पदेवजनविद्यां दिवं च पृथिवीं च वायुं चाकाशं चापश्च तेजश्च देवाꣳश्च मनुष्याꣳश्च पशूꣳश्च वयाꣳसि च तृणवनस्पतीञ्छ्वापदान्याकीटपतङ्गपिपीलकं धर्मं चाधर्मं च सत्यं चानृतं च साधु चासाधु च हृदयज्ञं चाहृदयज्ञं चान्नं च रसं चेमं च लोकममुं च विज्ञानेनैव विजानाति विज्ञानमुपास्स्वेति ॥ १ ॥ स यो विज्ञानं ब्रह्मेत्युपास्ते विज्ञानवतो वै स लोकाञ्ज्ञानवतोऽभिसिद्ध्यति यावद्विज्ञानस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यो विज्ञानं

ललितविद्या, स्वर्ग, पृथिवी, वायु, आकाश, उदक, तेज, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे–पतंग· पिपीलिकादि सर्व श्वापदें, धर्म, अधर्म, सत्य, असत्य, साधु, असाधु, हृदयाला प्रिय, हृदयाला अप्रिय, अन्न, रस, इह-लोक, परलोक या सर्वांचें ज्ञान विज्ञानाचेच योगानें होतें. ह्मणून विज्ञानाची उपासना कर. १. जो या विज्ञानरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला विज्ञानयुक्त व ज्ञानयुक्त लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत विज्ञानाची गति आहे तेथपर्यंत

ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो विज्ञानाद्भूय इति विज्ञानाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

बलं वाव विज्ञानाद्भूयोऽपि ह शतं विज्ञानवतामेको बलवानाकम्पयते स यदा बली भवत्यथोत्थाता भवत्युत्तिष्ठन्परिचरिता भवति परिचरन्नुपसत्ता भवत्युपसीदन्द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता

त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, विज्ञानाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, विज्ञानाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति सप्तमः खंडः ॥ ७ ॥

विज्ञानाहून अधिक बल आहे. शंभर विज्ञानयुक्त मनुष्यांना देखील एक बलवान् मनुष्य कंप पावण्यास लावतो. मनुष्य जेव्हां बलवान् असतो तेव्हां तो उठून उभा रहातो, उभा राहून ( गुरूच्या समीप जाऊन गुरूची ) सेवा करतो. सेवा केल्यावर गुरूला प्रिय होतो, प्रिय झाला ह्मणजे तो द्रष्टा

भवति विज्ञाता भवति बलेन वै पृथिवी तिष्ठति बलेना-
न्तरिक्षं बलेन द्यौर्बलेन पर्वता बलेन देवमनुष्या बलेन
पशवश्च वयांसि च तृणवनस्पतयः श्वापदान्याकी-
टपतङ्गपिपीलकं बलेन लोकस्तिष्ठति बलमुपास्स्वेति ॥१॥
स यो बलं ब्रह्मेत्युपास्ते यावद्बलस्य गतं तत्रास्य
यथाकामचारो भवति यो बलं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवो
बलाद्भूय इति बलाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति

होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. बलाचे योगानें पृथिवी स्थित आहे; अंतरिक्ष, स्वर्ग, पर्वत, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व स्थित आहेत. बलानें लोक स्थित आहे. ह्मणून बलाची उपासना कर. १. जो या बलरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला जेथपर्यंत बलाची गति आहे तेथपर्यंत संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, बलाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, बलाहून अधिक आहे.

॥ २ ॥ इत्यष्टमः खण्डः ॥ ८ ॥

अन्नं वाव बलाद्भूयस्तस्माद्यद्यपि दश रात्रीर्नाश्नीयाद्यद्यु ह जीवेदथवाऽद्रष्टाऽश्रोताऽमन्ताऽबोद्धाऽकर्ताऽविज्ञाता भवत्यथाऽन्नस्यायै द्रष्टा भवति श्रोता भवति मन्ता भवति बोद्धा भवति कर्ता भवति विज्ञाता भवत्यन्नमुपास्स्वेति ॥ १ ॥ स योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽन्नवतो वै स लोकान्पानवतोऽभिसिद्ध्यति यावदन्नस्य गतं तत्रास्य यथाकामचारो

नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति अष्टमः खंडः ॥ ८ ॥

बलाहून अधिक अन्न आहे. सतत दहा दिवसपर्यंत अन्न खाल्लें नाहीं तर मनुष्य जर कदाचित् जिवंत राहिला तर तो अद्रष्टा, अश्रोता, मननरहित, ज्ञानरहित, कर्तृत्वरहित, विज्ञानरहित होतो. ज्याला अन्नाची प्राप्ति होते तोच द्रष्टा होतो, श्रोता होतो, मननशील होतो, ज्ञानी होतो, कर्ता होतो, विज्ञानयुक्त होतो. ह्मणून अन्नाची उपासना कर. १. जो या अन्नरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला अन्नानें व

भवति योऽन्नं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवोऽन्नाद्भूय इत्यन्ना-द्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति नवमः खण्डः ॥ ९ ॥

आपो वावान्नाद्भूयस्तस्माद्यदा सुवृष्टिर्न भवति व्याधी-यन्ते प्राणा अन्नं कनीयो भविष्यतीत्यथ यदा सुवृष्टिर्भ-वत्यानन्दिनः प्राणा भवन्त्यन्नं बहु भविष्यतीत्याप एवेमा मूर्ता येयं पृथिवी यदन्तरिक्षं यद् द्यौर्यत्पर्वता यद्देवम-

उदकानें युक्त अशा लोकांची प्राप्ति होते. जेथपर्यंत अन्नाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, अन्नाहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, अन्नाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति नवमः खंडः ॥ ९ ॥

अन्नाहून अधिक उदक आहे. कारण जर वृष्टि झाली नाहीं तर (यंदां) अन्न कमी होईल ह्मणून प्राणी दुःखित होतात. जेव्हां सुवृष्टि होते तेव्हां अन्न पुष्कळ होईल ह्मणून

नुष्या यत्पशवश्च वयाꣳसि च तृणवनस्पतयः श्वापदा-
न्याकीटपतङ्गपिपीलकमाप एवेमा मूर्ता अप उपास्स्वेति
॥ १ ॥ स योऽपो ब्रह्मेत्युपास्त आप्नोति सर्वान्कामाꣳ-
स्तृप्तिमान्भवति यावदपां गतं तत्रास्य यथाकामचारो
भवति योऽपो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवोऽद्भ्यो भूय इत्यद्भ्यो
वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति
दशमः खण्डः ॥ १० ॥

प्राणी आनंदयुक्त होतात. ही पृथिवी, अंतरिक्ष, स्वर्ग, पर्वत, देव, मनुष्य, पशु, पक्षी, गवत, वनस्पति, किडे–पतंग–पिपीलिकादि सर्व श्वापदें हीं सर्व मूर्तिमंत उदक होत. ह्मणून उदकाची उपासना कर. १. जो या उदकरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला सर्व मनोरथ प्राप्त होतात. त्याची तृप्ति होते. जेथपर्यंत उदकाची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, उदकाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, उदकाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला

तेजो वावाद्भ्यो भूयस्तद्वा एतद्वायुमागृह्याकाशमभितपति तदाहुर्निशोचति नितपति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं दर्शयित्वाऽथापः सृजते तदेतदूर्ध्वाभिश्च तिरश्चीभिश्च विद्युद्भिराह्रादाश्चरन्ति तस्मादाहुर्विद्योतते स्तनयति वर्षिष्यति वा इति तेज एव तत्पूर्वं दर्शयित्वाऽथापः सृजते तेज उपास्स्वेति ॥ १ ॥ स यस्तेजो ब्रह्मेत्युपास्ते

सांगा. २. इति दशमः खंडः ॥ १० ॥

उदकाहून अधिक तेज आहे. तें तेज वायूला घेऊन आकाश व्यापतें व तप्त करतें. तेव्हां "उष्मा होत आहे, घाम येत आहे, आतां वृष्टि होईल" असें लोक ह्मणतात. अगोदर तेज (वृष्टीची) सूचना करतें व नंतर उदक वर्षाव करतें. ऊर्ध्वमुख, वांकड्या व आवाज करणाऱ्या अशा विजांनीं उदक आकाशांत संचार करतें. ह्मणून, वीज दिसत आहे, गडगडत आहे, वर्षाव होत आहे असें ह्मणतात. याप्रमाणें तेजानेंच वृष्टीची सूचना दर्शविल्यावर उदक वृष्टि करतें. ह्मणून तेजाची उपासना कर. १. जो या तेजोरूपी

तेजस्वी वै स तेजस्वतो लोकान्भास्वतोऽपहततमस्का-
नाभिसिध्यति यावत्तेजसो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यस्तेजो ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवस्तेजसो भूय इति तेजसो वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इत्येकादशः खण्डः ॥ ११ ॥

आकाशो वाव तेजसो भूयानाकाशे वै सूर्याचन्द्रमसा-वुभौ विद्युन्नक्षत्राण्यग्निराकाशेनाह्वयत्याकाशेन शृणोत्याका-

ब्रह्माची उपासना करतो तो तेजस्वी होतो. त्याला तेजस्वी, प्रभासंपन्न, अंधकाररहित असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत तेजाची गति असते तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, तेजाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, तेजाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति एकादशः खण्डः ॥ ११ ॥

तेजाहून अधिक आकाश आहे. सूर्य, चंद्र, वीज, नक्षत्रें, अग्नि हीं सर्व आकाशामध्येंच आहेत. आकाशामुळें मनुष्य

शेन प्रतिशृणोत्याकाशे रमत आकाशे न रमत आकाशे जायत आकाशमभिजायत आकाशमुपास्स्वेति ॥ १ ॥ स य आकाशं ब्रह्मेत्युपास्त आकाशवतो वै स लोकान्प्रकाशवतोऽसंबाधानुरुगायवतोऽभिसिध्यति यावदाकाशस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति य आकाशं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आकाशाद्भूय इत्याकाशाद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति द्वादशः खण्डः

हांक मारतो, आकाशामुळें ऐकतो, आकाशामुळें (दुसरा त्याला) उत्तर देतो, आकाशामध्यें मनुष्य रममाण होतो, आकाशामध्यें दुःखी होतो. आकाशामध्यें व आकाशामुळें सर्व उत्पन्न होतें. ह्मणून आकाशाची उपासना कर. १. जो या आकाशरूपी ब्रह्माची उपासना करतो त्याला विस्तृत, प्रकाशयुक्त, पीडारहित व विस्तीर्णगति असे लोक प्राप्त होतात. जेथपर्यंत आकाशाची गति असते तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, आकाशाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, आकाशाहून

स्मरो वावाकाशाद्भूयस्तस्माद्यद्यपि बहव आसीरन्न स्मरन्तो नैव ते कंचन शृणुयुर्न मन्वीरन्न विजानीरन्यदा वाव ते स्मरेयुरथ शृणुयुरथ मन्वीरन्नथ विजानीरन्स्मरेण वै पुत्रान्विजानाति स्मरेण पशून् स्मरमुपास्स्वेति ॥ १ ॥ स यः स्मरं ब्रह्मेत्युपास्ते याव-

अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

आकाशाहून अधिक स्मरण आहे. पुष्कळ मनुष्य जरी ( एकत्र ) बसले असले पण त्यांना स्मरण नसेल तर त्यांपैकीं कोणाचें कोणाला ऐकू येणार नाहीं, कोणी मनन करणार नाहीं, कोणी विचार करणार नाहीं. जेव्हां त्यांना स्मरण करतां येईल तेव्हांच त्यांना ऐकू येईल, मनन करतां येईल, विचार करतां येईल. स्मरणानेंच मनुष्य आपल्या पुत्रांना ओळखतो, पशूंना ओळखतो. ह्मणून स्मरणाची उपासना कर. १. जो या स्मरणरूपी ब्रह्माची उपासना करतो, त्याला जेथपर्यंत स्मरणाची गति असते तेथपर्यंत संचार

त्स्मरस्य गतं तत्रास्य यथाकामचारो भवति यः स्मरं ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगवः स्मराद्भूय इति स्मराद्वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति ॥ २ ॥ इति त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

आशा वाव स्मराद्भूयस्याशेद्धो वै स्मरो मंत्रानधीते कर्माणि कुरुते पुत्रा१ंश्च पशू१ंश्चेच्छत इमं च लोकममुं चेच्छत आशामुपास्स्वेति ॥ १ ॥ स य आशां ब्रह्मेत्युपास्त आशयास्य सर्वे कामाः समृद्ध्यन्त्यमोघा

करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, स्मरणाहून अधिक कांहीं आहे काय ? सनत्कुमार ह्मणाले, होय, स्मरणाहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति त्रयोदश खंडः ॥ १३ ॥

स्मरणाहून अधिक आशा आहे. आशेनें प्रेरित होऊन मनुष्य मंत्रांचें अध्ययन करतो, कर्म करतो, पुत्र-पशु इत्यादिकांची इच्छा करतो, इहलोकाची आणि परलोकाची इच्छा करतो. ह्मणून आशेची उपासना कर. १. जो या आशारूपी

ह्यस्याशिषो भवन्ति यावदाशाया गतं तत्रास्य यथाकाम-
चारो भवति य आशां ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति भगव आशाया
भूय इत्याशाया वाव भूयोऽस्तीति तन्मे भगवान्ब्रवीत्विति
॥ २ ॥ इति चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

प्राणो वा आशाया भूयान्यथा वा अरा नाभौ सम-
र्पिता एवमस्मिन् प्राणे सर्वꣳ समर्पितं प्राणः प्राणेन

ब्रह्माची उपासना करतो त्याचे सर्व मनोरथ आशेनें पूर्ण होतात. त्याच्या प्रार्थना फलदायी होतात. जेथपर्यंत आशेची गति आहे तेथपर्यंत त्याला संचार करतां येतो. नारद ह्मणाला, भगवन्, आशेहून अधिक कांहीं आहे काय? सनत्कुमार ह्मणाले, होय, आशेहून अधिक आहे. नारद ह्मणाला, भगवन्, तें आपण मला सांगा. २. इति चतुर्दशः खंडः ॥ १४ ॥

आशेहून अधिक प्राण आहे. ज्याप्रमाणें चक्राचे मध्य-भागीं अरा येऊन मिळालेल्या असतात त्याप्रमाणें हें सर्व कांहीं प्राणामध्यें येऊन मिळालें आहे. प्राण प्राणाचेच योगानें

याति प्राणः प्राणं ददाति प्राणाय ददाति प्राणो ह पिता प्राणो माता प्राणो भ्राता प्राणः स्वसा प्राण आचार्यः प्राणो ब्राह्मणः ॥ १ ॥ स यदि पितरं वा मातरं वा भ्रातरं वा स्वसारं वाचार्यं वा ब्राह्मणं वा किंचिद् भृशमिव प्रत्याह धिक्त्वाऽस्त्वित्येवैनमाहुः पितृहा वै त्वमसि मातृहा वै त्वमसि भ्रातृहा वै त्वमसि स्वसृहा वै त्वमस्याचार्यहा वै त्वमसि ब्राह्मणहा वै त्वमसीति ॥ २ ॥ अथ यद्यप्येनानुत्क्रान्तप्राणान् शूलेन समासं व्यतिषंदहेन्नैवैनं ब्रूयुः

[ =दुसऱ्यावर अवलंबून न रहातां ] गमन करतो, प्राण प्राणच देतो, प्राणालाच देतो, प्राणच पिता, माता, भ्राता, भगिनी, आचार्य, ब्राह्मण हीं सर्व कांहीं आहे. १. जर कोणी पिता, माता, बंधु, भगिनी, आचार्य अथवा ब्राह्मण यांपैकीं कोणाला अयोग्य भाषण बोलला तर त्याला लोक "तुला धिक्कार असो" असें ह्मणतात. "तूं पितृघ्न, मातृघ्न, भ्रातृघ्न, स्वसृघ्न, आचार्यघ्न आणि ब्राह्मणघ्न आहेस" असें ह्मणतात. २. (पण) पिता इत्यादि मरण पावले ह्मणजे

लम्बरस्य खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स चन्द्रमसमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा दुन्दुभेः खं तेन स ऊर्ध्व आक्रमते स लोकमागच्छत्यशोकमहिमं तस्मिन्वसति शाश्वतीः समाः ॥ १ ॥ इति दशमं ब्राह्मणम् ॥ १० ॥

एतद्वै परमं तपो यद्व्याहितस्तप्यते परमꣳ हैव लोकं जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमरण्यꣳ हरन्ति

तो वर आदित्यलोकाप्रत जातो. लंबरनामक वाद्याचें छिद्र जेवढें असतें तेवढ्या परिमाणाचें द्वार त्याला आदित्य करून देतो. त्यामधून तो चंद्रलोकाप्रत जातो. दुंदुभीचें छिद्र जेवढें ( सूक्ष्म ) असतें तेवढ्या परिमाणाचें द्वार त्याला चंद्रमा करून देतो. त्यामधून तो शोकरहित व शारीरदुःखरहित अशा लोकाप्रत जातो. तेथें तो अनेक नित्य संवत्सरें [= कल्प ] पर्यंत रहातो. १. इति दशमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

व्याधिग्रस्त मनुष्य जो ताप पावतो [ जितकें दुःख होतें] तें परम तप होय. हें जो जाणतो [ इतक्या दुःखाची

परम१ँ हैव लोकं जयति य एवं वेदैतद्वै परमं तपो यं प्रेतमग्नावभ्यादधाति परम१ँ हैव लोकं जयति य एवं वेद ॥ १ ॥ इति एकादशं ब्राह्मणम् ॥ ११ ॥

अन्नं ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा पूयति वा अन्नमृते प्राणात्प्राणो ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा शुष्यति वै प्राण ऋतेऽन्नादेते ह त्वेव देवते एकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतस्तद्ध स्माह प्रातृदः पितरं कि१ँ स्विदेवैवं विदुषे साधु

कल्पना करतो ] त्याला परम लोकाची प्राप्ति होते. मरण पावल्यावर अरण्यामध्यें नेतात तेंहि परम तप होय. हें जो जाणतो त्याला परम लोक प्राप्त होतो. प्रेताला अग्नीमध्यें ठेवतात तेंहि परम तप होय. हें जो जाणतो त्याला परम लोक प्राप्त होतो. १. इति एकादशं ब्राह्मणम् ॥ ११ ॥

अन्न हेंच ब्रह्म असें कोणी ह्मणतात पण तें बरोबर नाहीं. कारण प्राण नसेल तर अन्नाचा पू होतो. प्राण हेंच ब्रह्म असें कोणी ह्मणतात पण तें बरोबर नाहीं. कारण अन्न नसेल तर प्राण शुष्क होतो. या दोन्ही देवता मिळून ब्रह्म होय. असा

कुर्यां किमेवास्मा असाधु कुर्यामिति स ह स्माह पाणिना मा प्रातृद कस्त्वेनयोरेकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतीति तस्मा उ हैतदुवाच वीत्यन्नं वै वि अन्ने हीमानि सर्वाणि भूतानि विष्टानि रामिति प्राणो वै रं प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि रमन्ते सर्वाणि ह वा अस्मिन्भूतानि विशन्ति सर्वाणि भूतानि रमन्ते य एवं वेद ॥ १ ॥ इति द्वादशं ब्राह्मणम् ॥ १२ ॥

विचार करून प्रातृद नांवाचा ऋषि आपल्या पित्याला ह्मणाला, हें ज्ञान मजप्रमाणेंच जो जाणत असेल त्याचें पूजन मीं कसें करावें ? [ कारण तो सर्व जाणतोच आहे; त्याला अधिक ज्ञान काय द्यावयाचें ? ] अथवा अपूजन तरी काय करावें ? पिता हातानें खूण करून ह्मणाला, प्रातृदा, असें बोलूं नकोस. अन्न व प्राण एकत्र झाल्यानें कोण मनुष्य ब्रह्मा-प्रत जातो ? [ पुत्राला सांगतां आलें नाहीं ]. वि ह्मणजे अन्न. कारण अन्नामध्यें हीं सर्व भूतें स्थित [ विष्ट ] आहेत. र ह्मणजे प्राण. कारण प्राणाचे ठिकाणीं सर्व भूतें रममाण

उक्थं प्राणो वा उक्थं प्राणो हीद५ सर्वमुत्थापयत्यु- द्धास्मादुक्थविद्वीरस्तिष्ठत्युक्थस्य सायुज्य५ सलोकतां जयति य एवं वेद ॥ १ ॥ यजुः प्राणो वै यजुः प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि युज्यन्ते युज्यन्ते हास्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय यजुषः सायुज्य५ सलोकतां जयति य एवं वेद

होतात. हें जो जाणतो त्याच्या ठिकाणीं सर्व भूतें रममाण होतात व सर्व भूतें प्रवेश करतात. १. इति द्वादशं ब्राह्मणम् ॥ १२ ॥

( यज्ञांत प्रधान अशा ) उक्थाची उपासना करावी. प्राण हेंच उक्थ होय. कारण प्राण हें सर्व उभें करतो [ उत्थाप यति इति उक्थं ]. हें जाणणाऱ्या मनुष्याला प्राणावित् वीर पुत्र होतो. हें जो जाणतो त्याला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होते. १. यजु या रूपानें प्राणाची उपास- ना करावी. प्राण हाच यजु आहे. कारण प्राणाचे ठिकाणीं हीं सर्व भूतें युक्त आहेत. हें जो जाणतो त्याला सर्व प्राणी श्रेष्ठ समजतात; त्याला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त

॥ २ ॥ साम प्राणो वै साम प्राणे हीमानि सर्वाणि भूतानि सम्यञ्चि सम्यञ्चि हास्मै सर्वाणि भूतानि श्रैष्ठ्याय कल्पन्ते साम्नः सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥ ३ ॥ क्षत्रं प्राणो वै क्षत्रं प्राणो हि वै क्षत्रं त्रायते हैनं प्राणः क्षणितोः प्र क्षत्रमत्रमाप्नोति क्षत्रस्य सायुज्यꣳ सलोकतां जयति य एवं वेद ॥ ४ ॥ इति त्रयोदशं ब्राह्मणम् ॥ १३ ॥

होते. २. साम या रूपानें प्राणाची उपासना करावी. प्राण हाच साम आहे. कारण प्राणाचे ठिकाणीं हीं सर्व भूतें एकत्र येतात. हें जाणणारा आपल्यांतला श्रेष्ठ असें कबूल करण्यास एकत्र जमतात; हें जाणणाराला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होतात. ३. क्षत्र या रूपानें प्राणाची उपासना करावी. प्राण हाच क्षत्र आहे. कारण प्राण या देहाला क्षतादिकांपासून ( पुन्हां तेथें मांस भरून ) तारतो. हें जो जाणतो त्याला प्राणाची सायुज्यता व सलोकता प्राप्त होतात. ४. इति त्रयोदशं ब्राह्मणम् ॥ १३ ॥

भूमिरन्तरिक्षं द्यौरित्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावदेषु त्रिषु लोकेषु तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ १ ॥ ऋचो यजूꣳषि सामानीत्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै पदमेतदु हैवास्या एतत्स यावतीयं त्रयी विद्या तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ २ ॥ प्राणोऽपानो व्यान इत्यष्टावक्षराण्यष्टाक्षरꣳ ह वा एकं गायत्र्यै

"भूमि, अंतरिक्ष, द्यौः" हीं आठ अक्षरें. [ द्यौःचीं दोन अक्षरें समजावयाचीं ]. गायत्रीचें पाहिलें पद आठ अक्षरांचें आहे. ( भूमि वगैरे ) हाच गायत्रीचा पाहिला भाग. गायत्रीचें हें ( त्रैलोक्यरूपी ) पद जो जाणतो तो त्रैलोक्यामध्यें मिळविण्यासारखें असेल तें सर्व मिळवितो. १. "ऋचो यजूंषि सामानि" हीं आठ अक्षरें. गायत्रीचें दुसरें पद आठ अक्षरांचें आहे. हाच गायत्रीचा दुसरा भाग. गायत्रीचें हें त्रयी विद्यारूपी पद जो जाणतो तो ही सर्व त्रयी विद्या मिळवितो. २. "प्राण, अपान, व्यान" हीं आठ अक्षरें, गाय-

पदमेतदु हैवास्या एतत्स यावादिदं प्राणि तावद्ध जयति योऽस्या एतदेवं पदं वेदाथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति यद्वै चतुर्थं तत्तुरीयं दर्शतं पदमिति ददृश इव ह्येष परोरजा इति सर्वमु ह्येवैष रज उपर्युपरि तपत्येवꣳ हैव श्रिया यशसा तपति योऽस्या एतदेवं पदं वेद ॥ ३ ॥ सैषा गायत्र्येतस्मिꣳस्तुरीये दर्शते पदे परोरजसि प्रतिष्ठिता तद्वै तत्सत्ये प्रतिष्ठितं

त्रीचें तिसरें पद आठ अक्षरांचें आहे. हाच गायत्रीचा तिसरा भाग. गायत्रीचें हें प्राणरूप पद जो जाणतो त्याला हें सर्व प्राणिजात वश होतें. ( आकाशांत ) हा जो तपन पावतो तो या मनुष्यांहून पलीकडे असलेला आदित्य तें स्पष्ट दिस-णारें [ दर्शतं ] चवथें पद होय. ‘ परोरज ’ यांत रज ह्मणजे हा लोक. या लोकाच्या वर ह्मणजे परोरज. कारण आदित्य वर तपन पावतो. हें चवथें पद जो जाणतो तो श्री व यश यांनीं प्रकाशित होतो. ३. ती ही गायत्री या चवथ्या दृश्य-मान व परोरज पदामध्यें स्थित आहे. तें पद सत्यामध्यें

चक्षुर्वै सत्यं चक्षुर्हि वै सत्यं तस्माद्यदिदानीं द्वौ विवद-
मानावेयातामहमदर्शमहमश्रौषमिति य एवं ब्रूयादहमदर्श-
मिति तस्मा एव श्रद्दध्याम तद्वै तत्सत्यं बले प्रतिष्ठितं
प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बलꣳ सत्या-
दोगीय इत्येवम्वेषा गायत्र्यध्यात्मं प्रतिष्ठिता सा हैषा
गयाꣳस्तत्रे प्राणा वै गयास्तत्प्राणाꣳस्तत्रे तद्यद्गयाꣳस्तत्रे
तस्माद्गायत्री नाम स यामेवामूꣳ सावित्रीमन्वाहैषैव सा स

स्थित आहे. चक्षु हें सत्य. चक्षु हें सत्य ह्मणून जेव्हां दोघे वाद करीत असतां एक जण ' मीं अमुक पाहिलें ' व दुसरा ' मीं अमुक ऐकलें ' असें ह्मणतो तेव्हां ' मीं अमुक पाहिलें' असें ह्मणणारावर आपण विश्वास ठेवतों. तें हें सत्य बलाचे ठिकाणीं स्थित आहे. बल ह्मणजे प्राण. तें प्राणाचे ठिकाणीं स्थित आहे. ह्मणून ह्मणतात, बल सत्यापेक्षां तेजस्वी आहे. याच न्यायानें गायत्री अध्यात्मरूपी प्राणाचे ठिकाणीं स्थित आहे. प्राण [ =इंद्रियें ] हे गय. तिनें इंद्रि-यांचें रक्षण केलें. गयांचें त्राण केलें ह्मणून ' गायत्री. '

यस्मा अन्वाह तस्य प्राणाꣳस्त्रायते ॥ ४ ॥ ताꣳहैतामेके सावित्रीमनुष्टुभमन्वाहुर्वागनुष्टुबेतद्वाचमनुब्रूम इति न तथा कुर्याद्गायत्रीमेव सावित्रीमनुब्रूयाद्यदि ह वा अप्येवंविद्बह्विव प्रतिगृह्णाति न हैव तद्गायत्र्या एकंचन पदं प्रति ॥ ५ ॥ स य इमाꣳस्त्रींल्लोकान्पूर्णान्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या

(उपनीत शिष्याला) आचार्य जेव्हां या सवितृदेवतात्मक गायत्रीचा उपदेश करतो तेव्हां तो त्याच्या प्राणांचेंच रक्षण करतो. ४. ही सावित्री [सवितृदेवतात्मक गायत्रीमंत्र] आपल्या शिष्यांना कोणी अनुष्टुभ् छंदांत सांगतात; कारण (त्यांचें मतें) वाक् अनुष्टुभ् आहे आणि (वाणी हीच शरीरांतील सरस्वती असल्यामुळें) वाणीला अनुसरून सावित्री सांगावी. पण असें करूं नये. गायत्री छंदांतच सावित्रीचा उपदेश करावा. गायत्री जाणणारानें इतर पुष्कळ ज्ञान कोणाकडून ग्रहण केलें तरी तें इतर ज्ञान गायत्रीच्या एका पादाच्याहि योग्यतेचें नाहीं. ५. हे (भू आदि) तीन लोक (सर्व ऐश्वर्यानें पूर्ण असे) गायत्री जाणणारानें दान घेतले

एतत्प्रथमं पदमाप्नुयादथ यावतीयं त्रयी विद्या यस्ताव-त्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतद्द्वितीयं पदमाप्नुयादथ यावदिदं प्राणि यस्तावत्प्रतिगृह्णीयात्सोऽस्या एतत्तृतीयं पदमाप्नुया-दथास्या एतदेव तुरीयं दर्शतं पदं परोरजा य एष तपति नैव केनचनाप्यं कुत उ एतावत्प्रतिगृह्णीयात् ॥ ६ ॥ तस्या उपस्थानं गायत्र्यस्येकपदी द्विपदी त्रिपदी चतुष्प-

[ प्रतिग्रह ] तर गायत्रीच्या एकपादज्ञानाचें फळ त्याला मिळालें असें होतें. [ ह्म० त्याचा दोष गायत्रीच्या एकपाद-ज्ञानानें जातो ]. त्रयी विद्येचा जो प्रतिग्रह घेईल त्याला गायत्रीच्या दुसऱ्या पादाचें फळ मिळालें असें होतें. जो या सर्व प्राणिमात्राचा प्रतिग्रह घेईल त्याला गायत्रीच्या तिसऱ्या पादाचें फळ मिळालें असें होतें. हा जो ( आदित्य ) तपन पावत आहे हा दृश्यमान व परोरज असा चवथा पाद होय. हा कोणालाहि मिळणें शक्य नाहीं. मग त्याचा प्रतिग्रह कोण घेणार ? ६. त्या गायत्रीचें उपस्थान [ = समीप जाऊन नमस्कार करणें ] पुढील मंत्रानें करावें—" गायत्र्यस्येक० "

द्यपदसि न हि पद्यसे । नमस्ते तुरीयाय दर्शताय पदाय परोरजसेऽसावदो मा प्रापदिति यं द्विष्यादसावस्मै कामो मा समृद्धीति वा न हैवास्मै स कामः समृध्यते यस्मा एवमुपतिष्ठतेऽहमदः प्रापमिति वा ॥७॥ एतद्ध वै तज्जनको वैदेहो बुडिलमाश्वतराश्विमुवाच यन्नु हो तद्गायत्री—

इत्यादि. अर्थ—तूं एकपद आहेस, द्विपद आहेस, त्रिपद आहेस, चतुष्पद आहेस. तथापि तूं पदरहित [=निरुपाधिक] आहेस. ह्मणून तुला जाणतां येत नाहीं. प्रत्यक्ष दिसणाऱ्या व परोरज अशा तुझ्या चवथ्या पदाला मी नमस्कार करतों. तुझ्या प्राप्तीला विघ्नरूप असा तो पापरूपी शत्रु मजप्रत न येवो. गायत्री जाणणाराचा जो द्वेष करील त्याचे काम कधीं पूर्ण करूं नकोस. याप्रमाणें उपस्थान केलें असतां शत्रूचें काम पूर्ण होत नाहींत व उपस्थान करणाराला ते काम प्राप्त होतात. ७. या गायत्रीज्ञानाविषयीं अशी आख्यायिका सांगतात—विदेह देशाचा राजा जनक अश्वतराच्या बुडिल नामक पुत्राला ह्मणाला, ‘मी गायत्रीविद्

विदब्रूथा अथ कथꣳ हस्तीभूतो वहसीति मुखꣳ ह्यस्याः सम्राण्न विदांचकारेति होवाच तस्या अग्निरेव मुखं यदि ह वा अपि बह्विवाग्नावभ्यादधति सर्वमेव तत् संदहत्येवꣳ हैवैवंविद्यद्यपि बह्विव पापं कुरुते सर्वमेव तत्संप्साय शुद्धः पूतोऽजरोऽमृतः संभवति ॥ ८ । इति चतुर्दशं ब्राह्मणम् ॥ १४ ॥

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् । तत्त्वं पूषन्न-

आहें ' असें तूं ह्मणालास, पण मग असा हत्ती होऊन (भार–) वाहक कसा झालास ? [ बुडिलाला प्रतिग्रहरूप दोषाच्या योगानें हत्तीचें रूप प्राप्त झालें होतें अशी आख्यायिका आहे ]. तो ह्मणाला, राजा, गायत्रीचें मुख मीं जाणलें नव्हतें ह्मणून. अग्नि हें तिचें मुख. ज्याप्रमाणें अग्नीमध्यें पुष्कळ ( इंधनादि ) टाकलें असतां तें सर्व दहन होतें त्याप्रमाणें गायत्रीविदानें बहुत पातक केलें तरी त्या सर्वांचें भक्षण होऊन पुनीत, जरारहित व मृत्युरहित असाच तो होतो. ८. इति चतुर्दशं ब्राह्मणम् ॥ १४ ॥

पावृणु सत्यधर्माय दृष्टये । पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह । तेजो यत्ते रूपं कल्याणतमं तत्ते पश्यामि । योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि । वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तꣳ शरीरम् । ॐ क्रतो स्मर कृतꣳ

सुवर्णाप्रमाणें ज्योतिर्मय अशा पात्रानें आदित्यमंडलाच्या ठिकाणीं असलेल्या ब्रह्माचें मुख झाकलेलें आहे. ब्रह्माची उपासना हाच ज्याचा धर्म आहे असा जो मी त्या मला ब्रह्माची उपलब्धि होण्याकरितां, हे सूर्या, तूं तें पात्र दूर सार. जगाचें पोषण करणाऱ्या, एकटा गमन करणाऱ्या, सर्वांचें संयमन करणाऱ्या, प्राणांचा आणि उदकांचा स्वीकार करणाऱ्या, प्रजापतीच्या पुत्रा, तूं आपले किरण एकत्र कर. जें तुझें अत्यंत कल्याणकारक असें तेजस्वी रूप तें माझ्या दृष्टीस पडो. असें कीं, आदित्यमंडलस्थ जो पुरुष आहे तो मीं व्हावें. ज्ञान आणि कर्म यांच्या योगानें संस्कार पावलेला असा माझा हा प्राण सर्वव्यापी सूत्रात्मा हो. आतां हें (माझें) शरीर भस्मामध्यें ज्याचा अन्त आहे असें होवो.

स्मर क्रतो स्मर कृतꣳ स्मर । अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् । युयोध्यस्मज्जुहुराणमेनो भूयिष्ठां ते नमउक्तिं विधेम ॥१॥ इति पञ्चदशं ब्राह्मणम् ॥ १५ ॥ इति पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

ॐ ॥ यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च

हे संकल्प करणाऱ्या प्राण्या, स्मरण करण्याला योग्य असें जें अग्निस्वरूपी ब्रह्म त्याचें स्मरण कर. आजपर्यंत केलेल्या कर्मांचें स्मरण कर. सर्व प्रकारचें कर्म अथवा ज्ञान जाणणाऱ्या देवा, अग्ने, पुन्हां गमन आणि आगमन यांनीं वर्जित अशा चांगल्या मार्गानें आह्मांला संपत्तीप्रत ने. आह्मांला वक्र ह्मणजे शत्रुरूपी असलेलें जें पाप त्याचा नाश कर. तुला आह्मी पुष्कळ नमस्कार करतों. १. इति पंचदशं ब्राह्मणम् ॥ १५ ॥ इति पंचमोऽध्यायः ॥ ७ ॥

अध्याय सहावा.

ज्येष्ठ व श्रेष्ठ अशा प्राणाला जो जाणतो तो आपल्या

स्वानां भवति प्राणो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥ १ ॥ यो ह वै वसिष्ठां वेद वासिष्ठः स्वानां भवति वाग्वै वासिष्ठा वसिष्ठः स्वानां भवत्यपि च येषां बुभूषति य एवं वेद ॥ २ ॥ यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे चक्षुर्वै प्रतिष्ठा चक्षुषा हि समे च दुर्गे च

समाजामध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो प्राण हाच ( इंद्रियांमध्यें ) ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे. हें जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो; ज्यांच्यामध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होण्याची इच्छा करतो त्यांच्यामध्यें देखील ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. १. धनवत्तम अशा वाणीला जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें धनवत्तम होतो. वाणी हीच धनवत्तम आहे. हें जो जाणतो तो आपल्या समाजामध्यें धनवत्तम होतो; ज्यांच्यामध्यें धनवत्तम होण्याची इच्छा करतो त्यांच्यामध्यें देखील धनवत्तम होतो. २. प्रतिष्ठारूपी चक्षूला जो जाणतो तो सम आणि विषम अशा देशीं अथवा कालीं

प्रतितिष्ठति प्रतितिष्ठति समे प्रतितिष्ठति दुर्गे य एवं वेद ॥ ३ ॥ यो ह वै संपदं वेद सꣳहास्मै पद्यते यं कामं कामयते श्रोत्रं वै संपच्छ्रोत्रे हीमे सर्वे वेदा अभिसंपन्नाः सꣳहास्मै पद्यते यं कामं कामयते य एवं वेद ॥ ४ ॥ यो ह वा आयतनं वेदायतनꣳ स्वानां भवत्यायतनं जनानां मनो वा आयतनमायतनꣳ स्वानां भवत्यायतनं

प्रतिष्ठा [ स्थिरत्व ] पावतो. चक्षु हीच प्रतिष्ठा होय. कारण चक्षूनेंच मनुष्य सम आणि विषम पाहून स्थित होतो. हें जो जाणतो तो सम आणि विषम अशा देशीं अथवा कालीं प्रतिष्ठा पावतो. ३. श्रोत्ररूपी संपत्तीला जो जाणतो त्याला ज्या ज्या कामाची इच्छा होते तो तो काम प्राप्त होतो. श्रोत्र हीच संपत्ति होय. कारण श्रोत्राचे ठिकाणीं सर्व वेद संपन्न आहेत. [ वेद श्रवण करूनच पाठ करतात ]. हें जो जाणतो त्याला ज्या ज्या कामाची इच्छा होते तो तो प्राप्त होतो. ४. मनोरूपी आयतन जो जाणतो तो आपल्या समाजाचें आयतन होतो, सर्व लोकांचें आयतन होतो. मन

जनानां य एवं वेद ॥ ५ ॥ यो ह वै प्रजातिं वेद प्रजायते ह प्रजया पशुभी रेतो वै प्रजातिः प्रजायते ह प्रजया पशुभिर्य एवं वेद ॥६॥ ते हेमे प्राणा अहꣳश्रेयसे विवदमाना ब्रह्म जग्मुस्तद्धोचुः को नो वसिष्ठ इति तद्धोवाच यस्मिन्व उत्क्रान्त इदꣳ शरीरं पापीयो मन्यते स वो वसिष्ठ इति ॥ ७ ॥ वाग्घोच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति

हेंच आयतन होय. हें जो जाणतो तो आपल्या समाजाचें व सर्व लोकांचें (देखील) आयतन [ आश्रयस्थान ] होतो. ५...६. तीं हीं सर्व इंद्रियें आपणांमध्यें श्रेष्ठ कोण याविषयीं वाद करीत असतांना प्रजापतीकडे गेलीं व आपणांमध्यें श्रेष्ठ कोण असें त्यांनीं त्याला विचारलें. प्रजापतीनें उत्तर दिलें, तुमच्यापैकीं जो (शरीरांतून) निघून गेला असतां शरीर पापरूपी समजलें जातें तो तुमच्यामध्यें श्रेष्ठ होय. ७. तेव्हां वाणी (शरीरामधून) निघून गेली. एक संवत्सरपर्यंत बाहेर राहून आल्यावर ती (इतर इंद्रियांना) ह्मणाली, तुह्मी मज-

ते होचुर्यथाकला अवदन्तो वाचा प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह वाक् ॥ ८ ॥ चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथान्धा अपश्यन्तश्चक्षुषा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह चक्षुः ॥ ९ ॥

वांचून कशीं राहूं शकलांत ? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणें मुके लोक वाणीनें न बोलतां, ( पण ) प्राणानें श्वास घेत, डोळ्यांनीं पहात, कानांनीं ऐकत, मनानें ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणें आह्मी राहिलों. तेव्हां वाणी ( पुन्हां शरीरामध्यें ) प्रवेश करती झाली. ८. चक्षु निघून गेला. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर तो ह्मणाला, तुह्मी मजवांचून कशीं राहूं शकलांत ? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणें अंधळे लोक चक्षूनें न पहातां, ( पण ) प्राणानें श्वास घेत, वाणीनें बोलत, कानांनीं ऐकत, मनानें ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणें

श्रोत्रꣳ होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा बधिरा अशृण्वन्तः श्रोत्रेण प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा विद्वाꣳसो मनसा प्रजायमाना रेतसैवमजीविष्मेति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥ १० ॥ मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवितुमिति ते होचुर्यथा मुग्धा अविद्वाꣳसो मनसा प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा

आह्मी राहिलों. तेव्हां चक्षूनें पुन्हां शरीरांत प्रवेश केला. ९. श्रोत्र निघून गेलें. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर तें ह्मणालें, तुह्मी मजवांचून कशीं राहूं शकलांत ? तीं ह्मणालीं, ज्याप्रमाणें बहिरे कानांनीं न ऐकतां, ( पण ) प्राणानें श्वास घेत, वाणीनें बोलत, डोळ्यांनीं पहात, मनानें ज्ञान घेत रहातात त्याप्रमाणें आह्मी राहिलों. तेव्हां श्रोत्रानें पुन्हां शरीरांत प्रवेश केला. १०. मन निघून गेलें. एक वर्ष बाहेर राहून आल्यावर तें ह्मणालें, तुह्मी मजवांचून कशी राहूं शकलांत ? तीं णालीं, ज्याप्रमाणें मूढ मनानें न जाणतां, ( पण )

पशन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण प्रजायमाना रेतसैवमजी-
विष्मेति प्रविवेश ह मनः ॥ ११ ॥ रेतो होच्चक्राम
तत्संवत्सरं प्रोष्यागत्योवाच कथमशकत मदृते जीवि-
तुमिति ते होचुर्यथा क्लीबा अप्रजायमाना रेतसा
प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः
श्रोत्रेण विद्वाꣳसो मनसैवमजीविष्मेति प्रविवेश ह रेतः
॥ १२ ॥ अथ ह प्राण उत्क्रमिष्यन्यथा महासुहयः
सैन्धवः पड्वीशशंकून्संवृहेदेवꣳ हैवेमान्प्राणान्संववर्ह ते
होचुर्मा भगव उत्क्रमीर्न वै शक्ष्यामस्त्वदृते जीवितुमिति

प्राणानें श्वास घेत, वाणीनें बोलत, चक्षूनें पहात, श्रोत्रानें श्रवण करीत रहातात त्याप्रमाणें आह्मी राहिलों. तेव्हां मनानें पुन्हां शरीरांत प्रवेश केला. ११. ...१२. नंतर जेव्हां प्राण बाहेर जाऊं लागला तेव्हां जसा सिंधुनदीकांठचा मोठा घोडा पायांतील बंधनें वर उचलतो त्याप्रमाणें त्यानें इतर इंद्रियांना वर उचललें. तेव्हां ती ह्मणालीं, भगवन् प्राणा, आपण जाऊं नका. तुझ्यावांचून आह्मी जिवंत राहूं शकणार

तस्यो मे बलिं कुरुतेति तथेति ॥१३॥ सा ह वागुवाच यद्वा अहं वसिष्ठास्मि त्वं तद्वसिष्ठोऽसीति यद्वा अहं प्रतिष्ठास्मि त्वं तत्प्रतिष्ठोऽसीति चक्षुर्यद्वा अह॑ संपदस्मि त्वं तत्संपदसीति श्रोत्रं यद्वा अहमायतनमस्मि त्वं तदायतनमसीति मनो यद्वा अहं प्रजातिरस्मि त्वं तत्प्रजातिरसीति रेतस्तस्यो मे किमन्नं किं वास इति यदिदं किंचा श्वभ्य आ कृमिभ्य आ कीटपतङ्गेभ्यस्तत्तेऽन्नमापो वास इति

नाहीं. प्राण ह्मणाला, मला तुह्मी त्याबद्दल करभार द्या. तीं इंद्रियें ह्मणालीं, बरें आहे. १३. वाणी ह्मणाली, माझ्यामध्यें जें धनवत्तमत्व आहे तें तुझें आहे. चक्षु ह्मणाला, माझ्यामध्यें जी प्रतिष्ठा आहे ती तुझी आहे. श्रोत्र ह्मणालें, माझ्यामध्यें जी संपत्ति आहे ती तुझी आहे. मन ह्मणालें, माझ्याजवळ जें आयतन आहे तें तुझें आहे. ......प्राण ह्मणाला, तर मग माझें अन्न कोणतें व वस्त्र कोणतें? तीं इंद्रियें ह्मणालीं, अश्वापासून, कृमींपर्यंत व कीटभुंगापर्यंत जे जे प्राणी आहेत ते सर्व तुझें अन्न आणि उदक हें तुझें वस्त्र, हें प्राणाचें अन्न

न ह वा अस्यानन्नं जग्धं भवति नानन्नं प्रतिगृहीतं य एवमेतदनस्यान्नं वेद तद्विद्वाꣳसः श्रोत्रिया अशिष्यन्त आचामन्त्यशित्वाचामन्त्येतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते ॥ १४ ॥ इति प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

श्वेतकेतुर्ह वा आरुणेयः पञ्चालानां परिषदमाजगाम स आजगाम जैवलिं प्रवाहणं परिचारयमाणं तमुदीक्ष्या-

जो जाणतो त्यानें अन्न नव्हे असा कांहीं पदार्थ खाल्ला तरी तो त्याला अन्नच होतो [ ह्म० पचतो ] आणि प्रतिग्रह घेण्याला अयोग्य असा प्रतिग्रह घेतला तरी तो प्रतिग्रहच होतो. ( उदक हें प्राणाचें वस्त्र आहे ) ह्मणून विद्वान् श्रोत्रिय [ वेदवेत्ते ] ब्राह्मण भोजन करतांना उदक प्राशन करतात व भोजन झालें ह्मणजे उदक प्राशन करतात. याचे योगानें प्राणाला आपण वस्त्र देतों असें ते मानतात. १४. इति प्रथमं ब्राह्मणम् ॥ १ ॥

अरुणाचा पुत्र श्वेतकेतु पंचाल देशाच्या सभेमध्यें सेवकांकडून सेवा घेत असलेल्या जीवलपुत्र प्रवाहण नामक राजा-

भ्युवाद कुमार ३ इति स भो ३ इति प्रतिशुश्रावानुशिष्टोऽन्वासि पित्रेत्योमिति होवाच ॥ १ ॥ वेत्थ यथेमाः प्रजाः प्रयत्यो विप्रतिपद्यन्ता ३ इति नेति होवाच वेत्थो यथेमं लोकं पुनरापद्यन्ता ३ इति नेति हैवोवाच वेत्थो यथासौ लोक एवं बहुभिः पुनः पुनः प्रयद्भिर्न संपूर्यता ३ इति नेति हैवोवाच वेत्थो यतिथ्यामाहुत्याᳪ हुताया-

कडे आला. ( हा गर्विष्ठ आहे असें पूर्वींच जाणणाऱ्या ) राजानें त्याला पाहिल्याबरोबर ‘ कुमार ’ असें संबोधून अभिवादन केलें. तो ऐटीनें ह्मणाला, ‘ हं. ’ राजा ह्मणाला, “ पित्याकडून ज्ञान संपादन केलें आहेस काय ? ” श्वेतकेतु ह्मणाला, “ होय. ” १. राजा ह्मणाला, “ हे लोक मरण पावले असतां निरनिराळ्या मार्गांनीं कसे जातात तें तूं जाणतोस काय ? ” “ नाहीं. ” “ पुन्हां या लोकीं कसे परत येतात तें तूं जाणतोस काय ? ” “ नाहीं. ” “ याप्रकारें पुष्कळ लोक मरण पावत असतां देखील तो परलोक कां भरून जात नाहीं तूं जाणतोस काय ? ” “ नाहीं. ” “ किती

मापः पुरुषवाचो भूत्वा समुत्थाय वदन्ती ३ इति नेति हैवोवाच वेत्थो देवयानस्य वा पथः प्रतिपदं पितृयाणस्य वा यत्कृत्वा देवयानं वा पन्थानं प्रतिपद्यन्ते पितृयाणं वापि हि न ऋषेर्वचः श्रुतं द्वे सृती अशृणवं पितृणामहं देवानामुत मर्त्यानां ताभ्यामिदं विश्वमेजत्समेति यदन्तरा पितरं मातरं चेति नाहमत एकंचन वेदेति

आहुति हवन केल्या असतां उदक बाहेर येऊन पुरुषवाणी बोलूं लागतें तें तूं जाणतोस काय ?" "नाहीं." "देवयान मार्गाला जाण्याचें साधन अथवा पितृयाण मार्गाला जाण्याचें साधन—जेणेंकरून देवयान अथवा पितृयाण मार्गाला मनुष्य जातो—तें साधन [ ज्ञा० कर्म ] तूं जाणतोस काय ? याविषयीं ऋषीचें वचन आह्मीं ऐकलें आहे तें असें—पितरांकडे नेणारा एक आणि देवांकडे नेणारा एक असे दोन मार्ग मनुष्यांना जाण्याला आहेत, असें मीं ऐकलें आहे. हें सर्व विश्व याच दोन मार्गांनीं जात जात एकत्र येतें. द्युलोक आणि पृथिवीलोक [ पितरं मातरं च ] यांच्या मध्यें हे दोन

होवाच ॥२॥ अथैनं वसत्योपमन्त्रयांचक्रेऽनादृत्य वसतिं कुमारः प्रदुद्राव स आजगाम पितरं तꣳ होवाचेति वाव किल नो भवान्पुरानुशिष्टानवोच इति कथꣳ सुमेध इति पञ्च मा प्रश्नान् राजन्यबन्धुरप्राक्षीत्ततो नैकंचन वेदेति कतमे त इतीम इति ह प्रतीकान्युदाजहार ॥ ३ ॥ स होवाच तथा नस्त्वं तात जानीथा यथा यदहं किंच वेद

मार्ग आहेत." "या प्रश्नांपैकीं एका देखील प्रश्नाचें उत्तर मी जाणत नाहीं." २. नंतर राजानें आपल्या येथें रहाण्याविषयीं सांगून श्वेतकेतूचें आदरातिथ्य केलें, परंतु आदरातिथ्याचा अनादर करून कुमार तेथून निघाला व पित्याकडे आला. पित्याला तो ह्मणाला, पूर्वीं ( समावर्तनकालीं ) सर्व विद्या पूर्ण झाल्या असें तुह्मीं आह्मांला कसें सांगितलें ? पिता ह्मणाला, बुद्धिमन्ता बाळा, काय झालें ? कुमार ह्मणाला, त्या मूर्ख राजानें मला पांच प्रश्न विचारले. पण त्यांपैकीं एकाचें देखील उत्तर मला माहीत नव्हतें. पिता ह्मणाला, ते प्रश्न कोणते ? तेव्हां कुमारानें ते प्रश्न सांगितले. ३. पिता ह्मणाला, वत्सा, तूं

सर्वमहं तत्तुभ्यमवोचं प्रेहि तु तत्र प्रतीत्य ब्रह्मचर्यं वत्स्याव इति भवानेव गच्छत्विति स आजगाम गौतमो यत्र प्रवाहणस्य जैवलेरास तस्मा आसनमाहृत्योदकमाहारयांचकाराथ हास्मा अर्घ्यं चकार तꣳ होवाच वरं भगवते गौतमाय दद्म इति ॥ ४ ॥ स होवाच प्रतिज्ञातो म एष वरो यां तु कुमारस्यान्ते वाचमभाषथास्तां मे ब्रूहीति ॥५॥ स होवाच दैवेषु वै गौतम तद्वरेषु मानुषाणां ब्रूहीति

हें लक्षांत ठेव कीं, मला जेवढें कांहीं ज्ञान होतें तेवढें सर्व मीं तुला सांगितलें. ह्मणून चल आपण तेथें ( राजाकडे ) जाऊन शिष्यभावानें राहूं. कुमार ह्मणाला, तुह्मीच जा. तेव्हां तो गौतमगोत्री आरुणि प्रवाहण राजा जेथें होता तेथें आला. त्याला आसन आणून राजानें उदक आणविलें व अर्घ्य दिलें. राजा ह्मणाला, भगवन्, आपणास काय पाहिजे असेल तें मी देतों. ४. तो ह्मणाला, तुझा हा वर कायम ठेव. कुमाराला तूं जें प्रश्नरूप भाषण बोललास तें मला सांग. ५. राजा ह्मणाला, गौतमा, तूं मागतोस हा वर देवांतला

॥ ६ ॥ स होवाच विज्ञायते हास्ति हिरण्यस्यापात्तं गोअश्वानां दासीनां प्रवाराणां परिदानस्य मा नो भवान् बहोरनन्तस्यापर्यन्तस्याभ्यवदान्यो भूदिति स वै गौतम तीर्थेनेच्छासा इत्युपैम्यहं भवन्तमिति वाचा ह स्मैव पूर्व

आहे. मनुष्यांतला एखादा वर माग. ६. तो ह्मणाला, तुला माहीत आहेच कीं, मजजवळ सुवर्ण, गाई, घोडे, दासी, परिवार, वस्त्रें वगैरे पुष्कळ आहेत. मोठा, अनन्तफल-दायक व कधीं न संपणारा असा वर मला तूं न देणारा आहेस असें न होवो. राजा ह्मणाला, गौतमा, तूं शास्त्रविहित मार्गानें [तीर्थेन] मजपासून विद्या प्राप्त करून घेण्याची इच्छा कर. गौतम ह्मणाला, मी तुजपाशीं विद्या शिकण्याकरितां शिष्यभावानेंच आलों आहें. वरिष्ठ जातीचे लोक कनिष्ठ जातीच्या लोकांकडे विद्या शिकण्याकरितां जातात तेव्हां नुसतें वाचेनेंच जातात [ह्मणजे विद्या शिकण्याकरितां आपण आलों आहों असें सांगितलें ह्मणजे उपायन, शुश्रूषा इत्यादिकांकरितां कांहीं कालपर्यंत गुरुगृहीं रहाण्याचें त्यांना कारण नाहीं]. ह्मणून

उपयान्ति स होपायनकीर्त्योवास ॥ ७ ॥स होवाच तथा नस्त्वं गौतम मापराधास्तव च पितामहा यथेयं विद्येतः पूर्वं न कस्मिंश्चन ब्राह्मण उवास तां त्वहं तुभ्यं वक्ष्यामि को हि त्वैवं ब्रुवन्तमर्हति प्रत्याख्यातुमिति ॥ ८ ॥ असौ वै लोकोऽग्निर्गौतम तस्यादित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिर्दिशोऽङ्गारा अवान्तरदिशो विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ

मीं वाचेनेंच उपायनादिकांकरितां तुझ्या गृहीं वास केला आहे असें होतें. ७. राजा ह्मणाला, तुझ्या पितामहानें माझ्या पितामहावर जसा क्रोध केला नाहीं त्याप्रमाणेंच तूं देखील मजवर क्रोध करूं नकोस. ही विद्या यापूर्वीं कोणत्याहि ब्राह्मणाचे ठिकाणीं नव्हती (क्षत्रियांचीच ही विद्या, ह्मणून मीं तुला इतर वर मागण्याविषयीं सांगितलें). मी (आतां) ही विद्या तुला सांगतों. अशा रीतीनें बोलणाऱ्या तुला ‘मी विद्या सांगत नाहीं’ असें ह्मणणें कोणीं तरी योग्य होईल काय? ८. गौतमा, हा लोक हाच अग्नि; आदित्य ही त्याची समिधा, आदित्याचे किरण हा धूम, दिशा हे निखारे

देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुत्यै सोमो राजा संभवति ॥ ९ ॥ पर्जन्यो वा अग्निर्गौतम तस्य संवत्सर एव समिदभ्राणि धूमो विद्युदर्चिरशनिरङ्गारा ह्रादुनयो विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमꣳ राजानं जुह्वति तस्या आहुत्यै वृष्टिः संभवति ॥ १० ॥ अयं वै लोकोऽग्निर्गौतम तस्य पृथिव्येव समिदग्निर्धूमो रात्रिरर्चिश्चन्द्रमा अङ्गारा नक्षत्राणि विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा वृष्टिं जुह्वति

आणि उपादिशा या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव श्रद्धेचें हवन करतात. ती आहुति दिली ह्मणजे सोम राजा उत्पन्न होतो. ९. गौतमा, पर्जन्य हा अग्नि; संवत्सर ही त्याची समिधा, अभ्रें हा धूम, वीज ही ज्वाळा, अशनि हे निखारे आणि मेघगर्जना या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव सोम राजाचें हवन करतात. ती आहुति दिली ह्मणजे वृष्टि होते. १०. गौतमा, हा लोक अग्नि; पृथिवी ही त्याची समिधा, अग्नि हा धूम, रात्रि ही ज्वाळा, चंद्र हे निखारे आणि नक्षत्रें या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव वृष्टिचें हवन

तस्या आहुत्या अन्नꣳ संभवति ॥ ११ ॥ पुरुषो वा अग्नि-
र्गौतम तस्य व्यात्तमेव समित्प्राणो धूमो वागर्चिश्चक्षुरङ्गाराः
श्रोत्रं विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति
तस्या आहुत्यै रेतः संभवति ॥ १२ ॥ योषा वा अग्नि-
र्गौतम तस्या उपस्थ एव समिल्लोमानि धूमो योनिरर्चिर्य-
दन्तः करोति तेऽगारा अभिनन्दा विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेत-
स्मिन्नग्नौ देवा रेतो जुह्वति तस्या आहुत्यै पुरुषः संभवति स
जीवति यावज्जीवत्यथ यदा म्रियते ॥१३॥ अथैनमग्नये
हरन्ति तस्याग्निरेवाग्निर्भवति समित्समिद्धूमो धूमोऽर्चिर-
र्चिरङ्गारा अङ्गारा विस्फुलिङ्गा विस्फुलिङ्गास्तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ

करतात. ती आहुति दिली ह्मणजे अन्न उत्पन्न होतें. ११. गौतमा, पुरुष हा अग्नि; मुख ही त्याची समिधा, प्राण हा धूम, वाणी हा ज्वाळा, चक्षु हे निखारे आणि श्रोत्र या ठिणग्या. त्या या अग्नीमध्यें देव अन्नाचें हवन करतात... १२. १३. हा पुरुष मेला ह्मणजे त्याला अग्नीप्रत नेतात. अग्नि हा त्याचा अग्नि होतो, समिधा या समिधा, धूम हा

देवाः पुरुषं जुह्वति तस्या आहुत्यै पुरुषो भास्वरवर्णः संभवति ॥ १४ ॥ ते य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धाᳩ सत्यमुपासते तेऽर्चिरभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङादित्य एति मासेभ्यो देवलोकं देवलोकादादित्यमादित्याद्वैद्युतं तान्वैद्युतान्पुरुषो

धूम, ज्वाळा या ज्वाळा, निखारे हे निखारे आणि ठिणग्या या ठिणग्या होत. त्या या अग्नीमध्यें देव पुरुषाची आहुति देतात. ती आहुति दिली ह्मणजे अत्यंत दीप्तिमान् पुरुष उत्पन्न होतो. १४. हें (पंचाग्निदर्शन) जे जाणतात आणि जे (वानप्रस्थाश्रमी) अरण्यामध्यें श्रद्धायुक्त होत्साते सत्यरूपी ब्रह्माची उपासना करतात ते (संसाररहित होऊन) उत्तर मार्गाला नेणारें अर्चिस्वरूप पावतात. अर्चीमधून अहर्देवता, अहर्देवतेमधून शुक्ल पक्ष, शुक्ल पक्षामधून उत्तरायणाचे सहा महिने, या सहा महिन्यांमधून देवलोक, देवलोकामधून आदित्यलोक, आदित्यामधून वीज आणि नंतर ब्रह्मदेवाच्या मानस पुत्रांपैकीं कोणी तरी येऊन तो वीजे–

मानस एत्य ब्रह्मलोकान् गमयति ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति तेषां न पुनरावृत्तिः ॥१५॥ अथ ये यज्ञेन दानेन तपसा लोकाञ्जयन्ति ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिꣳ रात्रेरपक्षीयमाणपक्षमपक्षीयमाणपक्षाद्यान्षण्मासान्दक्षिणा— दित्य एति मासेभ्यः पितृलोकं पितृलोकाच्चन्द्रं ते चन्द्रं प्राप्यान्नं भवन्ति ताꣳस्तत्र देवा यथा सोमꣳ राजानमाप्यायस्वापक्षी- यस्वेत्येवमेनाꣳस्तत्र भक्षयन्ति तेषां यदा तत्पर्यवैत्यथेममे-

मधून त्याला ब्रह्मलोकांप्रत नेतो. ते त्या ब्रह्मलोकांमध्यें अत्यंत श्रेष्ठ स्वरूप प्राप्त होत्साते बहुत कालपर्यंत रहातात. ते परत ( जन्ममृत्यूप्रत ) येत नाहींत. १५. आतां जे यज्ञ, दान, ( चांद्रायणादि ) तप यांनीं [ ह्मणजे केवल कर्मानें स्वर्गादि लोक मिळवितात ते धूमाप्रत जातात. धूमामधून रात्र, रात्रीमधून कृष्ण पक्ष, कृष्ण पक्षामधून दक्षिणायनाचे सहा महिने, या सहा महिन्यांमधून पितृलोक, पितृलोकामधून चंद्रलोक, चंद्रलोकीं आल्यावर ते अन्नरूप होतात. यज्ञामध्यें ज्याप्रमाणें ऋत्विक् सोमाचें पानामागें पान करून त्याला

वाकाशमभिनिष्पद्यन्त आकाशाद्वायुं वायोर्वृष्टिं वृष्टेः पृथिवीं ते पृथिवीं प्राप्यान्नं भवन्ति ते पुनः पुरुषाग्नौ हूयन्ते ततो योषाग्नौ जायन्ते लोकान्प्रत्युत्थायिनस्त एवमेवानुपरिवर्तन्तेऽथ य एतौ पन्थानौ न विदुस्ते कीटाः पतंगा यदिदं दन्दशूकम् ॥ १६ ॥ इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

स यः कामयेत महत्प्राप्नुयामित्युदगयन आपूर्यमाण-

संपवितात त्याप्रमाणें त्या ठिकाणीं देव त्यांना संपवितात [ ह्म० त्यांच्या कर्माचा क्षय करतात ]. जेव्हां त्यांचें तें ( यज्ञादि ) कर्म संपतें तेव्हां ते या आकाशाप्रतच येतात. आकाशामधून वायु, वायुमधून वृष्टि, वृष्टीमधून पृथिवी, या क्रमानें येऊन पृथ्वीवर आल्यावर अन्नरूप होतात. त्यांचें पुन्हां पुरुषरूपी अग्नीमध्यें हवन केलें जातें. नंतर (स्वर्गादि) लोकांमध्यें पुन्हां जाण्याकरितां स्त्रीरूपी अग्नीमध्यें ते जन्म घेतात. याप्रमाणें ते चक्रासारखे फिरत रहातात. हे दोन्ही मार्ग ज्यांना माहीत नाहींत ते कीट, पतंग, दंश करणारे मशक इत्यादि होतात. १६. इति द्वितीयं ब्राह्मणम् ॥ २ ॥

पक्षस्य पुण्याहे द्वादशाहमुपसद्व्रती भूत्वौदुम्बरे कꣳसे चमसे वा सर्वौषधं फलानीति संभृत्य परिसमुह्य परिलिप्याग्निमुपसमाधाय परिस्तीर्यावृताज्यꣳ सꣳस्कृत्य पुꣳसा नक्षत्रेण मन्थꣳ संनीय जुहोति। यावन्तो देवास्त्वयि जातवेदस्तिर्यञ्चो घ्नन्ति पुरुषस्य कामान्। तेभ्योऽहं भागधेयं

आपल्याला महत्त्व प्राप्त व्हावें अशी जो इच्छा करतो त्यानें उत्तरायणामध्यें शुक्लपक्षांत शुभ दिवस पाहून बारा दिवस पर्यंत उपसद् नामक व्रत करावें. [ बारा दिवस क्रमानें कमी करीत दूध पिऊन रहावयाचें व पुढें क्रमानें अधिक करीत रहावयाचें ]. उदुंबर वृक्षाच्या केलेल्या द्रोणांत अथवा चमच्यांत सर्व तऱ्हेच्या ओषधी व फळें मिळवून परिसमूहन व परिलेपन करावीं. त्या भूमीवर अग्नि ठेवावा. परिस्मरणानंतर आज्याचा संस्कार करावा. पुरुषनक्षत्राचे योगावर ( त्या सर्व ओषधींचा केलेला ) मंथ मध्यें ठेऊन ( उदुंबराच्या चमच्यानें ) "यावन्तो देवा०" इत्यादि मंत्रांनीं आहुति द्यावी. मंत्रांचा अर्थ—हे जातवेद [=सर्वज्ञ,

जुहोमि ते मा तृप्ताः सर्वैः कामैस्तर्पयन्तु स्वाहा । या तिरश्ची निपद्यतेऽहं विधरणी इति । तां त्वा घृतस्य धारया यजे सꣳराधनीमहꣳ स्वाहा ॥ १ ॥ ज्येष्ठाय स्वाहा श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति प्राणाय स्वाहा वसिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति वाचे स्वाहा प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति चक्षुषे स्वाहा संपदे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति श्रोत्राय स्वाहाऽयतनाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति मनसे स्वाहा प्रजात्यै स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति रेतसे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ॥ २ ॥ अग्नये स्वाहेत्यग्नौ

उत्पन्न झालेलें सर्व जाणणारा ] अग्ने, जे देव अथवा तिर्यक् योनीचे प्राणी मनुष्याच्या कामांना विघ्न करणारे असतील त्या सर्वांचा भाग मी तुझ्यामध्यें हवन करीत आहें तेणें-करून तृप्त होत्साते ते मला सर्व काम देवोत.......यानंतर ६ व्या श्लोकापर्यंत आहुति सांगितल्या आहेत. १—६. नंतर

हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति सोमाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भूः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भुवः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति स्वः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भूर्भुवः स्वः स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ब्रह्मणे स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति क्षत्राय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भूताय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति भविष्यते स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति विश्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमनयति सर्वाय स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति प्रजापतये स्वाहेत्यग्नौ हुत्वा मन्थे सꣳस्रवमवनयति ॥ ३ ॥ अथैनमभिमृशति भ्रमदसि ज्वलदसि पूर्णमसि प्रस्तब्धमस्येकसभमसि हिंकृतमसि हिंक्रियमाणमस्युद्गीथमस्युद्गीयमानमसि श्रावितमसि प्रत्याश्रावितमस्यार्द्रे संदीप्तमसि विभूरसि प्रभूरस्यन्नमसि ज्योतिरसि निधनमसि संवर्गोऽसीति ॥४॥ अथैनमुद्यच्छत्यामꣳस्या-

मꣳहि ते महि स हि राजेशानोऽधिपतिः स माꣳ राजेशानोऽधिपतिं करोत्विति ॥ ५ ॥ अथैनमाचामति तत्सवितुर्वरेण्यम् । मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः । माध्वीर्नः सन्त्वोषधीर्भूः स्वाहा । भर्गो देवस्य धीमहि । मधु नक्तमुतोषसो मधुमत्पार्थिवꣳ रजः मधु द्यौरस्तु नः पिता । भुवः स्वाहा धियो यो नः प्रचोदयान्मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः । माध्वीर्गावो भवन्तु नः । स्वः स्वाहेति । सर्वां च सावित्रीमन्वाह सर्वाश्च मधुमतीरहमेवेदꣳ सर्वं भूयासं भूर्भुवः स्वः स्वाहेत्यन्तत आचम्य पाणी प्रक्षाल्य जघनेनाग्निं प्राक्शिराः संविशति प्रातरादित्यमुपतिष्ठते दिशामेकपुण्डरीकमस्यहं मनुष्याणामेकपुण्डरीकं भूयासमिति यथेतमेत्य जघनेनाग्निमासीनो वꣳशं जपति ॥ ६ ॥ तꣳ हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्यायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः

या मंथाची परंपरा सांगितली आहे——अरुणपुत्र उद्दालकानें हा वाजसनेय याज्ञवल्क्याला सांगितला व पुढें सांगितलें कीं, हा

प्ररोहेयुः पलाशानीति ॥७॥ एतमु हैव वाजसनेयो याज्ञवल्क्यो मधुकाय पैंग्यायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥८॥ एतमु हैव मधुकः पैङ्ग्यश्चूलाय भागवित्तयेऽन्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ९ ॥ एतमु हैव चूलो भागवित्तिर्जानकय आयस्थूणायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ १० ॥ एतमु हैव जानकिरायस्थूणः सत्यकामाय जाबालायान्तेवासिन उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषिञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥११ ॥ एतमु हैव सत्यकामो जाबालोऽन्तेवासिभ्य उक्त्वोवाचापि य एनꣳ शुष्के स्थाणौ निषि-

मंथ ( याप्रमाणें संस्कार करून ) शुष्क खांबावर टाकला तरी त्याला शाखा व पालवी फुटतील. याप्रमाणें पुढें परंपरा सांगितली आहे. ७–१२. उदुंबराचे चार जिन्नस होतात,

ञ्चेज्जायेरञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति तमेतं नापुत्राय वानन्तेवासिने वा ब्रूयात् ॥ १२ ॥ चतुरौदुम्बरो भवत्यौदुम्बरः स्रुव औदुम्बरश्चमस औदुम्बर इध्म औदुम्बर्या उपमन्थन्यौ दश ग्राम्याणि धान्यानि भवन्ति व्रीहियवास्तिलमाषा अणुप्रियङ्गवो गोधूमाश्च मसूराश्च खल्वाश्च खलकुलाश्च तान् पिष्टान्दधनि मधुनि घृत उपसिञ्चत्याज्यस्य जुहोति ॥ १३ ॥ इति तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

………… इति चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

स्रुव, चमस, इध्म आणि उपमंथनी. ग्राम्य धान्यें दहा—तांदुळ, यव, तिळ, उडीद, अणु, प्रियंगु [ कंगु ], गहूं, मसूर, खल्व [ वल्ल ] आणि कुळीथ. हीं दहा धान्यें वांटून दहीं, मध व घृत यांमध्यें कालवून घृतासह हवन करावीं. १३. इति तृतीयं ब्राह्मणम् ॥ ३ ॥

चवथ्या ब्राह्मणामध्यें पुत्राचे संस्कार वगैरे सांगितले आहेत. इति चतुर्थं ब्राह्मणम् ॥ ४ ॥

अथ वंशः पौतिमाषीपुत्रः कात्यायनीपुत्रात् कात्यायनीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्र औपस्वस्तीपुत्रादौपस्वस्तीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रः कात्यायनीपुत्रात्कात्यायनीपुत्रः कौशिकीपुत्रात्कौशिकीपुत्र आलम्बीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्राच्च वैयाघ्रपदीपुत्रः काण्वीपुत्राच्च कापीपुत्राच्च कापीपुत्रः ॥ १ ॥ आत्रेयीपुत्रादात्रेयीपुत्रो गौतमीपुत्राद्गौतमीपुत्रो भारद्वाजीपुत्राद्भारद्वाजीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वात्सीपुत्राद्वात्सीपुत्रः पाराशरीपुत्रात्पाराशरीपुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणीपुत्रो वार्कारुणीपुत्राद्वार्कारुणीपुत्र आर्तभागीपुत्रादार्तभागीपुत्रः शौङ्गीपुत्राच्छौङ्गीपुत्रः सांकृतीपुत्रात्सांकृतीपुत्र आलम्बायनीपुत्रादालम्बायनीपुत्र आलम्बीपुत्रादालम्बीपुत्रो जायन्तीपुत्राज्जायन्तीपुत्रो माण्डूकायनीपुत्रान्माण्डूकायनीपुत्रो माण्डूकीपुत्रान्माण्डूकीपुत्रः शाण्डिलीपुत्राच्छाण्डिलीपुत्रो राथीतरीपुत्राद्राथीतरीपुत्रो भालुकीपुत्राद्भालुकीपुत्रः क्रौंचिकीपुत्रा-

भ्यां कौंचिकीपुत्रौ वैदभृतीपुत्राद्वैदभृतीपुत्रः कार्शकेयीपुत्रा-
त्कार्शकेयीपुत्रः प्राचीनयोगीपुत्रात्प्राचीनयोगीपुत्रः सांजी-
वीपुत्रात्सांजीवीपुत्रः प्राश्नीपुत्रादासुरिवासिनः प्राश्नीपुत्र
आसुरायणादासुरायण आसुरेरासुरिः ॥२॥ याज्ञवल्क्या-
द्याज्ञवल्क्य उद्दालकादुद्दालकोऽरुणादरुण उपवेशेरुपवेशिः
कुश्रेः कुश्रिर्वाजश्रवसो वाजश्रवा जिह्वावतो बाध्योगा-
ज्जिह्वावान्बाध्योगोऽसिताद्वार्षगणादसितो वार्षगणो हरिता-
त्कश्यपाद्धरितः कश्यपः शिल्पात्कश्यपाच्छिल्पः कश्यपः
कश्यपान्नैध्रुवेः कश्यपो नैध्रुविर्वाचो वागम्भिण्या अम्भि-
ण्यादित्यादादित्यानीमानि शुक्लानि यजूंषि वाजसनेयेन
याज्ञवल्क्येनाख्यायन्ते ॥ ३ ॥ समानमा सांजीवीपुत्रा-
त्सांजीवीपुत्रो माण्डूकायनेर्माण्डूकायनिर्माण्डव्यान्माण्डव्यः
कौत्सात्कौत्सो माहित्थेर्माहित्थिर्वामकक्षायणाद्वामकक्षा-
यणः शाण्डिल्याच्छाण्डिल्यो वात्स्याद्वात्स्यः कुश्रेः कुश्रिर्य-
ज्ञवचसो राजस्तम्बायनाद्यज्ञवचा राजस्तम्बायनस्तुरात्काव-
षेयात्तुरः कावषेयः प्रजापतेः प्रजापतिर्ब्रह्मणो ब्रह्म स्वयंभु

ब्रह्मणे नमः ॥ ४ ॥ इति पंचमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥

**इति अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥**

॥ इति बृहदारण्यकोपनिषत्समाप्ता ॥ १० ॥

---

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ॥ पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥ ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

यानंतर ज्ञानप्राप्तीची वंशपरंपरा सांगतात—कात्यायनी पुत्रापासून पौतिमाषीपुत्राला, गौतमीपुत्रापासून कात्यायनी पुत्राला इत्यादि......इति पंचमं ब्राह्मणम् ॥ ५ ॥ इति षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

**॥ इति बृहदारण्यकोपनिषत्समाप्ता ॥**

सार्थ उपनिषत्संग्रह भाग पहिला समाप्त.

---

# गो पा ल.



कोटाचें फारच मजबुत रेशमी कापड दर वारास रु. २॥ ते ४॥ दरीयामोज ( वॉटर सिल्क–पोलकीं व झबल्याकरितां फारच मजेदार, मजबूत रेशमी कापड ) साटीण, फीत, जरीचे कांठ, जीक चळकचे चोळ्यांचे कांठ व टोप्या, जरीचे खण, पैठण्या ( खऱ्या व खोट्या ) मश्रु, किनखाब, सोन्याचांदीचे वर्ख, मोतीं, हिरे, सुरतेची प्रख्यात देशी साखरेची बर्फी व श्रीखंड. पटके रु. ८, १०, १२, १४.

दक्षणी, गोपाळ त्रिंबक दांडेकर–सुरत.

## गोपाळ त्रिंबक दांडेकर भागातलाव सुरत यांनीं बनविलेलें हातमागावरील रेशमी कापड.

| लांबरुंद हात | कदासारखे मुकटे. किंमत रुपये कांठ | कदासारखे मुकटे. किंमत रुपये बिनकांठ | कद. किंमत रुपये. कांठ | कद. किंमत रुपये. बिनकांठ | पितांबर गोमेकाठी. किंमत रुपये. | कडेल. |
|---|---|---|---|---|---|---|
| ७×१॥। | ५॥ | ४ | ६॥, ७॥ | | | |
| ८×२ | ६॥ | ५ | | | | |
| ९×२। | ८॥ | ६॥ | ९॥।= | ९ | ९॥।= | |
| १०×२॥ | ११ | ८॥ | १५ | १२ | ११, १२, १६ | |
| १६×२। | १३ | मुगी व साधे ११ | | | १५ | |
| १६×२॥ | १३१७ | मुगी व साधे १३ | २५ | १८ | १८, २५, ३० | १९॥।= २२॥।= |
| पामरी ६×२॥ | ६, ८ | | | | | |
| ४×२ | ४।, ५ | | | | | |

नांवें नोंदवा. नांवें नोंदवा.

# वैद्यक-ग्रंथमाला.

दरमहा एक वैद्यकीय पुस्तक मराठी

भाषांतरासहित प्रसिद्ध होणार.

## पुस्तकांचीं नांवें.

१ रसमंजरी, २ राजमार्तंड, ३ गदनिग्रह, ४ रस-माधव, ५ योगरत्नाकर, ६ रसार्णव, ७ रसरत्नसमुच्चय, ८ सुश्रुत वगैरे उपयुक्त ग्रंथांचें भाषांतर करण्याचें ठरविलें आहे. आगाऊ वर्गणीदार होणारांस पुस्तकाची जी किंमत होईल त्याच्या पाऊणपट किंमतीस ग्रंथ मिळेल. तर त्वरा करा व या उपयुक्त कृत्यास मदत करा.

**वैद्यकपत्रिका**—वैद्यक विषयाची चर्चा करणारें साप्ताहिक पत्र. वार्षिक वर्गणी ट. हं. सह दोन रुपये.

पत्ता—**खेडकर वैद्य ॲन्ड सन्स. पुणें-सिटी.**

## —श्रीमत् परमहंस—

# स्वामी रामतीर्थ.



यांचे **समग्र ग्रंथ** ह्मणजे स्वामींनीं अमेरिका, ईजिप्त, जपान वगैरे देशांत दिलेलीं **व्याख्यानें, लेख, कविता, पत्रें, संवाद** वगैरे मराठींत प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे. क्राऊन अष्टपत्री सांच्याच्या दीडशें पृष्ठांचा एक भाग, असे सुमारें आठ किंवा नऊ भाग काढून स्वामींचे समग्र ग्रंथ पुरे करावयाचे आहेत. समग्र ग्रंथांपैकीं पहिले **चार भाग प्रसिद्ध झाले** असून, पांचवा भाग सुमारें दोन महिन्यांनीं प्रसिद्ध होईल; व पुढील प्रत्येक भाग दर तीन महिन्यांनीं निघत जाईल. स्वामींच्या उपदेशाबरोबर स्वामींच्या दर्शनाचा नित्य लाभ घडावा ह्मणून निरानिराळ्या पेहेरावांतील स्वामींचा एकेक **फोटो** दर भागांत येणार आहे. प्रसिद्ध झालेल्या पहिल्या तीन भागांची किंमत प्रत्येकीं **कागदी** बांधणीस **बारा आणे** व **कापडी** बांधणीस **एक रुपया** (शिवाय टपालखर्च).

प्रसिद्ध झालेले पहिले चार भाग वरील किंमतीनें मागवून पुढें प्रसिद्ध होणारे सर्व भाग घेण्याचें पांचवा भाग प्रसिद्ध होण्यापूर्वी आगाऊ कळविणारांसच पांचव्या भागापासून प्रत्येक भागास कागदी बांधणीस किंमत आठ आणे, व्ही. पी. नें दहा आणे; कापडी बांधणीस बारा आणे, व्ही. पी. नें चौदा आणे. मागाहून कागदी बांधणीचे प्रतीस बारा आणे, व्ही. पी. नें चौदा आणे; कापडी बांधणीचे प्रतीस किंमत एक रुपया व्ही. पी. नें एक रुपया दोन आणे. प्रसिद्ध झालेल्या भागांस आगाऊ ग्राहकांकरितां ठेवलेली सवलतीची किंमत नाहीं.

पत्ता—भास्कर विष्णु फडके.
हिरजी आसूची वाडी, पोस्ट माटुंगा, मुंबई.

**सूचना**—मुंबईत मिळणारीं इतर सर्व प्रकारचीं पुस्तकेंहि आमचेकडे मागविलीं असतां मिळतील.

**भास्कर विष्णु फडके.**
पो. माटुंगा मुंबई.

# दिशाभूल !

किंमत बारा आणे } स्त्री-शिक्षण-विषयक सचित्र सामाजिक कादंबरी { व्ही. पी नें. चौदा आणे

लेखक--**भास्कर विष्णु फडके** बी. ए.

## या कादंबरीवरील अभिप्राय—

ले. **दादासाहेब खापर्डे**, उमरावती–" कादंबरी वाचली, कथानक रम्य आहे आणि भाषा सुगम असून प्रौढ आहे. प्रागतिक व पुरातन पक्षाच्या मंडळींनें व विशेषनें: स्त्रीवर्गानें ही कादंबरी अगत्य वाचावी, असें माझें मत आहे. "

सौ. **गिरिजाबाई केळकर**, सोलापूर--" ...दिशाभूल हें पुस्तक मला फार आवडलें. अशा प्रकारच्या पुस्तकापासून समाजाला मनोरंजन व बोध हीं प्राप्त होतात. "

**पंचमजार्जविजय**, बेळगांव--" विषय सामाजिक, बऱ्याच परिचयांतला, भाषा सुरस व प्रसंग बहारीचे, यामुळें ही कादंबरी चांगली आदरणीय झाली आहे. "

हें पुस्तक मागविण्याचा पत्ता--**भास्कर विष्णु फडके**,
**हिरजी** आसची वाडी, पोस्ट माटुंगा, मुंबई.

## कै. बळवंत जनार्दन करंदीकर कृत दोन पुस्तकें.

किंमत चार आणे. ] **श्री बालाजी** [ व्ही. पी.नें सहा आणे

अथवा

# श्रीवेंकटेशचरितामृत.

भगवान् श्रीविष्णूंनीं आपल्या मुख्य दशावतारांशिवाय निरनिराळ्या काळीं जे अवतार धारण केले, त्यांपैकीं श्रीवेंकटेशावतार हा एक होय. श्रीव्यासांनीं भविष्योत्तरपुराणांतर्गत वेंकटेशमहात्म्यांत भगवंताच्या ह्या अवतारांतील लीलांचें जें वर्णन केलें आहे त्याच्या आधारानें हें चरितामृत लिहिलें आहे. पृष्ठसंख्या ८४ आहे.

किंमत चार आणे. ] **सुवर्णरज.** [ व्ही. पी.नें सहा आणे.

ह्या पुस्तकांत नीतिबोधपर साडेपांचशें आर्या आहेत. ह्या आर्यांच्या अवलोकनानें आबालवृद्धांस चांगला नीतिबोध होईल. विद्यार्थ्यांस अत्यंत उपयोगी.

हीं पुस्तकें मागविण्याचा पत्ता—**भास्कर विष्णु फडके.**
हिरजी आसूची वाडी, पोस्ट **माटुंगा, मुंबई.**

अष्टेकर आणि मंडळीची

# मनोरंजक पुस्तकमाला.

आपल्या हिंदु समाजास हितावह व बोधपर अशा कादंबऱ्या प्रसिद्ध करण्याचे उद्देशानें ही माला सुरू केली आहे. मालेंतील पुस्तकें एका ठराविक मुदतीनें प्रसिद्ध होतात असें नाहीं. तथापि वर्षांतून सुमारें दोन किंवा तीन पुस्तकें प्रसिद्ध होत असतात. वाचकांना उत्तम प्रकारचीं पुस्तकें वाचावयास मिळावीं इकडे विशेष लक्ष दिलें जातें. या मालेचे कायम वर्गणीदार होणारांस पुस्तकें सवलतीनें मिळण्याची व्यवस्था केली आहे तिच्यासंबंधाचे नियम येणेंप्रमाणें---

## मनोरंजक पुस्तकमालेचे नियम.

( १ ) मनोरंजक पुस्तकमालेचे कायम वर्गणीदार होणारांनीं कायम वर्गणीदारांच्या पटांत नांव नोंदण्यासाठीं एक रुपया प्रवेश फी भरली पाहिजे. ( २ ) एक रुपया फी भरून कायम वर्गणीदार झाल्यावर त्यांना मालेंतील प्रत्येक पुस्तक अर्ध्या किंमतीला मिळेल. ( ३ ) कायम वर्गणीदारांनीं मालेचीं सर्व पुस्तकें विकत घेतलीं पाहिजेत. ( ४ ) मालेंतील

पुस्तक प्रसिद्ध झालें ह्मणजे तें अर्धी किंमत व टपालखर्च आकारून वर्गणीदारांकडे व्ही. पी. नें पाठविण्यांत येईल. ( ५ ) व्ही. पी. चा स्वीकार न केल्यास वर्गणीदाराचें नांव पटांतून काढण्यांत येईल व रुपया परत मिळणार नाहीं. अशा तऱ्हेनें नांव काढल्यानंतर पुन्हां वर्गणीदार होणें झाल्यास पुन्हां एक रुपया भरावा लागेल व जीं पुस्तकें विकत घेतली नसतील तीं विकत घ्यावीं लागतील. ( ६ ) एकाहून अधिक प्रतींबद्दल नांव नोंदलें जातें व तितक्या प्रती अर्ध्या किंमतीला मिळतात. त्यांबद्दल प्रवेश फी एक रुपयाहून अधिक भरावी लागत नाहीं. परंतु जितक्या प्रतींबद्दल नांव नोंदविलें असेल तितक्याच प्रती अर्ध्या किंमतीला मिळतात. ( ७ ) मध्यंतरीं वर्गणीदार होणारांना पहिल्यापासून सर्व पुस्तकें विकत घ्यावीं लागतील. तीं त्यांना अर्ध्या किंमतीच्या भावानें मिळतील.

**सूचना**—पत्रव्यवहार करणारांनीं उत्तर पाहिजे असल्यास तिकीट पाठवावें.

**सेक्रेटरी, अष्टेकर आणि मंडळी.**
**७७६ सदाशिव पेठ, पुणें.**

# मनोरंजक पुस्तकमाला.

## पुस्तक पहिलें.

## प्रेमपरीक्षा.

लेखक---रघुनाथसूनु.

भलत्या शिक्षणानें आणि प्रेमविषयक कादंबऱ्यांच्या वाचनानें स्त्रीपुरुषांच्या डोक्यांत वेडेचार कसे शिरतात आणि त्यामुळें त्यांच्या संसाराचें कसें मातेरें होतें हें या कादंबरीच्या वाचनानें चांगलें कळून येणार आहे. किंमत बारा आणे.

## पुस्तक दुसरें.

## कमलिनी

लेखक---रघुनाथसूनु.

संसार सुखप्रद होण्यास पतिपत्नींनीं परस्परांशीं एकनिष्ठ रहाणें कसें जरूर आहे, तारुण्यावस्थेमध्यें फाजील मनोविकारांच्या अधीन होऊन उच्छृंखल वर्तन केलें असतां कशीं भयंकर पातकें घडतात, दैवायत्त अशा

परिस्थितीमुळें आपल्या आशेचा विरस झाला तरी परमेश्वरावर भार टाकल्यानें मनाला कशी शांति मिळते, इत्यादि गोष्टी ही कादंबरी वाचल्यानें वाचकांना चांगल्या समजतील. किंमत एक रुपया.

## पुस्तक तिसरें.

## वत्सला आणि अभिमन्यु.

लेखक—**नरहरि.**

वत्सलास्वयंवर हें पौराणिक कथानक पुष्कळांना ठाऊक असेल. या अद्भुत कथेला नवीन वळण देऊन जास्त माधुरी आणली आहे. दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण याला वत्सला द्यावयाची असा बळरामदादाचा आग्रह असतांना श्रीकृष्णपरमात्म्यानें अभिमन्यु व वत्सला या योग्य जोडप्याचा संयोग कसा घडवून आणला याचें चटकदार व रसपूर्ण वर्णन या कादंबरींत वाचकांस पहावयास सांपडेल. किंमत आठ आणे.

पुस्तक चवथें.

# जग हें त्रिविध आहे.



लेखक-रा. रा. **सीताराम केशव दामले**, बी.ए.एल एल. बी.

जगामध्यें मुख्यतः आढळून येणाऱ्या त्रिविध गुणांचें वर्णन या कादंबरीमध्यें उत्कृष्ट तऱ्हेनें पहाण्यास सांपडतें. सदानंदराव सुखात्मे यांची सहजानंदनिमग्नता, श्रीपतराव कांचने यांची संपत्तिलोलुपता आणि बृहस्पतराव कुशाग्र यांची रोमान्सप्रियता यांचें चित्र अत्यंत चटकदार रीतीनें रेखाटलें आहे. आजकालच्या मराठी कादंबऱ्यांमध्यें या कादंबरीनें आबालवृद्धांस चटक लावून सोडली आहे व मार्मिक विचारसरणीचे योगानें ही सर्वांस पसंत झाली आहे. प्रो. शिवराम महादेव परांजपे एम्. ए. यांनीं प्रस्तावना लिहिली आहे. चार सुंदर चित्रें जोडलीं आहेत. किंमत दीड रुपया.

**सूचना**—सर्व पुस्तकांस टपालखर्च वेगळा.

**सेक्रेटरी, अष्टेकर आणि मंडळी**
**७७६ सदाशिव पेठ, पुणें.**

# वाचकांस सविनय विज्ञप्ति.

मराठी भाषेमध्यें निरनिराळ्या विषयांवर सर्वांगसुंदर पुस्तकें तयार करण्याचा आमचा उद्देश आहे. अशा कांहीं पुस्तकांकरितां आह्मांस बरीच माहिती समजण्याची अवश्यकता आहे. ही माहिती वाचकांच्या मदतीवांचून मिळणें शक्य नाहीं हें उघड आहे. करितां ज्यांच्या ह्मणून वाचण्यांत पुढें दिलेले प्रश्न येतील त्या सर्वांना सवडीप्रमाणें पुढील प्रश्नांचीं उत्तरें आमचेकडे लिहून पाठविण्याविषयीं सविनय विनंति करीत आहों. या विनंतीचा अव्हेर होणार नाहीं अशी आशा आहे.

( १ ) पुढील माहिती कळवावी—

तुमचें नांव, वय, जात, धंदा, कुटुंबांतील माणसें हयात व मयत, मृत्यूचीं कारणें व मृत्युसमयीं वय.

[ कुटुंबांतील माणसें = वडील, मातोश्री, भाऊ, बहिणी, मुलगे, मुली ].

मूळचें गांव कोणतें ? हल्लीं रहातां त्या गांवीं तुह्मी अथवा वाडवडील केव्हां व कां आले ?

गोत्र व कुलदेवता.

( २ ) शुद्ध हवा आणि स्वच्छ पाणी हीं आरोग्यास अत्यंत आवश्यक आहेत. या दोहोंचा भरपूर पुरवठा आपल्या गांवांत आहे काय ? नसेल तर कां नाहीं ? कसा करतां येईल ?

( ३ ) मागील पिढीपेक्षां पुढील पिढी अशक्त व ठेंगू होत आहे असें ह्मणतात. आपण आपल्या कुटुंबांतील उदाहरणांवरून ही गोष्ट खरी असें ह्मणाल काय ? खरी असेल तर याला कोणतीं कारणें आहेत असें आपणांस वाटतें ?

( ४ ) डांस, पिसवा, ढेकूण, उवा, माशा इत्यादि कीटक स्पर्शजन्य व इतर देखील रोग पसरविण्यास कारण होतात. हे आपल्या गांवांत कितपत आहेत ? त्यांचे योगानें आपल्या गांवांत रोगाचा प्रादुर्भाव होतो काय ? यांचा नाश करण्याचें एखादें साधन आपणांस माहीत आहे काय ?

( ५ ) आपल्या देशांत हजारों वनस्पति सहज मिळण्याजोग्या असून त्यांचा निरनिराळया रोगांवर उत्तम उपयोग

होतो. परंतु यासंबंधाचें ज्ञान सर्वांना नाहीं. याकरितां आपणांस अशा कांहीं वनस्पतींची माहिती असेल तर ती आपण सार्वजनिक कल्याणाकरितां आम्हांस कळविण्याची मेहेरबानी करावी. दुसरीं कांहीं रामबाण औषधें आपणांस माहीत असतील तर तींहि कळवावीं.

( ६ ) तुमच्या गांवांत अथवा तुमच्या माहितीचे जे कोणी जहागीरदार अथवा इनामदार असतील त्यांचीं नांवें कळवावीं. त्यांना जहागीर अथवा इनाम कोणीं, केव्हां व कशाबद्दल दिलें ?

( ७ ) आपल्या गांवांत देवळें किती व कोणकोणाचीं आहेत ? आपल्या गांवीं अथवा जवळपास दरसाल जत्रा, उत्सव वगैरे केव्हां व कोणाचा असतो ? तो अजमासें किती काळ चालत आहे ? कांहीं विशेष प्रकार तेथें घडतो काय ?

( ८ ) मराठी भाषेमध्यें कोणकोणत्या विषयांवर कशा प्रकारचे ग्रंथ तयार होणें जरूर आहे ? यासंबंधानें आपणास योग्य वाटतील त्या सर्व सूचना कराव्या.

( ९ ) मराठी भाषेमध्यें छापलेले परंतु हल्लीं उपलब्ध

नसलेले असे काहीं ग्रंथ आपणांजवळ असतील तर त्यांचीं नांवें व विषय वगैरे माहिती कळवावी. आपणांजवळ नसून आपल्याला अशा काहीं ग्रंथांची नुसती माहिती असेल तरी ती कळवावी.

( १० ) त्याचप्रमाणें मराठी जुन्या मासिक पुस्तकांची माहिती कळवावी.

( ११ ) ज्यांचें मराठीमध्यें भाषांतर होणें जरूर आहे असे कोणते इंग्रजी ग्रंथ आपणांस माहीत आहेत ?

( १२ ) नाटकांचा फैलाव दिवसानुदिवस जास्त वाढत चालल्यामुळें समाजाची सात्विक मार्गाकडील प्रवृत्ति बरीच जात चालली आहे. विशेषतः स्त्रिया व लहान मुलें यांच्या नजरेस इष्ट नाहींत असे प्रकार रंगभूमीवर त्यांना हरहमेश दिसल्यानें त्यांची मनःप्रवृत्ति अयोग्य मार्गाकडे वळण्याला मदत होते. लहान मुलांना अल्पवयांत भलत्याच गोष्टींचें ज्ञान नाटकांमुळें होऊं लागून त्यांच्या शरीरप्रकृतीवर परिणाम होतो. अशा प्रकारची स्थिति आहे असें बऱ्याच समंजस माणसांचें मत आहे. यासंबंधानें आपले विचार काय

आहेत ? ज्यांचे असे विचार असतील त्यांनीं आपल्या कुटुंबापुरतें तरी हे संकट कसें टाळावें ?

(१३) धर्माच्या अथवा इतर नांवाखालीं भीक मागणारे रिकामटेकडे लोक आपल्या देशामध्यें अतिशय असल्यामुळें आळस वाढत आहे. या लोकांना उद्योगास लावण्याचा उपाय काय ? धडधाकड लोकांना कोणींहि भिक्षा घालूं नये, असा इतर बऱ्याच देशांत कायदा आहे व त्यामुळें तिकडे लोकांना उद्योगी व्हावेंच लागतें. आपल्या देशांत असा कायदा नाहीं. परंतु लोकांनीं हा नियम अमलांत आणण्याचा निश्चय केल्यास पुष्कळ कार्यभाग होणार आहे. हा नियम कांहींसा कठोर वाटला तरी तो खरोखर सर्वांच्या कल्याणाचा आहे अशी कोणाचीहि विचाराअंतीं खात्री होईल. हा नियम अमलांत आणण्यास कोणत्या अडचणी आहेत व त्या कशा दूर करतां येतील ?

या प्रश्नांचीं उत्तरें सवडीप्रमाणें पुढील पत्यावर पाठवावीं—

**सेक्रेटरी, अष्टेकर आणि मंडळी.**

**सदाशिव पेठ, पुणें.**

[ १२ ]

---

सूचना—५ आणि ६ या पानांतील **परमार्थसाधन** आणि **उपनिषत्संग्रह भाग दुसरा** या जाहिरातीं-कडे वाचकांनीं अवश्य लक्ष द्यावें.